श्रीसमंतभद्राचार्य विरचित

# स्वयंभूस्तोत्र—

## चतुर्विंशति जिनस्तुति.



श्रीप्रभाचंद्राचार्यकृत संस्कृत टीकासहित

भाषांतर करणार—

श्रीयुत जिनदास पार्श्वनाथ 'न्यायतीर्थ' सोलापूर.

प्रकाशक—

दोशी सखाराम नेमचंद, सोलापूर.

मुद्रक—

पं. वंशीधर उदयराज, मा० "श्रीधर प्रेस"

घर नंबर ४७७ शुक्रवार पेठ सोलापूर.

किंमत २॥ रुपये.

## प्रस्तावना.

विद्या व कला यांची उन्नति राजांच्या आश्रयानें होते असें ह्मणतात तें खरें आहे. आपण पूर्वेतिहासाकडे सूक्ष्मरीतीनें पाहिल्यास ही गोष्ट खरी आहे असें आढळून येईल. जैन वाङ्मयाची उन्नति होण्यास राजाश्रय बराच कारणीभूत झाला आहे; अनेक विद्वन्मुकुटमणि जैनाचार्य, राजांचे गुरु होते. व कित्येक आचार्यांनीं तर गृहस्थाश्रमांत असतांना स्वतः राजपद भोगिलें आहे. कित्येक जैनाचार्योंनी वादामध्यें अन्य विद्वानांना परास्त केले, त्यामुळें तत्कालीन राजे जैनाचार्यांचे शिष्य बनत असत असेंही इतिहासामध्यें आढळून आलें आहे. अकलंकदेव लघुहव्व या नांवाच्या राजाचे पुत्र होते. हिमशीतल राजा यांचा शिष्य होता. पूज्यपाद आचार्य दुर्विनीत राजाचे गुरु होते. प्रभाचंद्र आचार्य भोजराजाचे गुरु होते. आदि पुराणकार जिनसेनाचार्य हे अमोघवर्ष राजाचे गुरु होते. तसेंच नेमिचंद्र आचार्य चामुंडरायाचे गुरु होते हें प्रसिद्ध आहे. महान् तार्किक व कवि असे वादिराज पंडित जयसिंह राजाचे गुरु होते. पूर्वकालीं जैन वाङ्मयाची जी उन्नति झाली तिला राजे व मोठमोठे श्रीमंत लोक कारणीभूत होते. या वरून जैनवाङ्मयाची वाढ व्हावयाला पूर्व परिस्थिति बरीच अनुकूल होती हें दिसतें.

खरोखर धर्माची, देशाची किंवा समाजाची उन्नति ही वाङ्मयाच्या उत्कर्षावर अवलंबून आहे. ज्या समाजाचें वाङ्मय उन्नतिशील नाहीं, तो समाज उन्नतिमध्यें सर्व समाजांच्या मागें राहील, हें निःसंशय खरें आहे. चांगलें वाङ्मय लोकांचें अज्ञान दूर करितें व त्यांची उन्नति करितें. अशा वाङ्मयाचा पूर्वकालीं जैन समाजानें फार जोरानें प्रसार केला होता. व यामुळेंच त्याकाळीं जैन जाति उन्नतिशील गणिली

जात असे. त्या कालचें जैन वाङ्मय या कालीं देखील पाश्चात्य विद्वानांच्या प्रशंसेस पात्र झालें आहे. जैनाचार्यांनीं अविश्रांत परिश्रम करून जी वाङ्मयसेवा केली आहे ती अपूर्व आहे. जैनसमाज या योगें चिरकालपर्यंत आचार्यांचा ऋणी राहील.

जैन वाङ्मय, हें प्राकृत, संस्कृत, कर्नाटक तामील व हिंदी या भाषांतून मुख्यत्वेंकरून आढळून आलें आहे. हिंदी भाषेंतील वाङ्मय जरी स्वतंत्र नाहीं तथापि तें प्राकृत व संस्कृत ग्रंथांच्या अनुवादरूपाचें आहे. कर्नाटक व तामील भाषेचें जैन वाग्मय बहुतेक स्वतंत्ररूपाचें आहे. परंतु महाराष्ट्र भाषेच्या जैन वाग्मयाची स्थिति अत्यंत निराशाजनक आहे. आणि ह्मणूनच महाराष्ट्रीय जैन जातिमध्यें अज्ञान पसरलें आहे. महाराष्ट्र भाषेंचें जैनवाग्मय जर वाढणार नाहीं तर या जातीचें अज्ञान केव्हांही दूर होणार नाहीं. यास्तव या भाषेंत जैन वाङ्मयाची वृद्धि करण्याचा जैन विद्वान लोकांनीं फार जोराचा प्रयत्न करावयाला पाहिजे.

हिंदी किंवा कर्नाटक जैन वाङ्मयाशीं महाराष्ट्र जैनवाग्मयाची तुलना केली तर आपलें महाराष्ट्रीय जैन वाङ्मय त्यापुढें कः पदार्थ आहे. कांहीं महाराष्ट्र जैन कवीनीं मराठी भाषेंत ग्रंथ लिहिले आहेत परंतु ते फारच थोडे आहेत. अलीकडे आपल्या भाषेंत जैन वाङ्मय निर्माण होऊं लागले आहे. ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. तथापि अधिक प्रमाणानें याची वाढ आपल्या भाषेंत व्हावयास पाहिजे. असें झालें ह्मणजे महाराष्ट्रीय जैन जातीचा गौरव होईल. असो.

जैनवाङ्मयाची अल्पस्वल्प सेवा आपणही यथाशक्ति करावी या हेतूनें स्वयंभू स्तोत्राचें भाषांतर करण्याचा हा अल्पसा प्रयत्न केला आहे. हें स्वयंभूस्तोत्र संस्कृत वाङ्मयांतील अद्वितीय रत्न आहे. जरी यांत चोवीस तीर्थंकरांची स्तुति केली गेली आहे तथापि केवळ यांत भक्तिचें

जिनगुण वर्णनच न करितां ग्रंथकार समंतभद्राचार्यांनीं अनेक तात्त्विक विषयांचें सुंदर वर्णन केलें आहे. यामुळें हें स्तोत्र अद्वितीय आहे असें ह्मणावयाला हरकत नाहीं. जैन, पदार्थांचें स्वरूप कसें मानितात व जैनांचा स्याद्वाद काय आहे हें या स्तोत्रांत उत्तम रीतीनें प्रतिपादिलें आहे. साहित्य दृष्टीनें विचार केला तर यांत त्याही प्रकारचें वर्णन केलेलें तज्ज्ञांस आढळून येईल. धर्म, न्याय, साहित्य व व्याकरण या सर्व दृष्टीनें हें स्तोत्र अत्युत्तम आहे. या स्तोत्राच्या शेवटच्या श्लोकांतील चौथ्या चरणामध्यें ग्रंथकारानें आपलें नांव प्रकट केलें आहे. तें असें ' तव देव मतं समंतभद्रं सकलं ' यावरून हें स्तोत्र समंतभद्र आचार्यांनीं लिहिलें आहे हें व्यक्त होतें. या स्तोत्राच्या रचनेचा इतिहास समंतभद्राचार्यांच्या चरित्रामध्यें लिहिला आहे.

या स्तोत्रावर प्रभाचंद्राचार्यांनीं लहानशी पण अभिप्रायपूर्ण अशी टीका लिहिली आहे. या प्रभाचंद्राचार्यांनीं प्रमेयकमलमार्तंड व न्यायकुमुदचंद्रोदय या सारखे प्रचंड तर्कग्रंथ लिहिले आहेत. स्वयंभू स्तोत्राच्या प्रशस्तीचा श्लोक व प्रमेयकमलमार्तंडाच्या प्रशस्तीचा श्लोक यांची समानता असल्यामुळें या दोन्ही ग्रंथांचा कर्ता एकच आहे असें अनुमान करावयाला कोणती हरकत नाहीं. तसेंच स्वयंभू स्तोत्रांतील तात्विक प्रतिपादन करणाऱ्या श्लोकांची टीका या आचार्यांनीं मोठ्या खुबीनें लिहिली आहे. यावरूनही या ग्रंथांचा कर्ता एकच असावा असें वाटतें. श्री जिनसेन आचार्यांनीं मोठ्या गौरवानें आदिपुराणामध्यें या आचार्यांचा उल्लेख केला आहे. अकलंक, माणिक्यनंदी, विद्यानंदि, प्रभाचंद्र, जिनसेन इत्यादिक आचार्य समकालीन झाले आहेत.

आचार्य प्रभाचंद्रांनीं अकलंक, विद्यानंद व समन्तभद्र यांचें स्मरण केलें आहे. प्रभाचंद्राचार्यांचा अस्तित्वकाल विक्रमाचें नववें शतक मानलें जातें.

स्वयंभूस्तोत्राचा अनुवाद करतांना कोठें कोठें विशेष स्पष्टीकरण केलें

आहे. हें स्पष्टीकरण राजवार्तिक, श्लोकवार्तिक, प्रमेयकमलमार्तण्ड, अष्टसहस्री इत्यादि ग्रंथांच्या आधारें लिहिलें आहे.

श्रीमान पं. वंशीधरजी हे माझे विद्यागुरु आहेत, त्यांच्या कृपेमुळें मी या ग्रंथाचें भाषांतर करण्यास यथाशक्ति समर्थ झालों यास्तव त्यांचा मी अत्यंत ऋणी आहे. तसेंच श्रीमान रावजी सखाराम दोशी यांच्या प्रेरणेनें हें अनुवादाचें कार्य हातीं घेऊन तें मी पूर्ण केलें. या ग्रंथाचें प्रकाशन करून त्यांनीं जैन समाजास ऋणी करून ठेविलें यास्तव त्यांचा मी फार आभारी आहे.

माझ्या या कृतींत बरेच दोष असण्याचा संभव आहे. तथापि मनुष्य हा चुकीस पात्र आहे असें समजून वाचकांनीं क्षमा करावी अशी माझी त्यांना सविनय प्रार्थना आहे.

सोलापूर,<br>
पौष शुक्ल सप्तमी रविवार<br>
वीरनिर्वाण २४४७<br>
विक्रम संवत् १९७६

जिनदास पार्श्वनाथ फडकुले.

# स्वामी समन्तभद्राचार्य ।



परोपकारी मनुष्यांचे जीवन जगाचें कल्याण करण्याकरितां असतें. परोपकारी माणसें आपल्या कृत्यांनीं जगास हमेशा ॠणी करून सोडतात. अशांचें जीवनचरित्र जगास आदर्शभूत असतें. सत्पुरुषांची कृत्यें हींच त्यांचीं स्मारकें होत. सत्पुरुष जरी कालाच्या अनंत उदरामध्यें गडप झाले तरी त्याच्या सत्कृत्यांचा नाश कालाला कधींही करितां येत नाहीं. तीं हमेशा सूर्यप्रकाशाप्रमाणें सर्व जगाच्या नेत्रांना जगाच्या अंतापर्यंत दिपवित असतात. सत्पुरुषांचें शरीर हें क्षणभंगुर आहे. परंतु त्यांचे गुण कल्पकालपर्यंत राहतात. त्यांचा केव्हांही नाश होत नसतो. ' शरीरं क्षणविध्वंसि कल्पांतस्थायिनो गुणाः ' ही कव्युक्ति वर लिहिलेल्या वचनाचें सत्यत्व पटवितें.

दिगंबर जैन धर्मामध्यें त्याच्या प्रारंभापासून आजपर्यंत असंख्यात सत्पुरुष होऊन गेले आहेत. त्यांची कीर्ति अजरामर झाली आहे. सत्पुरुषांच्या मालिकेमध्यें भगवान् समन्तभद्र उत्पन्न झाले होते. दिगंबर जैन धर्मामध्यें हे सर्वोच्च स्थानावर विराजमान झाले आहेत.

यांनीं आपल्या विद्वत्तेनें जैनधर्माची उन्नति केली. अनेक भिन्नमतीय विद्वानांशीं वाद करून त्यांना जैनधर्माचें महत्व दाखवून दिलें. भगवत् समंतभद्राचार्यानंतर जे प्रसिद्ध विद्वान आचार्य झाले त्यांनीं आपल्या ग्रंथांतून भगवत् समंतभद्राचार्यांची प्रशंसा केली आहे. पूज्यपादाचार्यांनीं जैनेंद्र व्याकरण लिहिलें आहे. त्यांत ' चतुष्टयं समन्तभद्रस्य ' या सूत्रानें समन्तभद्र आचार्यांचा उल्लेख केला आहे.

हरिवंशकार जिनसेनाचार्यांनीं समंतभद्रांची वाणी महावीर तीर्थकरांच्या वाणीप्रमाणें आहे असें म्हटलें आहे.

**जीवसिद्धिविधायीह कृतयुक्त्यनुशासनम् ।**

वचः समन्तभद्रस्य वीरस्येव विजृम्भते ॥

अर्थ– महावीर स्वामीचें वचन जीवांना मोक्षप्राप्तीस कारण आहे. व तें प्रमाण व नय यांच्याद्वारें आहे. समंतभद्राचार्यांचेंही वचन महावीरस्वामीप्रमाणेंच पूज्य आहे. समंतभद्राचार्यांचें वचन जीवसिद्धि नांवाचा ग्रंथ करणारें आहे. ( जीवसिद्धि या नांवाचा एक ग्रंथ समन्तभद्र आचार्यांनीं लिहिला असावा असें यावरून दिसतें. ) व तें युक्त्यनुशासन नांवाचा ग्रंथ करणारें आहे. [ युक्त्यनुशासन हा ग्रंथ माणिकचंद्र ग्रंथमालेमध्यें सटीक छापला गेला आहे. ]

हरिवंशकार जिनसेन आचार्य हे आदिपुराणकार भगवज्जिनसेन आचार्यांहून भिन्न आहेत. हरिवंश हा ग्रंथ जिनसेनांनीं शक सं. ७०५ मध्यें लिहिला आहे.

आदिपुराणकार भगवज्जिनसेनाचार्यांनीं समंतभद्राचार्यांविषयीं जे प्रशंसोद्गार काढले ते हे—

नमः समंतभद्राय महते कविवेधसे ।
यद्वचोवज्रपातेन निर्भिन्नाः कुमताद्रयः ॥
* कवीनां गमकनांच वादिनां वाग्मिनामपि ।
यशः सामन्तभद्रीयं मूर्ध्निचूडामणीयते ॥

अर्थः—ज्याच्या वचनरूपी वज्राच्या पडण्यानें मिथ्यामतरूपी पर्वतांचा चुराडा झाला त्या कविमध्यें ब्रह्मदेवाप्रमाणें असलेल्या-श्रेष्ठ असलेल्या समंतभद्राचार्यांस नमस्कार असो कवि, गमक, वादी व वाग्मी यांच्या मस्तकावर देखील समंतभद्राचार्यांचें यश चूडामणिप्रमाणें शोभूं लागतें.

---

* टीपः—कविर्नूतनसंदर्भो गमकी ( शास्त्रबोधकः ) कृतिभेदकः ।
वादी विजयवाग्वृत्तिर्वाग्मी स्याज्जनरंजकः ॥

अर्थः—नवीन नवीन कविता करणारा कवि होय. शास्त्रांचा उपदेश करणारे किंवा कवींच्या कृतींचीं मर्में शोधून काढणारे ते गमक

होत. वाद करून विजय मिळविणारे ते वादी व श्रोत्यांचें मनोरंजन करणारे ते वाग्मी होत. समंतभद्राचार्यांच्या ठिकाणीं हे चारी गुण पूर्ण उतरले होते. यामुळें त्यांचें यश सर्वत्र पसरलें होतें. यावरून न्याय-काव्य, व्याकरण व वक्तृत्व या गुणांमध्यें त्यांचा हात धरणारा कोणी नव्हता हें व्यक्त होते.

वीरनंदि आचार्यांनीं चंद्रप्रभ काव्यामध्यें सत्पुरुषांच्या वचनाचें महत्व वर्णन करितांना समंतभद्र आचार्याविषयीं असें म्हटलें आहे.

गुणान्विता निर्मलवृत्तमौक्तिका नरोत्तमैः कंठविभूषणीकृता ।
न हारयष्टिः परमेव दुर्लभा समंतभद्रादिभवाच भारती ॥

अर्थः—दोऱ्यानें युक्त, स्वच्छ व गोल मोतीं ज्यामध्यें आहेत आणि ज्याला श्रीमंत लोक आपल्या कंठामध्यें धारण करून त्याला शोभा आणतात, अशा सुंदर हाराची प्राप्ति होणें अशक्य नसते. परंतु धैर्य औदार्य किंवा मूलगुण व उत्तरगुण यांचें वर्णन करणारी, निर्मल चारित्राला धारण करणाऱ्या मोक्षवासी जीवांचें कथन करणारी, मोठमोठ्या आचार्यांनीं भूषणाप्रमाणें आपल्या कंठामध्यें सतत धारण केलेली अशी समंतभद्र वगैरे महान आचार्यांची वाणी आपणांस प्राप्त होणें अत्यंत दुर्लभ आहे. भगवान् समंतभद्र आचार्यांची वाणी प्राप्त होणें दुर्लभ आहे असा या श्लोकाचा आशय आहे. क्षत्रचूडामणि व गद्यचिन्तामणि या ग्रंथांचे कर्ते वादीभसिंह कवि आपल्या गद्यचिन्तामणि ग्रंथामध्यें समंतभद्राचार्याविषयीं असे प्रशंसोद्गार काढतात.

सरस्वतीस्वैरविहारभूमयः समंतभद्रप्रमुखा मुनीश्वराः ।
जयंतु वाग्वज्रनिपातपाटितप्रतीपराद्धांतमहीध्रकोटयः ॥

अर्थ—सरस्वतीची क्रीडाभूमी बनलेले अर्थात् ज्यांच्या हृदयांत सरस्वती मनसोक्त क्रीडा करीत आहे असे व वचनरूपी वज्राच्या प्रहारानीं अन्यमतांचीं सिद्धांतरूपी पर्वतांचीं शिखरें जमीनदोस्त करून टाकणारे समन्तभद्रादिक महाकवीश्वर सदा विजयी होवोत. यावरून

आचार्यांना अन्यमतांतील तत्वांचें ज्ञान अत्युत्कृष्ट होतें हें दिसून येईल.

याचप्रमाणें वसुनंदि, अकलंकदेव, विद्यानंद व शुभचंद यांनीं ही अशाच रीतीचे प्रशंसोद्गार काढले आहेत. त्या सर्वांचा उतारा येथें दिल्यानें भगवान् समंतभद्राचार्यांची मान्यता दिगम्बर जैनधर्मामध्यें केवढी मोठी होती हें दिसून येईल.

लक्ष्मीभृत्परमं निरुक्तिनिरतं निर्वाणसौख्यप्रद ।
कुज्ञानातपवारणाय विधृतं छत्रं यथा भासुरम् ॥
सज्ज्ञानैर्नययुक्तिमौक्तिकफलैः संशोभमानं यथा ।
वन्दे तद्धतकालदोषममलं सामंभद्रं मतम् ॥

अर्थः—अतिशय शोभणारें, निर्वाण सौख्याची भव्यांना प्राप्ति करून देणारें, कलिकालाच्या दोषांचा नाश करणारें, पवित्र असें समंतभद्राचार्यांचें मत मी वन्दितो. आपण आपल्या मस्तकावर छत्र धारण केलें ह्मणजे आपण उन्हाच्या त्रासांतून सुटतो, छत्र जसें उन्हापासून आपला बचाव करितें त्याचप्रमाणें समंतभद्राचार्यांचें मतरूपी छत्र अज्ञानरूपी उन्हापासून भव्यजनांचें संरक्षण करितें. विद्वज्जनांनीं हें आपल्या मस्तकावर धारण केलें आहे, याच्या सभोंवती प्रमाण व नय रूपी मोतीं बसविली आहेत. व हें अतिशय सुंदर दिसतें.

याप्रमाणें वसुनन्द्याचार्यांनीं समंतभद्राच्या मताची स्तुति केली आहे व तें त्यांनीं वन्द्य मानिलें आहे.

भट्टाकलंकदेवांनीं समन्तभद्राचार्यांच्या देवागमस्तोत्रावर अष्टशती नांवाचा टीकाग्रंथ लिहिला आहे. ग्रंथारंभीं भट्टाकलंक देवांनीं समंतभद्राचार्यांची जी स्तुति केली आहे ती अशीः—

तीर्थं सर्वपदार्थतत्वविषयस्याद्वादपुण्योदधे- ।
र्भव्यानामकलङ्कभावकृतये प्राभावि काले कलौ ॥
येनाचार्यसमन्तभद्रयतिना तस्मै नमः संततम् ।
कृत्वा विव्रियते स्तवो भगवतां देवागमस्तत्कृतिः ॥

**अर्थः—** या कलिकालामध्यें भव्य लोकांचा कर्ममल धुऊन जावा ह्मणून व सर्व जीवाजीवादि तत्त्वांचा साठा आपल्या पोटांत ठेवणाऱ्या स्याद्वादरूपी पवित्र समुद्रांत त्यांचा प्रवेश व्हावा ह्मणून ज्यांनीं शास्त्र रचनारूपी घाट बांधिला, त्या समन्तभद्र आचार्यांना वारंवार नमस्कार करून त्यांनी रचिलेल्या देवागम स्तोत्राचें विवरण मी (अकलंक देव) करितो. समंतभद्राचार्यांच्या ग्रंथाचें जो उत्तम रीतीनें अध्ययन करितो त्याचा अवश्य स्याद्वाद समुद्रामध्यें प्रवेश झाल्यावांचून राहणार नाहीं. यावरून स्याद्वाद समुद्रामध्ये प्रवेश करण्यास घाटाप्रमाणें त्यांचे ग्रंथ सहाय्य करितात असें महाकलंक देवांनी जें ह्मटलें तें निःसंशय खरें आहे.

**विद्यानंद** आचार्यांनी **समंतभद्राचार्यां**विषयीं जे उद्गार काढले आहेत ते हे:—

**नित्याद्येकान्तगर्तप्रपतनविवशान्प्राणिनोऽनर्थसार्था-**
**दुद्धर्तुं नेतुमुच्चैः पदममलमलं मङ्गलानामलङ्घ्यं ॥**
**स्याद्वादन्यायवर्त्म प्रथयदवितथार्थं वचः स्वामिनोदः ।**
**प्रेक्षावत्प्रचुरप्रवृत्तं जयतु विघटिताशेषमिथ्याप्रवादम् ॥**

**अर्थः—**नित्यैकांत, अनित्यैकांत वगैरे एकांत मलरूपी खड्ड्यांत पडलेल्या प्राण्यांना दुःखसमूहांतून वर काढून अत्यंत सुखदायक अशा स्थानीं पोहोचविणारें स्याद्वाद नीतीचा रस्ता दाखविणारें, सत्यपदार्थांचें वर्णन करणारें, अनेक मिथ्याकल्पनांचें खंडन करणारें, विद्वत्ताप्रचुर असें स्वामी समंतभद्र यांचें भाषण त्रैलोक्यांत हमेशा विजयी होवो.

ज्ञानार्णव ग्रंथाचे कर्ते शुभचंद्राचार्य असें ह्मणतात.

**समंतभद्रादिकवीन्द्रभास्वतां स्फुरन्ति यत्रामलसूक्तिरश्मयः।**
**व्रजंति खद्योतवदेव हास्यतां न तत्र किं ज्ञानलवोद्धता जनाः॥**

**अर्थः—**सूर्यतुल्य समंतभद्रादि कवीश्वरांचे निर्मल, निर्दोष वचनरूपी किरण जेथें प्रकाश पाडित असतात तेथें थोड्याशा ज्ञानानें उद्धत

झालेले लोक सोनकिड्याप्रमाणें हास्यास्पद अवस्थेला प्राप्त होत नाहींत काय ?

हस्तिमल्ल कवि आचार्यांबद्दल असें ह्मणतो---

श्रीमूलसंघव्योमेन्दुर्भारते भावितीर्थकृत् ।
देशे समंतभद्राख्यो मुनिर्जीयात्पदर्धिकः ॥
तत्वार्थसूत्रव्याख्यानगंधहस्तिप्रवर्तकः ।
स्वामी समंतभद्रोऽभूद्देवागमनिदेशकः ॥
अवटुतटमटति झटिति स्फुटपटुवाचाटधूर्जटेर्जिह्वा ।
वादिनि समंतभद्रे स्थितवति सति का कथान्येषां ॥

अर्थः---स्वामी समंतभद्राचार्य मूलसंघरूपी आकाशामध्यें सूर्याप्रमाणें होते. ते भरतक्षेत्रांत भविष्यकालीं तीर्थंकर होणार आहेत. त्यांना पदर्धि होती अर्थात् ते चारण ऋद्धीच्या प्रभावानें आकाशांत गमन करीत असत.

स्वामी समंतभद्रांनीं देवागमस्तोत्र रचिलें व तत्त्वार्थसूत्रावर गन्धहस्ति नांवाचें महाभाष्य लिहिलें. निपुण व बोलण्यांत चतुर अशा महादेवाची देखील जीभ वादीन्द्र समंतभद्रांना पाहिल्याबरोबर लागलीच घाट्यांत जाऊन पडते. अर्थात् तिच्यानें एक शब्दही बोलवत नाहीं. मग भगवान् समन्तभद्राचार्यांपुढें इतर तुच्छ विद्वानांचें काय चालणार आहे. यावरून आचार्यांची असामान्य विद्वत्ता प्रकट होते. प्रचंड विद्वान देखील आचार्यांपुढें फिके पडत असत.

एका कवीनें आचार्यांविषयीं असें ह्मटलें आहे.

कुवादिनः स्वकान्तानां निकटे परुषोक्तयः ।
समन्तभद्रयत्यग्रे पाहि पाहीति सूक्तयः ॥

अर्थ- कुवादी आपल्या स्त्रियांपुढें कठोर भाषणें करितात. परंतु [illegible] समंतभद्रांना पाहिल्याबरोबर मुनिराज आतां आपणच आमचे रक्षक आहांत असें मधुर शब्द बोलतात. यावरून त्यांनीं अनेक वि-

हानांना वाद करून परास्त केलें होते. हें व्यक्त होतें.

श्रवण बेळगुळ येथें विन्ध्यगिरी पर्वतावर गोम्मटस्वामीची एक सुंदर विशाल प्रतिमा आहे. त्या पर्वतावरील एका जैनमंदिरामध्यें एका विशाल शिलेवर मल्लिषेण प्रशस्ति नांवाचा एक मोठा लेख खोदलेला आहे. त्या लेखामध्यें आचार्य समंतभद्र यांचा खाली लिहिल्याप्रमाणें परिचय मिळालेला आहे. तो असा—

कांच्यां नग्नाटकोहं मलमलिनतनुर्लांबुशे पांडुपिंडः ।
पुण्ड्रोण्ड्रे शाक्यभिक्षुर्दशपुरनगरे मिष्टभोजी परिव्राट् ॥
वाराणस्यामभूवं शशधरधवलः पांडुरांगस्तपस्वी ।
राजन् यस्यास्ति शक्तिः स वदतु पुरतो जैननिर्ग्रन्थवादी॥
वन्द्यो भस्मकभस्मसात्कृतपटुः पद्मावतीदेवता-।
दत्तोदात्तपदः स्वमन्त्रवचनव्याहूतचन्द्रप्रभः ॥
आचार्यः स समंतभद्रयतिभृद्येनेह काले कलौ ।
जैनं वर्त्म समंतभद्रमभवद्भद्रं समंतादमुहुः ॥
यस्यैवं विद्यावादारम्भसंरम्भविजृम्भिताभिव्यक्तयः सूक्तयः॥
पूर्वं पाटलिपुत्रमध्यनगरे भेरी मया ताडिता ।
पश्चान्मालवसिन्धुठक्कविषये कांचीपुरे वैदिशे ।
प्राप्तोहं करहाटकं बहुभटं विद्योत्कटं संकटम् ॥
वादार्थी विचराम्यहं नरपते शार्दूलविक्रीडितम् ॥

अर्थः—मी [ समंतभद्राचार्य ] कांची शहरांत नग्नमुनि होतो. त्या वेळेस माझें शरीर मलाचीं पुटें चढल्यानें मळकट झालेलें होतें. लांबुश शहरांत सर्व अंगाला भस्म लावल्यामुळें पांढरा दिसत होतो पुंड्र शहरामध्यें बौद्ध यतीचा वेष घेऊन राहिलों होतो. व दशपुर शहरामध्यें पक्वान्न झोडणारा परिव्राजक बनून राहिलों. आणि बनारस येथें सर्व अंग भस्मचर्चित झाल्यामुळें चंद्राप्रमाणें पांढऱ्या कांतीचा शैव तपस्वी बनलों. हें राजन् मी जैन निर्ग्रंथमुनि आहे. वाद करण्यांत निपुण आहे. जर

कोणाच्या मनामध्यें वाद करण्याची शक्ति असेल तर आला मी आव्हान करितो, त्यानें माझ्याबरोबर वाद करावयाला सज्ज व्हावें.

ज्यांनी भस्मक रोगालाही भस्म करून टाकलें, पद्मावती देवीनें ज्यांना उन्नत पदाला पोहोंचविलें, ज्यांनीं मंत्रयुक्त स्तोत्राच्या पठनानें चंद्रप्रभ तीर्थंकरांची प्रतिमा प्रगट केली, ज्यांच्या योगें या कलिकाला-मध्यें पुनः कल्याणकारक असा जैनधर्म उदयास आला व सर्व भव्य लोकांचें कल्याण झालें. असे ते समंतभद्र आचार्य आह्मांस वंद्य आहेत. प्रथमतः मी पाटलीपुत्र शहरामध्यें वाद करण्यासाठीं भेरी वाजविली होती. तदनंतर माळवा, सिंध प्रांत, ढाका, कांचीपूर व वैदिश या ठिकाणीं वादभेरी वाजविली होती. तदनंतर विद्वानांनीं व शूर पुरुषांनीं भरलेल्या करहाटक देशांत गेलों होतो. हे राजा, वाद करण्याची इच्छा करणारा मी सिंहाप्रमाणें निर्भय होऊन फिरत आहें.

याप्रमाणें मल्लिषेण प्रशस्तिमध्यें आचार्यांचा वृत्तांत वर्णिला आहे. या मल्लिषेण प्रशस्तिमध्यें वादिराज, दयापाल, वगैरे आचार्यांचा उल्लेख आहे. ही प्रशस्ति फार महत्वाची आहे. या प्रशस्तिची ऐतिहासिक हकीकत सत्य आहे. इतिहास संशोधकांना या प्रशस्तिचा फार उपयोग होतो. या प्रशस्तींत आचार्य समंतभद्र यांची जी हकीकत लिहिली आहे ती प्राचीन आहे. ब्रह्म नेमिदत्त यांनींहि आराधना कथा कोषामध्यें आचार्यांची हकीकत लिहिली आहे यामुळें ती विश्वसनीय आहे. तसेंच प्रभाचंद्र आचार्यांनीं प्राकृत भाषेंत आचार्यांचें चरित्र लिहिलें आहे त्याचा आधार घेऊन नेमिदत्त आचार्यांनीं समंतभद्र आचार्यांचें चरित्र लिहिलें आहे असें ही ह्मणतात. अशीं हजार हजार वर्षांची प्राचीन-प्रमाणें याविषयीं सांपडतात.

'प्राचीन लेखमाला' या पुस्तकामध्यें आचार्य समंतभद्राविषयीं असा उल्लेख आहे—

श्रीगृद्धपिच्छमुनिपस्य बलाकपिच्छः ।
शिष्योऽजनिष्ट भुवनत्रयवर्तिकीर्तिः ॥
चारित्रचंचुरखिलावनिपालमौलि-।
मालाशिलीमुखविराजितपादपद्मः ॥ १ ॥
एवं महाचार्यपरम्परायां स्यात्कारमुद्रांकिततत्त्वदीपः ।
भद्रः समंताद् गुणतो गणीशः समंतभद्रोऽजनि वादिसिंहः २

**अर्थः**—श्रीगृद्धपिच्छ आचार्यांचे बलाकपिच्छ या नांवाचे शिष्य झाले. यांची कीर्ति सर्वत्र पसरली होती. हे निर्दोष चारित्र पाळीत होते. मोठमोठे राजेमुद्रा यांना नमस्कार करीत असत.

याप्रमाणें मोठमोठ्या आचार्यांच्या परंपरेमध्यें स्याद्वादाची मोहोर ज्यांच्यावर मारली आहे अशा तत्वांना प्रकाशित करणारा अपूर्व दिवा असलेला, आपल्या गुणांनीं सर्वांचें कल्याण करणारा, प्रतिवाद्यांना सिंहाप्रमाणें असलेला, मुनिजनांचा अधिपति असा समंतभद्राचार्य उदयास आला.

या अनेक पूज्य आचार्यांच्या प्रशंसोद्गारांनीं व शिलालेख वगैरे साधनांनीं भगवान समंतभद्र हे फार मोठे विद्वान आचार्य होऊन गेले हें सिद्ध होतें.

आतां भगवान समंतभद्राचार्यांनीं जैन समाजास ऋणी करण्याकरितां कोणते ग्रंथ लिहिले याचा उल्लेख करून त्यांच्या अस्तित्वकालाचा ऐतिहासिक दृष्टीनें विचार करावयाचा आहे.

१ आचार्यांनीं देवागम या नांवाचें स्तोत्र लिहिलें आहे. यास आप्तमीमांसा असेंही नांव आहे. हें जिनेश्वरस्तुतिपर आहे. यांत सर्वज्ञ कोण होऊं शकतो ? या विषयाचें प्रतिपादन अत्युत्तम केलें आहे. सांख्य नैयायिक बौद्ध यांच्या तत्वाचें खंडन यांत फार उत्तम रीतीनें केलें आहे. हें स्तोत्र फार महत्वाचें आहे. या स्तोत्रावर भट्टाकलंक आचार्यांनीं ' अष्टशती ' नांवाची टीका लिहिली आहे. अष्टशतीवर

विद्यानंदी आचार्यांनी अष्टसहस्री लिहिली आहे. अष्टसहस्रीमध्ये अष्टशतीला विद्यानंद आचार्यांनी इतक्या उत्तम रीतीनें ग्रथित केलें आहे कीं जर अष्टशती हा ग्रंथ वेगळ्या रीतीनें किंवा मोठ्या टाइपांत प्रकाशित केला नसता तर त्याची ओळख होणें अशक्य झालें असतें. इतकें अष्टसहस्रीचें अष्टशतीशीं तादात्म्य आहे.

उमास्वामींनीं मोक्षशास्त्र ( तत्वार्थसूत्र ) या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्या ग्रंथाचें ' मोक्षमार्गस्य नेतारं ' इत्यादि मंगलाचरण आहे. या मंगलाचरणाचा आधार घेऊन समंतभद्राचार्यांनीं देवागमस्तोत्र रचिलें आहे. आचार्यांनीं तत्वार्थसूत्रावर गंध हस्ति महाभाष्य नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्याची श्लोक संख्या ८४००० हजार आहे असें ह्मणतात. एवढ्या मोठ्या ग्रंथाला साजेल असेंच हें मंगलाचरणभूत देवागमस्तोत्र आहे.

भगवान् **उमास्वामींच्या** मोक्षशास्त्र ग्रंथावर आचार्य **समंतभद्रस्वामींनीं** गंधहस्ति महाभाष्य लिहिलें आहे असें मागें सांगितलें. परंतु आचार्यांनीं गंधहस्ति महाभाष्य लिहिलें नाहीं, तें लिहिलें आहे असें ह्मणणें लोकप्रवाद व दंतकथा यावर अवलंबून आहे, संस्कृत ग्रंथामध्यें याचा उल्लेख मिळत नाहीं. हिंदी भाषा जाणणारे कांहीं मार्गील जैन विद्वान् यांनीं मात्र त्याचा उल्लेख केला आहे, असें **बाबू जुगलकिशोर** ह्मणतात. परंतु त्यांनीं तें भाष्य नाहीं हें दाखविणारें कोणतेंही प्रमाण दाखविलें नाही. आप्तमीमांसा हा स्वतंत्र ग्रंथ आहे. तो महाभाष्याचा अंश नाहीं. किंवा तो महाभाष्याचा मंगलाचरणस्वरूप ग्रंथ नाहीं, असें **बाबू जुगलकिशोर** ह्मणतात. परंतु हें त्यांचें ह्मणणें असत्य आहे हें सिद्ध करण्याचा थोडासा प्रयत्न येथें केला जाणार आहे.

लघुसमंतभद्रस्वामींनीं अष्टसहस्रीवर **' अष्टसहस्री विषमपद व्याख्या '** हा टिप्पण ग्रंथ लिहिला. व यांनीच **चिंतामणि** व्याकरणावर टिप्पणी लिहिली आहे. असें **नाथूराम प्रेमी** यांनीं **दिगम्बर जैन**

**ग्रंथ कर्ता और उनके ग्रंथ** या पुस्तकामध्यें स्वतः लिहिलें आहे.

या आचार्यांनीं अष्टसहस्रीसारख्या गहन ग्रंथावर जी टिप्पणी लिहिली आहे त्यावरून हे आचार्य मोठे विद्वान् असावेत असें दिसतें. यांनीं प्रथमारंभीं अष्टसहस्री ग्रंथामध्यें **गंधहस्ति महाभाष्याचा** उल्लेख केला आहे. तो असाः —

**उमास्वामिपादैरासूत्रितस्य तत्त्वार्थाधिगमस्य मोक्षशास्त्रस्य गंधहस्त्याख्यं महाभाष्यं उपनिबध्नंतः स्याद्वादविद्याग्रगुरवः श्रीसमंतभद्राचार्यास्तत्र मंगलपुरस्सरस्तवविषयपरमाप्तगुणातिशयपरीक्षामुपक्षिप्तवन्तो देवागमाभिधानस्य प्रवचनतीर्थस्य सृष्टिमापूरयांचक्रिरे** ॥ या प्रमाणावरून **समंतभद्राचार्यांनीं** गंधहस्तिमहाभाष्य लिहिलें आहे हें व्यक्त होतें. तसेंच या उल्लेखावरून देवागमस्तोत्र हें या भाष्याचें मंगलाचरण आहे असें ठरतें.

हस्तिमल्ल कवीनें विक्रांत कौरव हें नाटक लिहिलें आहे. नाटकाच्या अंतीं या कवीनें स्वतःची प्रशस्ति दिली आहे. तेथें त्यानें समंतभद्राचार्यांचा उल्लेख करितांना आचार्यांनीं गंधहस्ति महाभाष्य लिहिलें आहे असें म्हटलें, तें असें —

**तत्त्वार्थसूत्रव्याख्यानगंधहस्तिप्रवर्तकः ।**
**स्वामी समंतभद्रोऽभूद्देवागमनिदेशकः ॥ २ ॥**

हा कवि ई. सन १२९० मध्यें झाला आहे. आज या कवीला होऊन ६३० वर्षे झालीं.

तिसरें प्रमाण न्यायदीपिका या ग्रंथामध्यें मिळतें. हा ग्रंथ धर्मभूषण आचार्यांनीं लिहिला आहे. ते आपल्या न्यायदीपिकेंत सर्वज्ञसिद्धि प्रकरणामध्यें असें म्हणतात—

तदुक्तं स्वामिभिर्महाभाष्यस्यादावाप्तमीमांसाप्रस्तावे —

**सूक्ष्मांतरितदूरार्थाः प्रत्यक्षाः कस्यचिद्यथा ।**
**अनुमेयत्वतोऽग्न्यादिरिति सर्वज्ञसंस्थितिः ॥**

या प्रमाणावरूनही गंधहस्ति महाभाष्याचा उल्लेख मिळतो. गंधहस्ति भाष्य आहे हें सिद्ध करण्याला साधक असें हें प्रमाण मिळाल्यावर **बाबू जुगलकिशोर** या प्रमाणाची अप्रमाणता सिद्ध करण्यासाठीं, **धर्मभूषण** आचार्यांनीं **लोकोक्ति** किंवा **दन्तकथा** यांच्या आधारें असें लिहिलें असावें असें ह्मणतात यावरून कोणत्याही रीतीनें आपला पक्ष सिद्ध केला पाहिजे ह्मणजे आपलें काम झालें असेंच बाबू महाशयांना वाटत असावें असें दिसतें. पुनः हे बाबू महाशय असें ह्मणतात कीं '**धर्मभूषण** आचार्यांनीं **गंधहस्ति महाभाष्य** असें स्पष्ट ह्मटलें नाहीं यावरून कदाचित् आचार्य समंतभद्रांनीं केलेल्या **कर्मप्राभृत** ग्रंथाचा उल्लेख हा असावा. वगैरे वगैरे.

परंतु कर्मप्राभृत ग्रंथाला महाभाष्य ह्मटलेलें कोठेंही आढळून येत नाहीं असें असतां बाबूजींना असा संशय देण्याचें कारण काय हें समजत नाहीं. आणि जर कांहीं कारण असेल तर एवढेंच कीं प्रत्यक्षाखेरीज दुसरें प्रमाण मानावयास यांना जीवावर येतें.

धर्मभूषणयति यांनीं ' तदुक्तं स्वामिभिः ' असें ह्मटलें आहे. येथें स्वामिभिः या शब्दाचा अर्थ समंतभद्राचार्य हाच कसा बाबू महाशयांना आढळला येथेंही त्यांच्या मनामध्यें संशयानें कसा वास केला नाहीं हें समजत नाहीं.

धर्मभूषणाचार्यांनीं ' आप्तमीमांसा प्रस्ताव ' असें ह्मटलें आहे. यावरून गंधहस्तिमहाभाष्याचें आप्तमीमांसा हें एक प्रकरण आहे असें सिद्ध होतें. आप्तमीमांसा महाभाष्याचाच अंश आहे. फरक इतकाच कीं सर्वज्ञसिद्धि हा विषय यामध्यें पूर्ण लिहून यास आचार्यांनीं आप्तमीमांसा हें नांव दिलें यामुळें हा एक वेगळाच ग्रंथ आहे याचा महाभाष्याशीं कांहीं संबंध नाहीं असें वाटणें साहजिक आहे. या आप्तमीमांसेचे दहा अध्याय आहेत. तेही अकलंक देवांनीं सर्वज्ञसिद्धिला सहायक जे विषय आहेत त्यांची समाप्ति जेथें होते तेथें अध्याय समाप्तिची

कल्पना करून दहा अध्यायात्मक हा ग्रंथ मानिला आहे. जसें 'इत्याप्त-मीमांसाभाष्ये प्रथमः परिच्छेदः' इत्यादि. आचार्य समंतभद्रांनीं तत्वार्थ-सूत्राच्या मंगल श्लोकावरच आप्तमीमांसा लिहिली व तत्वार्थसूत्रावर त्यांनीं कांहीं लिहिलें नसावें हें संभवत नाहीं. वास्तव आप्तमीमांसाही महा-भाष्याचा अंश आहे असें मानणें युक्तियुक्त दिसतें.

भगवान् उमास्वामींनीं तत्वार्थसूत्राच्या प्रारंभीं केलेल्या मंगलाचेंच स्पष्टीकरण करण्याकरितां ज्यांनीं ११५ श्लोकाचें विस्तृत मंगलाचरण-स्वरूपी देवागमस्तोत्र लिहिलें त्यांनीं अवश्य तत्वार्थसूत्राच्या १० अध्याया-वर विस्तृत असें गंधहस्ति महाभाष्य लिहिलें असावें. नाहीं तर तत्वार्थसूत्राच्या प्रथम मंगल श्लोकावरच जर ११५ श्लोकात्मक देवागम स्तोत्र लिहिलें आहे असें मानलें तर तत्वार्थसूत्राच्या दहा अध्यायावर विस्तृत असें भाष्य रचण्याचें त्यांना सामर्थ्य नव्हतें असें मानावें लागेल. यावरून विचार केला असतां त्यांनीं गंधहस्ति महाभाष्य केलें असावें असें दिसून येईल. अकलंकदेव व विद्यानंदांनींही क्रमानें अष्टशती व अष्टसहस्री लिहून पुनः त्यांनीं तत्वार्थवार्तिक व श्लोकवार्तिक हे ग्रंथ लि-हिण्याचें कारण हें असावें कीं अष्टशती व अष्टसहस्री हे ग्रंथ फक्त तत्वार्थसूत्रा-च्या मंगलाचरणावर लिहिले आहेत वास्तव तत्वार्थाच्या स्पष्टीकरणाचे हे अंशभूत ग्रंथ आहेत असें समजून त्यांनीं तत्वार्थसूत्राच्या दहाही अध्याया-वर वार्तिकें लिहून त्यांस यथाक्रम तत्वार्थवार्तिक व श्लोकवार्तिक अशी नांवें दिलीं. याचप्रमाणें भगवान् समंतभद्रांनीं देवागमस्तोत्र हें तत्वार्थ-सूत्राचा एक अंश समजून संपूर्ण तत्वार्थसूत्राचें स्पष्टीकरणकरितां ८४-००० हजार श्लोकाचें गंधहस्तिमहाभाष्य लिहून ठेवलें असावें असें वाटतें. आणि हें आमचें वाटणें खरें आहे असें आम्ही म्हणू शकतो याचें कारण हें आहे कीं, धर्मभूषण यतींनीं आपल्या न्यायदीपिकेमध्यें 'तदुक्तं स्वामिभिर्महाभाष्यस्यादावाप्तमीमांसाप्रस्तावे' असें म्हटलें आहे.

आप्तमीमांसा महाभाष्याचा प्रस्तावनारूपी एक भाग नसती तर

'महाभाष्यस्यादौ आप्तमीमांसा–प्रस्तावे' असें धर्मभूषण आचार्यांनीं ह्मटलें नसतें.

बाबू जुगलकिशोर यांच्या अशा कल्पना आहेत कीं, समंतभद्राचार्यांचें गंधहस्ति असें उपनाम असावें अथवा कर्मप्राभृतावर ४८००० हजार श्लोकांची जी त्यांनीं टीका लिहिली असावी तिलाच गंधहस्ति महाभाष्य असें ह्मणत असतील. किंवा आचार्यांचे शिष्य शिवकोटि नांवाचे होते त्यांनीं तत्वार्थावर टीका लिहिली आहे. तिलाच कदाचित् महाभाष्य ह्मणत असावेत. परंतु ह्या सर्व कल्पना निर्मूल आहेत असें आह्मी दाखविलें आहे.

आचार्यांनीं लिहिलेल्या देवागमस्तोत्राबद्दल वादिराज कवि आपल्या पार्श्वनाथ चरित काव्यांत असें ह्मणतात—

स्वामिनश्चरितं तस्य कस्य नो विस्मयावहम् ।
देवागमेन सर्वज्ञो येनाद्यापि प्रदर्श्यते ॥ ७ ॥

अर्थः—या कलिकालांतही ज्यांनीं देवागमस्तोत्राच्याद्वारें जगाला सर्वज्ञ दाखऊन दिला त्या स्वामी समंतभद्राचार्यांचें चरित्र कोणाला बरें आश्चर्यांत पाडीत नाहीं ? या विवेचनानें देवागमस्तोत्राचें महत्व वाचकांच्या लक्षांत येईलच.

२ आचार्यांनीं युक्त्यनुशासन हा एक ग्रंथ लिहिला आहे. हा हि स्तुतिरूपच आहे. या ग्रंथांत आचार्यांनीं भगवान् महावीर तीर्थकरांची स्तुति केली आहे. यामध्यें ही अनेक अन्यमतांचें खंडन केलें आहे. या स्तोत्रावर विद्यानंदि आचार्यांनीं फार सुंदर अशी टीका लिहिली आहे. टीकेचें 'युक्त्यनुशासनालंकार' असें नांव आहे. विद्यानंद आचार्यांनीं युक्त्यनुशासनाची पुढें लिहिल्याप्रमाणें प्रशंसा केली आहे—

प्रमाणनयनिर्णीतवस्तुतत्त्वमबाधितम् ।
जीयात्समन्तभद्रस्य स्तोत्रं युक्त्यनुशासनम् ॥

अर्थः—प्रमाण व नय यांच्याद्वारें वस्तूंच्या स्वरूपाचा निर्णय करणारें

अबाधित असें समंतभद्राचार्यांचें युक्त्यनुशासनस्तोत्र सदा विजयी असो.

१ आचार्यांचा ' जिनशतक ' अथवा ' स्तुति विद्या ' या नांवाचा एक ग्रंथ आहे. यांत चोवीस तीर्थकरांची स्तुति आहे. हिची रचना आचार्यांनीं शब्दालंकारामध्यें केली आहे. मुरजबंध, चक्रबंध, गतप्रत्यागत, अर्धभ्रम, गोमूत्रिका इत्यादि बंधांचा आश्रय घेऊन ही स्तुति रचिली आहे. ही स्तुति समजण्याला अत्यंत कठिन पडलें असतें, जर हिच्यावर टीका कोणी लिहिली नसती. या स्तुति ग्रंथावर ' नरसिंहभट्ट ' या नांवाच्या विद्वानानें टीका लिहिली आहे. तो आपल्या टीकेच्या आरंभीं असें ह्मणतो—

समन्तभद्रं सद्बोधं स्तुवे वरगुणालयम् ।
निर्मलं यद्यशःकांतं बभूव भुवनत्रयम् ॥ २ ॥
यस्य च सद्गुणाधारा कृतिरेषा सुपद्मिनी ।
जिनशतकनामेति योगिनामपि दुष्करा ॥ ३ ॥
तस्याः प्रबोधकः कश्चिन्नास्तीति विदुषां मतिः ।
यावत्तावद्भभूवैको नरसिंहो विभाकरः ॥ ४ ॥
दुर्गमं दुर्गमं काव्यं श्रूयते महतां वचः ।
नरसिंहं पुनः प्राप्य सुगमं सुगमं भवेत् ॥ ५ ॥

अर्थः—ज्यांचें यश सर्वत्र भरल्यानें हें जग सुंदर व निर्मळ दिसूं लागलें, त्या विद्वान, गुणपरिपूर्ण अशा समंतभद्राचार्यांची मी स्तुति करितो. आचार्य समंतभद्रांचें जिनशतक नांवाचें सद्गुणांचा आधारभूत स्तोत्र आहे. तें सूर्यविकासी कमलाप्रमाणें आहे. तें स्तोत्र इतकें कठिन आहे कीं तसलें स्तोत्र योगिजनांना देखील करितां येणार नाहीं. त्या स्तोत्राच्या अर्थाचा उलगडा करणारा जगांत कोणी नाहीं अशी विद्वान लोकामध्यें प्रसिद्धि झाली होती. परंतु सूर्याप्रमाणें असलेल्या नरसिंहभट्टानें कमळाप्रमाणें असलेलें तें जिनशतक टीकारूपी किरणांनीं विकसित केलें आहे. जिनशतकग्रंथावरची टीका

पाहून विद्वान लोक असें म्हणत असत की कठिणांतलें कठिण असें ही काव्य नरसिंहभट्टाच्या हातीं पडलें की तें अत्यंत सुगम होतें. यावरून हें स्तोत्र किती कठिन असलें पाहिजे याची कल्पना वाचकांच्या मनांत येईल. आचार्यांनी जिनशतकांतील ११६ व्या श्लोकांत चक्रबंधाची रचना करून त्यांत आपलें नांव व ग्रन्थाचें नांव लिहिलें आहे. तें असें—शांतिवर्मकृतं जिनस्तुतिशतम्' आचार्यांचें शांतिवर्म हें नांव कसें, असें वाचकांस वाटण्याचा संभव आहे. परंतु शांतिवर्म हें आचार्यांचें जन्मनांव आहे. व समंतभद्र हें त्यांचें दीक्षेचें नांव आहे. कर्णाट देशांतील अष्टसहस्रीच्या एका प्रतींत आचार्यांच्या नांवाचा जो उल्लेख आहे तो असा ' इति फणिमंडलालंकारस्योरगपुराधिपसूनुना शांतिवर्मनाम्ना श्री समंतभद्रेण ' या उल्लेखावरून आचार्य पूर्वी राजपुत्र होते असें दिसतें. ' उरगपुराधिपसूनुना ' या उल्लेखावरून हें स्पष्ट होतें. आचार्यांचा क्षत्रिय कुलामध्यें जन्म झाला होता हें शांतिवर्म या नांवावरून दिसूनहि येतें. क्षत्रियांच्या नांवापुढें प्रायः वर्म शब्द लाविलेला आढळून येतो.

४ आचार्यांचा रत्नकरंड नांवाचा श्रावकाचार ग्रंथ आहे. हा वाचकांच्या परिचयांतला आहे. या ग्रन्थावर प्रभाचंद्राचार्यांनीं टीका लिहिली आहे. रत्नकरंडक ग्रन्थाबद्दल वादिराज कवि असें ह्मणतात—

त्यागी स एव योगींद्रो येनाक्षय्यसुखावहः ।
अर्थिने भव्यसार्थाय दिष्टो रत्नकरंडकः ॥ १९ ॥

**अर्थः**—याचक अशा भव्य लोकांना ज्यांनीं अनंतसुखाची प्राप्ति करून देणारा रत्नांचा—ज्ञानदर्शनचारित्र या तीन रत्नांचा अमूल्य करंडा देऊन टाकिला ते समंतभद्राचार्य खरोखर 'न भूतो न भविष्यति ' अशा रीतीचे दाते आहेत असें ह्मणावयाला कांहीं हरकत नाहीं.

समंतभद्र आचार्यांचा कर्मप्राभृतावर टीकारूप ग्रन्थ आहे. ही टीका ४८ हजार श्लोकांची आहे. इंद्रनंदि आचार्यांनीं या टीकेचा आ-

यांच्या श्रुतावतारांत उल्लेख केला आहे. तो असा—

> कालांतरे ततः पुनरासींद्यः पलरि तार्किकार्कोऽभूत् ।
> श्रीमान् समंतभद्रस्वामीत्यथ सोऽप्यधीत्य तं द्विविधम् ॥
> सिद्धांतमतः षट्खंडागमगतखंडपंचकस्य पुनः ।
> अष्टौ चत्वारिंशत्सहस्रसद्ग्रंथरचनया युक्ताम् ।
> विरचितवानतिसुंदरमृदुसंस्कृतभाषया टीकाम् ॥
> विलिखन्द्वितीयसिद्धान्तस्य व्याख्यां सधर्मणा स्वेन ।
> द्रव्यादिशुद्धिकरणप्रयत्नविरहात्प्रतिनिषिद्धः ॥
>
> श्लोक १६७ ते १७० पर्यंत.

**अर्थः**—तुंबुलूराचार्यानंतर आनंदनांवाच्या गांवांत तार्किकसूर्य समंतभद्रस्वामी उत्पन्न झाले. त्यांनीं कर्मप्राभृत व कषायप्राभृत या सिद्धांतग्रंथांचें अध्ययन केलें. तदनंतर कर्मप्राभृताच्या सहा भागांपैकीं पांच भागांची ४८ हजार श्लोक प्रमाण टीका त्यांनीं अतिसुंदर संस्कृत भाषेंत लिहिली आहे. कषाय प्राभृत ग्रन्थाची टीका लिहिण्यास हि आचार्यांनीं प्रारंभिलें होतें. परंतु त्यांच्या एका सहाध्याय्यानें निषेध केल्यामुळें त्यांनीं टीका लिहिली नाहीं. द्रव्यादिशुद्धीचा अभाव हें निषेधाचें कारण होतें.

आचार्यांचा ‘ तत्वानुशासन ’ या नांवाचा एक ग्रंथ आहे असें ऐकिवांत आहे. परंतु तो अद्यापि उपलब्ध नाहीं.

आचार्यांनीं व्याकरण ग्रंथ हि लिहिला असावा असें वाटतें. पूज्यपादस्वामींनीं जैनेंद्र व्याकरणामध्यें ‘ चतुष्टयं समंतभद्रस्य ’ या सूत्राच्या उल्लेखानें आचार्यांच्या मतांचा उल्लेख केला आहे. परंतु त्यांच्या व्याकरणाचें अस्तित्व आहे किंवा नाहीं याचा अद्यापि निर्णय झाला नाहीं. हरिवंशकार जिनसेन आचार्य समंतभद्रांनीं जीवसिद्धि या नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे असें ह्मणतात. पण तोही उपलब्ध नाहीं. अनंतकीर्ती या नांवाचे एक आचार्य वादिराज क-

चौथे वेळेस झाले आहेत. त्यांनीही 'जीवसिद्धि' या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे असें वादिराज कवि आपल्या पार्श्वनाथचरितामध्यें लिहितात. परंतु तो ही ग्रंथ उपलब्ध आहे किंवा नाहीं हें समजत नाहीं. आचार्य समंतभद्रांनीं कोणते कोणते ग्रंथ रचिले याचें थोडक्यांत वर्णन केलें. आतां आचार्यांचा समय निर्णय करण्याचा यथाशक्ति प्रयत्न करण्याचें मनांत योजिलें आहे.

## आचार्य समंतभद्रांचा कालनिर्णय.

याविषयीं अनेक मतें आहेत. आचार्य समंतभद्रांनीं या भरतभूमीला आपल्या जन्मानें केव्हां पवित्र केलें याचा निर्णय करणें कठिण आहे. कारण यांच्या कालाचा योग्य निश्चय करण्यासारखें प्रमाण अद्यापि उपलब्ध न झाल्यामुळें अनेकांचे अनेक तर्क चालणें शक्य आहे. आचार्य समंतभद्र हे विक्रमाच्या दुसऱ्या शतकांत झाले आहेत असें कित्येकांनीं ठरविलें आहे, व महामहोपाध्याय पं. सतीशचंद्र विद्याभूषण एम. ए. यांनीं समंतभद्राचार्य ई. सन ६०० मध्यें झाले आहेत असें ठरविलें आहे. परंतु हे दोन्ही तर्क अयोग्य आहेत असें वाटतें. पूज्यपादांनीं जैनेंद्र व्याकरण रचिलें आहे. पूज्यपादांना देवनंदी असें ही दुसरें नांव आहे. या आचार्यांचें चरित्र कर्णाटक भाषेंत एका विद्वानानें लिहिलेलें आढळतें. त्यावरून विचार केला असतां पूज्यपादाचार्य विक्रमाच्या पांचव्या शतकामध्यें झाले असावेत असें ठरतें. येथें पूज्यपादाचार्यांच्या कालाचा निर्णय करण्याचें कारण हें आहे कीं यांनीं आपल्या जैनेंद्र व्याकरणाच्या अंतीं 'चतुष्टयं समंतभद्रस्य' या सूत्रोल्लेखानें भगवान् समंतभद्राचार्यांचा उल्लेख केला आहे. यावरून पूज्यपादाचार्य हे समंतभद्राचार्यांच्या मागाहून झाले आहेत हें सिद्ध होतें. पूज्यपादाचार्य हे अकलंक, विद्यानंद, प्रभाचंद्र, यांच्या पूर्वीं झाले आहेत. कारण, अकलंक व विद्यानंदांनीं पूज्यपादाचार्यांच्या सर्वार्थसिद्धीचें स्पष्टीकरण तत्त्वार्थ वार्तिक व श्लोक-

वार्तिक यामध्ये केलें आहे. पूज्यपाद आचार्यांच्या एक शिष्याचें वज्रनंदी असें नांव होतें. यानें द्राविडसंघाची उत्पत्ति केली असें देवसेन आचार्यांनीं आपल्या दर्शनसार नांवाच्या ग्रंथामध्यें ह्मटलें आहे. तें असें—

सिरिपुज्जपादसिस्सो दाविडसंघस्स कारगो दुट्ठो ।
णामेण वज्जणंदी पाहुडवेदी महासत्तो ॥ २४ ॥

अर्थः—श्री पूज्यपाद आचार्यांच्या वज्रनंदी शिष्यानें द्राविडसंघ उत्पन्न केला. तो प्राभृतशास्त्राचा जाणता होता, व सामर्थ्यवान होता. यानें द्राविडसंघाची उत्पत्ति केव्हां केली याचा उल्लेख असा—

पंचसये छव्वीसे विक्कमरायस्स मरणपत्तस्स ।
दक्खिणमहुराजादो दाविडसंघो महामोहो ॥ २८ ॥

अर्थः—विक्रम राजाच्या मृत्यूनंतर ५२६ वर्षांनीं दक्षिण मथुरेंत [ मदुरा ] महामूढ असा द्राविडसंघ उत्पन्न झाला.

प्रसिद्ध इतिहासज्ञ के. बी. पाठक यांनीं कानडी ग्रंथाच्या आधारें हें सिद्ध केलें आहे कीं दुर्विनीत राजाचे वेळीं पूज्यपादाचार्य झाले आहेत. पूज्यपादाचार्य दुर्विनीत राजाचे गुरु होते. या राजानें विक्रम संवत् ५३५ पासून ५७० पर्यंत राज्य केलें. वज्रनंदि हा जरी पूज्यपाद आचार्यांचा शिष्य होता तथापि त्यानें आचार्यांचें अस्तित्व असतांनाच द्राविड संघाची स्थापना केली असावी. यावरून विक्रम संवत् ५०० पासून ५७० पर्यंत पूज्यपादांचे अस्तित्व होतें असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं हें सिद्ध होतें.

आतां आपण समंतभद्राचार्यांचा काल निर्णय करूं. पूज्यपादाचार्यांच्या काल निर्णयानें समन्तभद्राचार्यांच्या काल निर्णयाला मोठी मदत होते. भगवान् महावीर स्वामी मोक्षाला गेल्यानंतर ६८३ वर्षेपर्यंत भारत वर्षांत अंगज्ञानाची प्रवृत्ति राहिली होती. असें भगवज्जिनसेनाचार्य, हरिवंशकार जिनसेनाचार्य यांनीं क्रमानें आपल्या आदिपुराण व हरिवंश

यामध्यें वर्णिलें आहे. तसेंच इन्द्रनंदि आचार्यांनीही आपल्या श्रुतावतार ग्रंथामध्यें हेंच वर्णिलें आहे. ६८३ वर्षांचा हा काल महावीरस्वामी मोक्षास गेल्यानंतरचा आहे. तो असाः—

६२ वर्षांत ३ केवलज्ञानी
१०० वर्षांत ५ श्रुतकेवली
१८३ ,, ११ मुनि ११ अंगें व दहा पूर्वांचे धारक
१२० ,, ५ मुनि अकरा अंगाचे धारक
११८ ,, ४ ,, आचारांगाचे धारक

६८३ वर्षे.

त्रिलोक प्रज्ञप्ति या नांवाचा ग्रंथ यतिवृषभाचार्यांनीं लिहिला आहे. हे आचार्य समंतभद्र आचार्यांच्या प्रथम झाले आहेत यास्तव हे फार प्राचीन आहेत. यांनींही आपल्या ग्रंथांत महावीरस्वामींच्या नंतरच्या ६८३ वर्षांच्या कालापर्यंत अंगज्ञान होतें असें ह्मटलें आहे. तें असें:—

तेसु अतीतेसु तदा आचारधराण होंति भरहम्मि।
गोदममुणिपहुदीणं वासाणं छस्सदाणि तेसीदी ॥८२॥

भरतक्षेत्रामध्यें सुभद्र, यशोभद्र, यशोबाहु व लोहाचार्य हे चार मुनि आचारांगाचे धारक होते. हे होऊन गेल्यावर मग कोणी अंगाचा धारक झाला नाहीं. याप्रमाणें गोतम गणधरापासून आचारांगधर ४ मुनीपर्यंतचा काल ६८३ वर्षपर्यंतचा आहे हें सिद्ध होतें.

आचारांगधारी मुनि झाल्यानंतर अर्हद्बलि आचार्य झाले. तदनंतर माघनंदि आचार्य झाले. ते स्वर्गवासी झाल्यानंतर धरसेन आचार्य झाले त्यांनीं भूतबलि व पुष्पदंत यांना शिकविले अर्थात् हे दोन मुनि धरसेनाचार्यांचे शिष्य होते. भूतबलीनीं जिनपालितास शिकविलें. तदनंतर गुणधर नांवाचे आचार्य झाले. त्यांचे नागहस्ति व आर्यमक्षु हे दोन मुनि शिष्य होते. या दोघा मुनीजवळ यतिवृषभाचार्यांनीं अध्ययन केलें. हे

यतिवृषभाचार्य त्रैलोक्य प्रज्ञप्तिग्रंथाचे कर्ते होत. हे आचार्य कुंदकुंद आचार्यांच्याही पूर्वी झाले आहेत. कुंदकुंद आचार्यांनीं पंचास्तिकाय समयसारांत ज्या गाथा संगृहीत केल्या आहेत त्यापैकीं कांहीं गाथा या ग्रंथांत आढळून येतात. तसेंच त्रैलोक्यसारामध्यें ही असलेल्या पुष्कळशा गाथा यामध्यें आढळल्या आहेत. ९८७ पासून ९९० पर्यंतच्या त्रैलोक्य सारांतील गाथा त्रैलोक्यप्रज्ञप्तींत आढळून येतात. यावरून त्रैलोक्य प्रज्ञप्तीचा संक्षेप त्रैलोक्यसार हा ग्रंथ असावा असें वाटतें. असो. यतिवृषभाचार्यांचे शिष्य उच्चारणाचार्य या नांवाचे होते. या रीतीनें चालत असलेल्या आचार्यपरंपरेमध्यें कुंदकुंद शहरामध्यें पद्मनंदि नांवाचे मुनि झाले. यांना कुंदकुन्दाचार्य असें ह्मणतात. तदनंतर कांहीं कालानें शामकुंड आचार्य झाले. कांहीं काल गेल्यानंतर तुम्बलूर गांवामध्यें तुंबलूराचार्य नांवाचे मुनि झाले. व तदनंतर तार्किकसूर्य आचार्य समंतभद्र हे झाले.

महावीरस्वामी मोक्षास गेल्यानंतर ६०५ वर्षें व पांच महिन्यांनीं शकराजा अर्थात् शालिवाहन हा उत्पन्न झाला असा त्रैलोक्यसारामध्यें उल्लेख आला आहे. तो असा-

**पण छस्सयवस्सं पण मासजुद गमिय वीरणिव्वुइदो ।**
**सगराजो तो कक्की चदुणवतियमहियसगमासं ॥ ८५० ॥**

शालिवाहन शकाचीं ३९४ वर्षें झाल्यानंतर कल्की उत्पन्न झाला. यावरून शालिवाहनाच्या ८३ व्या वर्षापर्यंत अंगज्ञान भारत वर्षामध्यें होतें. विक्रम संवत् १३४ वर्षांनंतर शालिवाहन शकाला प्रारंभ होतो. अर्थात् ' महावीरस्वामी मोक्षास गेल्यानंतर ४७१ वर्षांनीं विक्रम संवत सुरू झाला. विक्रमसंवत २१२ वर्षेपर्यंत अंगज्ञानप्रवृत्ति होती.

यावरून आपणांस असें दिसून येईल कीं यतिवृषभाचार्य, कुंदकुंद आचार्य, उमास्वामी, समंतभद्र या आचार्यांचें अस्तित्व विक्रम संवत २१२ वर्षेंपर्यंत नव्हतें. यतिवृषभाचार्य कुंदकुंदाचार्य, उमास्वामी व

समंतभद्र यांचा अस्तित्वकाल विक्रमाचें तिसरें किंवा चौथें शतक हें असावें असें अनुमान करतां येईल. यतिवृषभाचार्यांच्या मागून कुन्दकुन्द व तदनंतर उमास्वामी झाले व तदनंतर समंतभद्राचार्य झाले. यावरून समंतभद्राचार्यांचा अस्तित्वकाल विक्रमाचें तिसरें किंवा चौथें शतक असावें असें वाटते.

आचार्य समंतभद्रांचे शिवकोटि मुनि शिष्य होते. विक्रांतकौरव नाटकाच्या शेवटीं प्रशस्तीत हस्तिमल्ल कवीनें शिवकोटि मुनि आचार्यांचे शिष्य होते असें लिहिलें आहे.

शिष्यौ तदीयौ शिवकोटिनामा ।
शिवायनः शास्त्रविदां वरेण्यौ ॥
कृत्स्नश्रुतं श्रीगणिपादमूले ।
ह्यधीतवन्तौ भवतः कृतार्थौ ॥ ४ ॥

भगवान् जिनसेनांनीं शिवकोटि मुनींनीं भगवती आराधना ग्रंथ लिहिला आहे असें आदिपुराणामध्यें म्हटलें आहे.

शीतीभूतं जगद्यस्य वाचाराध्यचतुष्टयम्
मोक्षमार्गं स पायान्नः शिवकोटिमुनीश्वरः ॥

**अर्थः**—ज्यांच्या उपदेशानें दर्शन, ज्ञान,चारित्र व तप या चार आराधनारूपी मोक्षमार्गाचा आश्रय करून जग शांतस्वरूपी झालें. ते शिवकोटि मुनीश्वर आमचें रक्षण करोत ।

समंतभद्र आचार्यांची दिगंबर जैनधर्मातील विद्वानामध्यें किती ख्याति होती, त्यांनीं कोणते ग्रंथ लिहून जैन समाजास ऋणी करून सोडलें, व ते केव्हां झाले या विषयांचा यथाशक्ति येथपर्यंत विचार केला. आतां आचार्यांचे चरित्राची पूर्वाचार्यांनीं जी हकीकत लिहून ठेविली आहे तिचा संक्षेपानें उल्लेख करूं.

आचार्य समंतभद्र हे क्षत्रिय होते, त्यांचें शांतिवर्मा असें नांव होतें व ते राजपुत्र होते असें आम्ही मागें सप्रमाण सिद्ध केलें आहे. आतां त्यांनीं दीक्षा

घेतल्यावर त्यांना काय काय आपत्ति भोगाव्या लागल्या व त्या आपत्तींचा नाश करून त्यांनीं कशा रीतीनें जैनधर्माची प्रभावना केली हें दाखवूं.

दक्षिण प्रांतांत कांची नांवाचें शहर आहे. तेथें न्याय, व्याकरण, काव्य, साहित्य व धर्मशास्त्र यामध्यें अद्वितीय निपुण असे समंतभद्र नांवाचे विद्वान मुनि राहत असत. जसे ते विद्वान् होते तसेच ते चारित्रवान्हि होते. ते निर्दोष चारित्र पाळीत असतां वेदनीय कर्माच्या जबरदस्त उदयानें जेवलेलें अन्न लागलीच भस्म करणारा असा दुःखद भस्मक या नांवाचा रोग त्यांना झाला. त्या रोगानें त्यांना अतिशय वेदना होऊं लागल्या तेव्हां त्यांच्या मनांत तशावेळींहि ' अरेरे या रोगानें मीं फार पीडित झालों असल्यामुळें जैनधर्माची प्रभावना करण्यास असमर्थ झालों ना ? मी या रोगाची दुःसह वेदना सोसण्यास समर्थ आहे. मला हा रोग झाल्यानें विशेष वाईट वाटत नाहीं. परंतु जैनधर्माची प्रभावना करण्याची माझी उत्कट इच्छा मनांतल्यामनांतच जिरून जाणार याबद्दल मला अत्यंत दुःख वाटतें ' इत्यादि सद्विचार येऊं लागले. त्यांनीं रोगाचा नाश ज्यानें होईल तो विधि लौकर करावा असें मनांत आणिलें व तेथून निघून त्यांनीं उत्तर दिशेकडे प्रयाण केलें. ते पुंड्रेन्दु शहरास जाऊन पोहोंचले. तेथें बौद्धांची मोठी दान शाळा होती. येथें आपणास यथेच्छ अन्न मिळेल व आपला रोग नाहींसा होईल या हेतूनें व रोगाच्या असह्यतेनें मुनिधर्म पाळणें अशक्य झाल्यामुळें त्यांनीं मुनिवेष सोडून दिला व ते बौद्ध साधु बनले. परंतु येथेंहि त्यांच्या रोगाचा उपशम करण्यासारखा आहार न मिळाल्यामुळें येथूनहि त्यांनीं प्रयाण केलें. उत्तर प्रांतांतील अनेक गांवामध्यें ते गेले तथापि त्यांच्या रोगाचा नाश करण्यासारखें अन्न मिळालें नाहीं. व त्यांची भूक शांत झाली नाहीं. याप्रमाणें फिरत फिरत कित्येक दिवसांनीं ते दशपुर शहरास गेले. त्या शहरांत वैष्णवांचा मठ होता, तेथें पुष्कळसे वैष्णव साधु रहात असत. त्या

साधूंना त्यांचे भक्त उत्तम आहार देत असत. हें आचार्यांनीं पाहिलें व त्यांनीं बौद्धवेष सोडून दिला. आणि ते वैष्णव साधु बनले. परंतु येथेंहि त्यांना भस्मक रोग विनाशक आहार न मिळाल्यामुळें त्यांना येथूनहि योग्य आहारप्राप्ति करण्यास्तव जावें लागलें. या रोगाची शांति करण्यासाठीं त्यांना अनेक देश फिरवे लागले.

त्यांनीं रोगविनाशाचे उपाय करण्यासाठीं जरी अनेक वेष धारण केले तथापि त्यांनीं आपलें सम्यक्त्व मलिन किंवा नष्ट केलें नाहीं. हे बाहेरून वेषांतर केलेले दिसत असत परंतु त्यांचें अन्तःकरण सम्यक्त्वाच्या प्रकाशानें अत्यंत उज्ज्वल झालें होतें. यावेळेस त्यांचें स्वरूप, चिखलानें भरल्यामुळे वरून मळकट पण आंतून तेजःपुंज असलेल्या मण्याप्रमाणें दिसत होतें. कांहीं दिवसांनीं ते फिरत फिरत वाराणसी अर्थात् काशी येथें आले. तेथील साधु शिवभक्त असल्यामुळें त्यांनीं शैव साधूंचा वेष धारण केला. या वेषानें फिरत असतां त्यां शहरांत शिवकोटी राजानें बांधलेलें एक मोठें शिवमंदिर त्यांच्या दृष्टीस पडलें. तेथें महादेवाच्या पुढें अर्पण केलेला रसभरित पक्वान्नांचा नैवेद्य पाहून या ठिकाणीं अशा तऱ्हेचें पक्वान्न आपणास खावयास मिळाल्यास आपला रोग निःसंशय बरा होईल. असा विचार करून त्यांनीं देवळामध्यें प्रवेश केला व तेथील पुजाऱ्यास हा महादेवास अर्पण केलेला नैवेद्याचा राशि त्यास तुह्मी खाऊ घालू शकत नाहीं काय? असें विचारिलें. आह्मी असमर्थ आहोत असें पुजाऱ्यांनीं सांगितल्यावर आचार्यांनीं मी महादेवास हा सर्व नैवेद्यराशि खात्रीनें खाऊं घालूं शकेन असें हाडलें. आचार्यांचें हें अद्भुत व अश्रुतपूर्व भाषण ऐकून त्यांना फार आश्चर्य वाटलें. कांहीं पुजाऱ्यांनीं त्याचवेळेस राजाला ही हकीकत कळविली. राजाला साश्चर्य आनंद वाटला व त्यानें पुनः महादेवास अर्पण करण्यासाठीं पुष्कळसा नैवेद्य आपल्याबरोबर घेतला आणि तो तेथें आला. महाराज! आपण महादेवाला हा सर्व नैवेद्य खाऊं घालाल काय? असा त्यानें आचार्यांना प्रश्न केला.

आचार्यांनीं होय ह्मणून उत्तर दिलें व तो सर्व नैवेद्याचा ढीग महादेवाच्या जवळ आणिला. सर्वांना त्यांनीं बाहेर जावयास सांगून देवळाचे दरवाजे बंद केले. त्या मोठ्या अन्नराशीला आपल्या उदरामध्यें आचार्यांनीं उदार आश्रय दिला. तदनंतर तीं उष्टीं भांडीं बाहेर नेण्याचा हुकूम त्यांनीं नौकरांना फर्माविला. हें कृत्य पाहून राजाला आनंद व आश्चर्य हीं वाटलीं. तो दररोज मोठ्या भक्तीनें अनेक प्रकारचा नैवेद्य पाठवूं लागला. याप्रमाणें सहा महिनेपर्यंत महाराजांना षड्रसयुक्त अशा पक्वान्नावर यथेच्छ हात मारतां आल्यामुळें भस्मक रोगानें आपलें तोंड काळें केलें. महाराजांचा आहार प्रकृतिस्थ झाला. शरीर नीरोग व तेजःपुंज दिसूं लागलें. आतां नैवेद्य दररोज उरूं लागल्यामुळें पुजाऱ्यांनीं महाराज! अलिकडे नैवेद्य कां उरूं लागला असें विचारिलें.

राजाच्या भक्तीनें महादेव प्रसन्न झाले आहेत. ते आतां कमी जेवतात असें; आचार्यांनीं उत्तर दिलें. ही हकीकत राजालाहि समजली. राजाला आपल्या भक्तीनें महादेव प्रसन्न झाले हें ऐकून आनंद वाटला; परंतु थोड्याच वेळांत त्याचें अंतःकरण संशयानें व्यापून गेलें. तो मनांत ह्मणूं लागला—यांत कांहीं तरी दुसराच प्रकार असला पाहिजे. आपण याची खात्री करून घेतली पाहिजे; असा विचार करून तो देवळांत आला व त्यानें आचार्य दार लाऊन काय करीत असतात हें पाहण्यासाठीं एका ल्हान मुलाला महाराज पाहूं शकणार नाहींत अशा गुप्त रीतीनें ठेविलें. महाराज स्वतःच जेवतात असें त्या मुलाच्या दृष्टीस पडलें. त्यानें ती सर्व हकीकत राजापुढें निवेदन केली. ती हकीकत ऐकून राजाच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन पोहोचली. राजा रागानें ह्मणाला ' अरे जोग्या, मी महादेवास सर्व अन्न खाऊं घालतो ह्मणून स्वतः खात होतास नाहीं कां ? तूं मूर्तिमंत धूर्तपणाचा पुतळा आहेस. बरें, आतां जर तूं महादेवास नमस्कार करणार नाहींस तर येथून तुझी सुटका होणें अशक्य आहे असें समज. आचार्य ह्मणाले

राजन् माझा नमस्कार निर्दोष असे भगवान् जिनेश्वरच सहन करूं शकतात. रागद्वेषानें भरलेल्या तुझ्या देवाला माझा नमस्कार सहन होणार नाहीं. तो फुटून त्याचे तुकडे होतील. आचार्यांचें हें भाषण ऐकून राजाला आश्चर्य वाटलें.

तो ह्मणाला कांहीं हरकत नाहीं परंतु तुला मात्र अवश्य नमस्कार करावा लागेल. तुझ्या नमस्काराचें सामर्थ्य आह्मी पाहणार आहोत. योग्यानें, मी सकाळी माझ्या नमस्काराचें माहात्म्य तुमच्या नजरेस आणून देईन, असें ह्मटलें. राजानें योग्याला मोठ्या बंदोबस्तांत ठेविलें. दोन प्रहर रात्र उलटून गेल्यावर आचार्य मनांत विचार करूं लागले कीं मी तर अविचारानें असें बोलून गेलों. आतां सकाळीं काय होईल हें सांगवत नाहीं. याप्रमाणें चिन्तातुर होऊन मनामध्यें जिनेश्वराचें स्मरण करीत असतां जैन शासनदेवता पद्मावतीचें आसन कंपित झाल्यानें ती तेथें आली व ह्मणाली ' अहो तुह्मी चिंता करूं नका. तुह्मी जें काल बोलून गेलात तें सर्व घडून येईल. पूर्ण शांति देणाऱ्या चोवीस तीर्थंकरांची ' स्वयंभुवा भूतहितेन भूतले ' या पद्यांशाचा आधार घेऊन तुह्मी स्तुति करा ह्मणजे अवश्य तें महादेवाचें लिंग फुटेल. ' असें बोलून ती जिनभक्तितत्पर देवता निघून गेली. आचार्यांना देवतेच्या दर्शनानें मोठा आनंद झाला. त्यांनीं चोवीस तीर्थंकरांची स्तुति रचिली व ते निश्चिन्त चित्त होऊन राहिले. आज सकाळीं आपल्याला अद्भुत प्रकार दृष्टीस पडणार या हेतूनें राजा आपल्याबरोबर पुष्कळशी मंडळी घेऊन तेथें आला. देवळाचा दरवाजा उघडला गेला व त्या योग्याला बाहेर आणिलें. त्या वेळेस त्या योग्याच्या तोंडावर अपूर्व तेजाची सुंदर छटा पसरली होती. तें तेज पाहिल्याबरोबर, हा ह्मणाला त्याप्रमाणें अवश्य होईल, अशी राजाची खात्री झाली. तदनंतर राजानें योग्याला नमस्कार करण्यास सांगितलें, योग्यानें लागलीच मोठ्या भक्तीनें मधुर शब्दांनीं चोविस तीर्थंकरांची

स्तुति करण्याला प्रारंभ केला. क्रमानें सात तीर्थकरांची स्तुति करून योगिराजानें आठव्या तीर्थकरांच्या स्तुतीचा--

* यस्याङ्गलक्ष्मी परिवेषभिन्नं
तमस्तमोरेरिव रश्मिभिन्नम् ।
ननाश बाह्यं बहुमानसं च
ध्यानप्रदीपातिशयेन भिन्नम् ॥३७॥

हा श्लोक उच्चारतांक्षणीं महादेवाचें लिंग ताडकन् फुटलें व त्यांतून जिनेश्वराची चतुर्मुख प्रतिमा बाहेर निघाली. त्यावेळेस राजा व इतर सभ्य जनांना फार आश्चर्य वाटलें.

---

* येथें 'भिन्नं' हा शब्द तीन वेळेस आला आहे. व तिसऱ्या चरणांत 'ननाश' हा शब्द आला आहे. 'भिन्न' शब्दाचा अर्थ फुटणें असा होतो. 'ननाश' या शब्दाचा अर्थ 'नाश पावला' असा होतो. हा श्लोक ह्मणतांनाच तें महादेवांचे लिंग फुटलें यावरून या श्लोकांतील भिन्न व ननाश या शब्दांची सार्थकता मनाला पूर्ण पटतें. या शब्दाच्या रचनेवरूनहि आचार्यांच्या या कथेंत किती सत्यांश भरला आहे हें व्यक्त होतें. तसेंच चंद्रप्रभ तीर्थकरांच्या स्तुतीच्या पहिल्या श्लोकांतच 'वन्दे' मी 'नमस्कार करितो' असा शब्द आला आहे. प्रथमच्या सात तीर्थकरांच्या स्तुतिमध्यें हा शब्द आला नाहीं. तेव्हां आठव्या तीर्थकराची स्तुति करीत असतांना त्यांनीं नमस्कार केला व नमस्कार केल्यानंतर दुसऱ्या श्लोकाचा प्रथम चरण ह्मणता क्षणींच तें फुटून चतुर्मुखी चंद्रप्रभाची प्रतिमा बाहेर निघाली. या सर्व विवेचनावरून ही दंतकथा नसून ही सत्यकथा आहे असें सिद्ध होतें. मल्लिषेण प्रशस्तीमध्यें हेंच सांगितलें आहे. चंद्रप्रभ तीर्थकरांचीच प्रतिमा कां निघावी ? यामध्येंहि कांहीं गूढ आहे. तें असें. महादेवानें आपल्या डोक्यावर चंद्र धारण केला आहे. व चंद्रप्रभ तीर्थकरांनीं आपल्या पदकमलीं चंद्र धारण केला आहे. यावरून महादेवापेक्षां चंद्रप्रभच श्रेष्ठ आहेत. आणि ह्मणूनच महादेवाची पिंड फुटून चंद्रप्रभ प्रतिमा निघाली.

तदनंतर योग्यानें आपली हकीकत राजाच्या आग्रहावरून सांगितली. ( मल्लिषेण प्रशस्तीमध्यें ही हकीकत आली आहे, मागें हिचें वर्णन आलें आहे. तेथें पाहावें. ). योग्यानें आपली हकीकत सांगून आपलें पूर्वीचें स्वरूप प्रगट केलें अर्थात जैन मुनिवेष स्वीकारला. हातांत मयूर—पिंछी धारण केली. तदनंतर अनेक वाद्यांचा पराभव करून जैनशासनाची प्रभावना सर्वत्र केली. हे आचार्य पुढें तीर्थंकर होणार आहेत. याबद्दलचा उल्लेख हस्तिमल्ल कवीनें केला आहे. याचें वर्णन मागें केलें आहे. तसेच भविष्यकाली तीर्थंकर कोणकोण होणार आहेत याविषयीं अशी एक गाथा आहे---

**अट्ठ हरी णव पडिहरि चक्किचउक्कंच एय बलभद्दो ।**
**सेणिय समंतभद्दो तित्थयरा हुंति णियमेण ॥**

**अर्थः**—आठ नारायण, नऊ प्रतिनारायण, चार चक्रवर्ती व एक शेवटचा बलिभद्र, श्रेणिक राजा व समंतभद्राचार्य हे भविष्यकाळीं तीर्थंकर होणार आहेत. पुढें शिवकोटि राजा हा आचार्यांचा शिष्य झाला त्यानें दिगंबर दीक्षा घेतली व आचार्यांजवळ जैन धर्मांतील तत्वाचें अध्ययन करून भगवती आराधना नांवाचा प्राकृत भाषेंत एक अत्युत्तम ग्रंथ बनविला.

याप्रमाणें आचार्यांचें चरित्र संपलें आचार्यांनीं कोणकोणते ग्रंथ लिहिले याचाही उल्लेख मागें केलाच आहे.



## स्वयंभूस्तोत्रांतील स्तुतींची अनुक्रमणिका.

विषय. पृष्ठ.

१ प्रथम तीर्थकरांनीं कर्मभूमि प्रारंभीं जें कार्य केलें त्याचें वर्णन १

२ अजित नांवाची सार्थकता १५

३ संभव नाथांनीं लोकांना कसें सुखी केलें याचें वर्णन. २४

४ गुण ह्मणजे दया. हिच्या पालनासाठीं अभिनंदन जिनांनीं दोन्ही परिग्रहांचा त्याग केला, व रागद्वेषांचा त्याग केला; ह्मणजे, खऱ्या दया-गुणाची प्राप्ति होते असें सांगितलें. रागद्वेषामुळेंच निर्दयता उत्पन्न होते व तीच दुःखाला कारण आहे असेंही त्यांनीं सांगितलें. ३९

५ स्याद्वादाचें अनुसरण केल्यानें आपलें मत सुंदर झालें आहे. अन्य एकांत मतामध्यें कारकादि व्यवस्था होणें असंभव आहे असें सुमति जिनांनीं सांगितलें आहे. ५२

६ पद्म ह्मणजे कमल त्याचा विकास करणारे हे पद्मप्रभ होत. अथवा पद्मा ह्मणजे लक्ष्मी अगर शोभा; तिचें पहिलें स्वरूप सरस्वतीरूपानें प्रगट होतें. त्याचा पूर्ण विकास झाला ह्मणजे सर्वज्ञता प्राप्त होतें. भेददृष्टीनें पाहणारे लोक सर्वज्ञतेबरोबर प्राप्त होणाऱ्या विभूतीला लक्ष्मी मानतात. पण वास्तविक पाहिलें असतां आपल्याशीं सतत अविनाभावी संबंध ठेवणारी जी लक्ष्मी ती सर्वज्ञतेखेरीज दुसरी नव्हे. विद्या अगर ज्ञानाच्या दृष्टीनें तीच विभूति सर्वज्ञता या नांवानें संबोधिली जाते; आणि तिलाच ऐश्वर्याच्या दृष्टीनें लक्ष्मी ह्मणतात. अशी वास्तविक व परिपूर्ण लक्ष्मी पद्मप्रभ देवास प्राप्त झाली. ७२

७ आपले पार्श्वभाग ह्मणजे आजूबाजूची परिस्थिती सुंदर कशानें होते याचें कारण दाखविण्याचे हेतूनें सुपार्श्व तीर्थकरांनीं असें वर्णन केलें कीं, भोग हे रोग आहेत, त्यांच्या कारणभूत विषयसामग्रीला बाजूस सारून आपल्या भोवतालची परिस्थिति शुद्ध केल्यानें स्वास्थ्य

प्राप्त होतें. अशुद्ध पार्श्वभाग, शरीर व इतर विषयांच्या संबंधानें होतात. हे संबंध असले ह्मणजे मनुष्य जरी मृत्युरोगादिकापासून भीतो तथापि ते त्याचा अवश्य पाठलाग करितात. यास्तव मृत्युरोगादिकांचा जेव्हां पूर्ण नाश होतो तेव्हांच आपली मोक्तालची परिस्थिति पूर्ण शुद्ध व सुखयुक्त होते. ८१

८ चंद्रप्रभ हें नांव सार्थक आहे. यांनीं आत्म्यास मलिन करणाऱ्या कषायांचा नाश करून आपल्या आत्म्याचें स्वरूप चंद्राप्रमाणें निर्मल बनविलें. ९३

९ पुष्पदंत अथवा सुविधि यांनीं पदार्थांचे स्वरूप खोट्या एकांताचें खंडन करील असें वर्णिलें. पदार्थांतील एकत्व व अनेकत्व धर्म हे त्या पदार्थापासून सर्वथा वेगळे किंवा अभिन्न नाहींत असें सांगितलें. वाक्यामध्यें गौण अर्थ कोणता व मुख्य अर्थ कोणता समजावा याचें हि यांनीं प्रतिपादन केलें. पदार्थांचा योग्य विधि—ह्मणजे स्वरूप, तें यांनीं दाखऊन दिलें. १०२

१० शीतल जिनेश्वरांनीं सांसारिक सुखाशारूपी अग्नीनें होरपडणारें आपलें मन ज्ञानरूपी पाण्यानें शांत केलें. भव्यजनांनाही हाच उपाय सांगून त्यांच्या मनालाही शांति प्रदान केली. जन्म व जरा यांचा नाश व्हावा हाच शीतल जिनाचा उद्देश होता. यांनीं सर्वांना शांतीचा उपदेश दिला यामुळें याचें शीतल नांव सार्थक आहे. १२२

११ श्रेयोमार्गामध्यें यांनीं भव्यांना आपल्या उपदेशानें स्थिर केलें यास्तव यांचें श्रेयान् हें नांव योग्य आहे. या श्रेयान् जिनांनीं वस्तूंतील धर्मांना मुख्यता व गौणता केव्हां प्राप्त होते हें सांगून श्रेयोमार्ग दाखविला. १३१

१२ पूज्य अशा जिनेश्वराची पूजा करण्यानें जरी थोडेसें पातक होतें, तथापि पुण्यप्राप्ति पुष्कळ होते. तसेंच आपलें परिणाम शुभ

किंवा अशुभ होण्यास बाह्यवस्तु देखील कारण असतें असें वासुपूज्य जिनाच्या स्तोत्रांत सांगितलें आहे. १५२

१३ वस्तु सर्वथा एकधर्मात्मकच आहे असें वर्णन करणारे नय वस्तूंची सिद्धि करू शकत नाहींत. अशा नयांना कुनय ह्मणतात.

स्याद्वादाचा आश्रय घेणारे नय पदार्थांची सिद्धि करितात. कारण, वस्तूंतील ज्या धर्माचें वर्णन ते करितात त्याला ते मुख्यता देतात, व तिच्यांतील इतर धर्मांना गौण समजतात परंतु त्यांचा निषेध करीत नाहींत, यामुळे त्यांना सम्य नय ह्मणतात; असें विमल जिनेश्वरांनीं सांगितलें आहे. १६०

१४ अनंत दोषांचें उत्पत्तिस्थान असा मोह यांनीं जिंकिला यास्तव यांचें अनंत हें नांव सार्थक आहे. या जिनेश्वरांनीं आशारूपी नदी परिग्रह-त्यागरूपी सूर्यकिरणांनीं शुष्क केली. अनंत ह्मणजे संसार हा यांनीं जिंकिला यास्तव यांना अनंतजित् ह्मणतात. १७२

१५ धर्मतीर्थकरांचें धर्म हें नांव सार्थक आहे. कारण, यांनीं धर्माचा व त्याचें स्वरूप वर्णन करणाऱ्या आगमाचाही प्रसार केला. या तीर्थकरांनीं स्वतःला व भव्य जीवांना सुखी केलें यास्तव यांना शंकर असेंहि नांव आहे. १७८

१६ शांति तीर्थकरांनीं सिंहासनस्थ असतांना प्रजेमध्यें शांति उत्पन्न केली व मुनि झाल्यावर पापशांति केली, मोहाचा नाश केला. हे शांति जिनेश्वर शरण आलेल्या भव्यांचें संसारदुःख शमवितात असें यांचें वर्णन आहे. १८५

१७ कुंथु वगैरे सूक्ष्म प्राण्यावर हे दया करितात यास्तव यांचें कुंथु हें नांव अन्वर्थक आहे. आशाग्नीच्या ज्वाला इष्ट वस्तुंच्या प्राप्तीनें सतत वाढत जातात. सुंदर वस्तूंच्या प्राप्तीनें शरीराचा संताप नाहींसा होऊन तें शांत होतें, परंतु आत्म्याची यांच्या योगें केव्हांही तृप्ति होत

नाहीं असें समजून हे विरक्त झाले. १९१

१८ अर जिनाचें सौन्दर्य दोन डोळ्यानें पाहून इन्द्र तृप्त झाला नाहीं यास्तव त्यानें हजार डोळे उत्पन्न करून त्यांचें सौन्दर्य आश्चर्यचकित होऊन पाहिलें. अर जिनेश्वरांनीं आपल्या शरीराच्या कांतीनें बाहेरील अंधकार नाहींसा केला. आपल्या ध्यानरूपी तेजानें अंतःकरणांतील अंधारही नाहींसा केला. अरजिनांनीं स्याद्वादाचें स्वरूप जगाला दाखऊन दिलें. अनेकांत हा सर्वथा अनेकांत नाहीं तो कथंचित् एकांत व कथंचित् अनेकांत आहे. प्रमाणाचे दृष्टीनें तो अनेकांत आहे व नयाच्या दृष्टीनें तो एकांत आहे. १९८

१९ मल्लिनाथ तीर्थंकर प्रत्यक्षज्ञानी होते. स्याद्वादानें भरलेली त्यांची वाणी मुनिजनांना आनंदित करीत असे. अन्यमतीय विद्वान् त्यांच्याशीं वाद करण्यास असमर्थ असत. शिष्यांनीं वेष्टिलेले हे जिनेश ग्रहांनीं वेष्टिलेल्या चंद्राप्रमाणें शोभत असत. २२६

२० यांनीं मुनींच्या व्रतांचा पूर्ण निर्णय केला होता ह्मणून यांचें मुनिसुव्रत हें नांव अगदीं योग्य होतें. हे सर्व मुनींमध्यें श्रेष्ठ व समवसरणामध्यें मुनिवृंदांनीं हमेशा वेष्टिलेले असत. यांचे शरीर इतकें सौम्य दिसत होतें कीं जणू मूर्तिमंत क्षमेचा पुंजच आपल्या पुढें उभा राहिला आहे, जणू साक्षात् तपश्चरणच आपल्या पुढें उभा राहिलें आहे असें वाटत असे. यांची वाणी मधुर व मत लोककल्याणतत्पर होतें. २३२

२१ नमि जिनपति मोक्षमार्गाचा उपदेश करीत असत, सर्व तत्वाचें त्यांना पूर्ण ज्ञान झालें होतें व त्यांनीं कर्मांचा बीमोड करून टाकिला होता. यांनीं पदार्थांच्या धर्मांचे—स्वभावांचे स्यादस्ति, स्यान्नास्ति इत्यदि सात प्रकारांनीं वर्णन केलें. अनेक नयांचा आधार घेऊन वस्तूंचे धर्म भव्यांच्या मनश्चक्षूपुढें यांनीं उभे केले. पूर्णपणें अहिंसा पाळली गेल्यानेंच ब्रह्मपदाची प्राप्ति होते. ही अहिंसा जैनसाधूच पूर्ण

रीतीनें पाळूं शकतात. अन्य मतांतील साधूंना ही केव्हांही पूर्णपणें पाळितां येणार नाहीं. जेथें अणु एवढाहि परिग्रह व आरंभ असेल तेथें ही पाळिली जाणार नाहीं. इचें पूर्ण पालन करितां यावें म्हणून भगवंतांनीं दोन्ही परिग्रहांचा त्याग केला. विकार उत्पन्न होईल असा वेष यांनीं धारण केला नाहीं. यांनीं मदनावर विजय मिळविला. क्रोधादिक विकार नाहींसें करून आत्मा दर्पणाप्रमाणें निर्मल केला. २३७

२२ यांचें अरिष्टनेमि हें नांव सार्थक होतें. नेमि–धांव चाकाच्या धावेखालीं सांपडलेल्या पदार्थांचा जसा चुराडा होतो तद्वत् कर्मांचा चुराडा करण्यास हे चाकाच्या धावेंप्रमाणें असत. हे हरिवंशाचें भूषण होते, व यांनीं इंद्रियविजय कसा करावा हें जनतेला आपल्या आचरणानें दाखविलें. अतींद्रिय, अनंत पदार्थांना एकदम स्पष्टपणें जाणणारें व पाहणारें ज्ञान यांनीं मिळविलें होतें. यांच्या चिरसंबासानें अत्यंत पवित्र झालेला असा ऊर्जयंत पर्वत अत्यंत भक्तिवश झालेल्या भव्याकडून वंदिला जातो. २४६

२३ पार्श्वनाथ तीर्थंकर अत्यंत धीर होत. दुष्ट अशा एका देवानें घोर उपद्रव केला, तथापि तिळमात्रहि हे आपल्या परमात्म ध्यानापासून डगमगले नाहींत. धरणेंद्रानें आपला फणामंडप यांच्या मस्तकावर पसरून उपसर्ग निवारण केला व आपल्या अलोट भक्तीचा जगाला चांगला परिचय आणून दिला. भगवंतांनीं अनेक मिथ्यात्वी तपस्व्यांना जैन मुनि बनविलें. २५६

२४ भव्यांच्या पापांचा नाश करणारें व त्यांना गुणपरिपूर्ण बनविणारें महावीरस्वामींचें शासन या कलिकालामध्येंहि विजय पावतें. यांचें मत समंतभद्र अर्थात् सर्व बाजूनें कल्याण करणारें आहे. कां कीं तें स्याद्वादरूप आहे. २६२

## अधिक खुलासा केलेल्या विषयांची अनुक्रमणिका.


| विषय. | पृष्ठ. | पंक्ति. |
| --- | --- | --- |
| अरहंत वीतराग असूनही हितोपदेशक आहेत. | ३ | १४ |
| केवली कवलाहार घेत नाहींत. | १० | १३ |
| सांख्यांचा आविर्भाव तिरोभावाचें खंडन. | २७ | १ |
| ईश्वर जगत्कर्ता नाहीं. | २९ | १९ |
| बंध व मोक्षाची कल्पना अन्य मतांत जुळत नाहीं. | ३४ | ५ |
| परिग्रह धारण करूनही मोक्ष होतो असें समजणाऱ्या श्वेतांबरांचें खंडन. | ४१ | ४ |
| पदार्थांतील एकत्व व अनेकत्वाचे भेदज्ञान, आणि अभेदज्ञान यांचें वर्णन. | ५६ | १० |
| पदार्थांतील अस्तित्व नास्तित्व स्वभावांचें वर्णन. | ६२ | ६ |
| पदार्थ सर्वथा नित्य व अनित्य नाहींत. | ६६ | १६ |
| पदार्थांतील स्वभाव गौण व मुख्य केव्हां होतात. | ७० | ४ |
| दैवाचें सामर्थ्य. | ८५ | २३ |
| अपेक्षेनें पदार्थांतील नित्यानित्यपणा, एकानेकत्व इत्यादि धर्माची सिद्धि. | १०४ | १२ |
| पदार्थ भावाभावात्मक आहे याचें वर्णन. | १०७ | १ |
| पदार्थ नित्य व अनित्य कसे आहेत हें ओळखण्याचे साधन. | १११ | ५ |
| शब्द एका वस्तूचा वाचक आहे कां अनेक वस्तूंचा वाचक आहे याचें वर्णन. | ११६ | ५ |
| वाक्यामध्यें कोणता अर्थ गौण व कोणता मुख्य मानावा याचें वर्णन. | १२० | ४ |
| यज्ञांत पशुहिंसा करणें धर्मसाधक आहे यांचें खंडन. | १२८ | १ |
| प्रमाणाचें लक्षण, शब्दाची भेदवृत्ति व अभेदवृत्ति | १३६ | ४ |

| | | |
|---|---|---|
| सुनय व कुनय यांचें वर्णन. | १६० | १७ |
| सामान्य व विशेष या धर्मांची सिद्धि. | १६४ | १० |
| जिनेश निरिच्छ असतांही त्यांचा दिव्यध्वनि व शारीरिक मानसिक व्यापार कसें होतात यांचें वर्णन. | १८२ | ६ |
| अनेकांतामध्यें आठ दोष उत्पन्न होतात असें दाखऊन तदनंतर यांचें निरसन. | २११ | २२ |
| सम्यगेकांत व मिथ्याएकांत यांचें वर्णन. | २२३ | १ |
| पदार्थांचें सात प्रकारानें वर्णन. | २४१ | ३ |




ॐ

श्रीवीतरागाय नमः

श्रीसमन्तभद्रस्वामिकृत-

# चतुर्विंशति-जिनस्तुतिः ।

## आदिनाथस्तुतिः ।

स्वयम्भुवा भूतहितेन भूतले,
समंजसज्ञानविभूतिचक्षुषा ॥
विराजितं येन विधुन्वता तमः,
क्षपाकरेणेव गुणोत्करैः करैः ॥ १ ॥

**स्वयम्भुवेत्यादिः**— स्वयं परोपदेशमन्तरेण मोक्षमार्गमवबुद्ध्य अनुष्ठाय वाऽनंतचतुष्टयतया भवतीति स्वयम्भूः तेन **स्वयम्भुवा विराजितं** शोभितं। क्व? **भूतले** पृथ्वीतले। कथंभूतेन? **भूतहितेन** भूतानि प्राणिनस्तेभ्यो हितं हितस्य मोक्षसौख्यस्य प्राप्त्युपायदर्शकत्वेन प्रापकत्वात् परमकारुणिकत्वाच्च, तेन। पुनरपि कथम्भुतेन? **समंजसज्ञानविभूतिचक्षुषा**। सङ्गतं सर्वपदार्थैः सह ग्राहकत्वेन सम्बद्धमंजसमवतथ्यं तच्च तज्ज्ञानंच, तस्य विशिष्टा परमातिशयं प्राप्ता भूतिरुत्पत्तिर्यदि वा विभूतिर्यथावत्सकलपदार्थसाक्षात्कारित्वश्रीः सैव चक्षुर्यस्य तेन। किं कुर्वता तेन चक्षुर्लब्धमित्याह। **विधुन्वता**। किं तत्? **तमः** तमो ज्ञानावरणादि कर्म तत् विधुन्वता विशेषेण निराकुर्वता। कैः? **करैः**, करा रश्मयः सम्यग्दर्शनादिलक्षणाः करा अत्र गृह्यन्ते। किंविशिष्टैः? **गुणोत्करैः** गुणाः स्वर्गापवर्गप्राप्तिहेतुत्वादयस्तेषामुत्करः समूहो येषां ते तैः। केनेव तमो विधुन्वता निराकुर्वता। किं तत्तमः। विराजितमित्याह। **क्षपाकरेणेव** क्षपां रात्रिं करोतीति क्षपाकरश्चन्द्रस्तेनेव। अथवा किं कुर्वता भगवता भूतले विरा-

जिनाननाह । धुन्वता निराकुर्वता । किं तत्तमः प्राणिनामज्ञानलक्षणमन्धकारं । कैः ? करैः । परप्रबोधविधानसामर्थ्यादिह करशब्देन वचनानि गृह्यन्ते । कथम्भूतैस्तैः ? गुणोत्करैः । गुणा अबाधितत्वंयथावस्थितार्थप्रकाशत्वादयस्तेषामुत्करो येषां ते तैः । केनेव कैः ? क्षपाकरेणेव गुणोत्करैः करैः । यथा क्षपाकरेण यथावस्थितार्थप्रकाशकत्वादिगुणोत्करैः करैः रश्मिभिस्तमो विधुन्वता भूतले विराजितं । तथा भगवता वचनकरैः प्राणिगणाज्ञानतमो विधुन्वतेति ।

मराठी अर्थ—दुसऱ्याच्या उपदेशाची अपेक्षा न ठेवतां स्वतःच ज्यांनीं मोक्षमार्गाचें स्वरूप जाणलें आहे, व रत्नत्रयाची प्राप्ति ज्यांना झाली आहे, आणि चारघाति कर्माचा नाश केल्यामुळें ज्यांना अनंत ज्ञान, अनंत दर्शन अनन्त सुख व अनंत शक्ति हीं चार चतुष्टयें प्राप्त झालीं यामुळें ज्यांना स्वयम्भू म्हणतात. ज्यांनीं सर्व संसारी जीवांना मोक्ष–सौख्य–प्राप्तिचें उपाय दाखऊन दिले. व अतिशय दयाळू असल्यामुळें ज्यांनीं भव्यांना हिताची प्राप्ति कशी होते हें दाखऊन दिलें; व जगांतील चराचर पदार्थांना एकदम व स्पष्टपणें जाणणारा असा अतिशयशाली ज्ञानरूपी डोळा ज्यांना आहे. चंद्र जसा आपल्या आल्हादक किरणांनीं अंधकाराचा नाश करतो. त्याचप्रमाणें स्वर्ग व मोक्षाची प्राप्ति करून देण्यास कारण अशा गुणांनीं युक्त असलेल्या रत्नत्रयरूपी किरणांनीं कर्मरूपी अंधकारास ज्यांनीं दूर पळविलें आहे. अथवा चंद्र जसें आपल्या किरणांनीं अंधकाराचा नाश करून लोकांस पदार्थांचें स्वरूप स्पष्ट दाखवितो. त्याचप्रमाणें ज्यांनीं अबाधित व खऱ्या पदार्थांचें स्वरूप जगापुढें मांडतां येईल अशा गुणाला धारण करणाऱ्या आपल्या उपदेशरूपी किरणांनीं भव्य जीवांच्या हृदयांत दडी मारून बसलेल्या अज्ञा-

नांधकाराम दूर पळविले आहे. असे श्री आदिनाथ भगवान् या भूतलावर चिरकाल नांदले.

असा या श्लोकाचा शब्दशः अर्थ झाला. या पहिल्या श्लोकामध्यें प्रथमतःच स्वयंभु हा शब्द आला आहे व त्याचा खुलासाही अर्थ लिहितांना झाला आहे. ह्मणजे तीर्थकरांना जन्मतः तीन ज्ञानें [ मति, श्रुति व अवधि हीं ] असतात. यामुळें त्यांना दुसऱ्याच्या उपदेशाशिवाय मोक्षमार्गाचें स्वरूप समजलेलें असतें व त्यामुळें ते दुसऱ्याच्या साहायाशिवाय रत्नत्रयाची प्राप्ति करून घेतात. यानांच प्रत्येकबुद्ध असेंही ह्मटल्यास कांहीं हरकत नाहीं. कोणत्याही विद्वानाजवळ शिकावें लागत नाहीं. तसेंच आद्य भगवान यांनीं स्वतः आपल्या शंभर मुलांना नानातऱ्हेच्या विद्या व शास्त्रें शिकविलीं यावरूनही ते स्वयंभु होतें हें सिद्ध झालें.

तसेंच याच श्लोकांत दुसरा शब्द ' भूतहितेन ' हा आहे. व याचा अर्थ प्राणिमात्रांना हिताचा उपदेश देणारे असा होतो. आतां तो उपदेश प्राणिमात्राविषयीं प्रेमभाव किंवा दयाभाव असल्यावांचून होणें शक्य नाहीं. व ज्यांना केवलज्ञान उत्पन्न झालें आहे त्यांच्या मोहनीय कर्माचाही नाश झालेला असतो व दयाभाव उत्पन्न होणें हें मोहविशेषाचें कार्य आहे. अर्थात् केवलींच्या ठिकाणीं मोहाच्या अभावामुळें मोहापासून उत्पन्न होणाऱ्या प्रीति परिणामाचा व दयेचाही अभाव होतो व त्यांचा सर्व पदार्थामध्यें उपेक्षाभाव असतो. कारण, रागद्वेषाचा अभाव झाल्यामुळें ते कृतकृत्य झाले आहेत व यामुळें त्यांचा उपेक्षाभावच असतो. तेव्हां त्यांना परमकारुणिक, भूतहित वगैरे विशेषणें लावणें कसें योग्य होईल अशी साहजिक शंका हृदयांत उत्पन्न होते परंतु थोडासा विचार केल्यास या शं-

केचें निरसन होतें. तें असें जिनेश्वरास भूतहित किंवा परम-दयाळ असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण प्राणिमात्रांना हिताचा उपदेश देणें हा त्यांचा स्वभावच आहे. यास उदाहरण दिवा हा स्वतःस किंवा इतर पदार्थांस दयाळपणानें दुःखद अंधकारापासून निवृत्त करीत नाहीं. कारण, स्वतःस व परपदार्थांस अंधकारापासून दूरकरणें हा त्याचा स्वभावच आहे. त्याचप्रमाणें जिनेश्वराचा देखील स्वभाव आहे. तसेंच अंतराय कर्माचा समूळ नाश झाल्यानें अभयदाननांवाची लब्धि उत्पन्न होते, जिच्या योगें जिनेश्वरांस अनंत प्राण्यांना अनुग्रह करण्याची शक्ति प्राप्त होते. तेव्हां जिनेश्वराची हीच उत्कृष्ट दया होय व हिलाच मोहाचा अभाव झाल्यामुळें राग-द्वेषांचा अभाव झाल्यानें परमोपेक्षा हें नांव प्राप्त झालें आहे. तसेंच तीर्थकरत्व नामकर्माचा उदय असल्यामुळें हितोपदेशही होतो, त्यामुळें ते भव्यजीवांचें सांसारिक दुःख हरण करण्यास समर्थ होतात ह्मणून त्यांना दयाळू हितोपदेशक किंवा भूतहित ह्मटलें तरी विरोध येत नाहीं. याप्रमाणें प्रथम श्लोकाचा अर्थ झाला.

गृहस्थावस्थायां इत्थंभूतं वैराग्यं भगवान् गत इत्याह ।

गृहस्थावस्थेंत भगवान् आदितीर्थकरांना वैराग्य कसें झालें हें आचार्य सांगतात.

प्रजापतिर्यः प्रथमं जिजीविषूः
शशास कृष्यादिषु कर्मसु प्रजाः ।
प्रबुद्धतत्त्वः पुनरद्भुतोदयो,
ममत्वतो निर्विविदे बिदांवरः ॥ २ ॥

प्रजापतिरित्यादि । प्रजानां त्रिलोकसकललोकानां पतिः स्वामी यो बभूवेति पदघटना । कदा ? प्रथमं इदानींतनावसर्पिणीचतुर्थकाल-

वर्तिनां सर्वतत्पतीनां आद्यो । **शशास** शिष्टवान् नियोजितवान् । काः? प्रजाः । कथम्भूताः? जिजीविषूः जीवितुमेच्छूः । क ? कर्मसु । केषु, **कृष्यादिषु** कृषिरादिर्येषां कर्मणां सेवादीनां तानि तथोक्तानि तेषु । कथम्भूतः सन्नसौ तां शशासेत्याह : **प्रबुद्धतत्त्वः** प्रकर्षेण बुद्धं ज्ञातं प्रजानां तदद्दष्टं तत्फलानां तत्त्वं स्वरूपं येन सहजविशिष्टमतिश्रुतावधिज्ञानेन प्रजाः तदद्दष्टं तत्फलमन्यच्च सर्वं ज्ञात्वा इदमनेनेत्थं कर्तव्यमिदं वानेनेति नियोजितवान्। **पुनः** पश्चात् । प्रबुद्धतत्त्वः परिज्ञातहेयोपादेयस्वरूपः **अद्भुतोदयः** । अद्भुतोऽचिन्त्य उदयो गर्भावतारादिप्रभृतिषु शक्रादिसंपादितो विभूतिविशेषो यस्य स इत्थंभूतो भगवान् । **निर्विविदे** निर्विण्णवान् । कस्मात् ? **ममत्वतो** ममेति षष्ठ्यन्तप्रतिरूपको निपातः । ममेत्यस्य भावो ममत्वं तस्मात् । यत इत्थम्भूतः सम्पन्नो भगवाँस्ततएवासौ विद्। तत्त्ववेदिनां विपश्चितां **वरः** प्रधानः ।

**मराठी अर्थः**–अवसर्पिणी कालाच्या चौथ्या विभागांत उत्पन्न झालेल्या सर्व राजांच्या प्रथम ज्यांनीं राजपद मिळविलें, व सर्व लोकांचें मोठमोठ्या प्रेमानें ज्यांनीं संरक्षण केलें. आणि आम्हांस जीवनोपाय सांगा म्हणून शरण आलेल्या लोकांना त्यांच्यापुढें होणाऱ्या परिस्थितीचा आपल्या विशिष्ट ज्ञानानें विचार करून असि मसि कृषि वगैरे जीवनांचे उपाय ज्यांनीं सांगितलें व प्रत्येकानें आपआपलींच कामें केलीं पाहिजेत व तसें न केल्यास ते शिक्षेस पात्र होतील असें सांगितलें व त्या त्या कामामध्यें त्यांना नियुक्त केलें. आणि ज्यांना त्याज्य व ग्राह्य पदार्थांचें खरें स्वरूप समजलें आहे असें विद्वच्छ्रेष्ट व ज्यांचीं पंच कल्याणिकें मोठ्या आनंदानें देवांनीं केलीं आहेत असे ते आदि जिनेश्वर ममत्व परिणाम [ संसारांतील मोह ] सोडून पुनः विरक्त झाले.

याचें विशेष स्पष्टीकरण असें आहे कीं अवसर्पिणी काला-

च्या पहिल्या तीन विभागांत या भरत क्षेत्रांत क्रमानें उत्तम मध्यम व जघन्य भोगभूमीची रचना असते. अवसर्पिणी कालाच्या या तिसऱ्या विभागाच्या शेवटीं नाभिकुलकराच्या पोटीं भगवान् आदितीर्थकरांचा जन्म झाला. त्यावेळेस देवांनीं यांना मेरुपर्वतावर नेऊन क्षीरसमुद्राच्या जलानें यांचा अभिषेक केला. तारुण्यामध्यें पुनः देवांनीं येऊन यांचा विवाहोत्सव मोठ्या थाटानें केला व पुढें यांना देवांनीं राज्याभिषेक करून राजसिंहासनावर बसविलें. यावेळेस कल्पवृक्षांचा पूर्ण अभाव झाल्यामुळें सर्व प्रजा जीवनाचा कांहीं तरी उपाय सांगा म्हणून आदितीर्थकराजवळ दीन होऊन आली. त्यांनीं क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे तीन वर्ण उत्पन्न केले व त्यांना जीवनोपाय सांगितला. ग्राम, नगर इत्यादिकांची रचना कशी करावी हेंही सांगितलें व पुष्कळ काळपर्यंत राज्याचा आनंदानें उपभोग घेतला. यांना पंधरावे मनु असेंही म्हणतात. तदनंतर यांना वैराग्य झालें. आतां येथें अशी शंका येईल कीं आदितीर्थकरांनीं षट्कर्मांचा उपदेश कसा केला? कारण, या कर्मांपासून हिंसादिक पापें होतात. तेव्हां असा उपदेश करणें त्यांना योग्य आहे काय? या शंकेचे उत्तर असें आहे कीं ज्यावेळेस त्यांनीं हा उपदेश दिला त्यावेळेस त्यांनीं दीक्षा घेतली नव्हती. ते मुनीपदाला पोहोंचलें नव्हते. त्यांची त्यावेळेस गृहस्थावस्थाच होती व ते सरागी होते म्हणून त्यांचें हें करणें योग्यच होतें. श्लोकामध्यें अद्भुतोदय हें विशेषण जिनेश्वरास लावलें आहे. याचा अर्थ हा आहे कीं प्रत्येक तीर्थकराचीं पांच कल्याणिकें होतात; असा नियम आहे. तेव्हां यांत कांहीं आश्चर्य नाहीं. तशींच पांच कल्याणिकें यांचीही देवांनीं केलीं. परंतु यांच्या विवाहसमयीं व राज्याभिषेकसमयींही देव आले होते व हीं दोन कार्यें

त्यांनीं फार थाटानें केलीं. इतर तीर्थकरांच्या या दोन कार्यीं देव आले नव्हते म्हणून आदि तीर्थकरांच्या या पांच कल्याणिकांत विशेष दिसून आला म्हणजे यांचीं सात कल्याणिकें झालीं असें म्हटलें असतां कांहीं अतिशयोक्ति होणार नाहीं. तेव्हां 'अद्भुतोदयः' हें विशेषण सार्थकच आहे असें सिद्ध होतें.

निर्विण्णः सन्भगवान्किं कृतवानित्याह ।

आदि जिनेश्वरास वैराग्य झाल्यानंतर त्यांनीं काय केलें हें स्तुतिकार सांगतात.

विहाय यः सागरवारिवाससं,<br>
वधूमिवेमां वसुधावधूं सतीम् ॥<br>
मुमुक्षुरिक्ष्वाकुकुलादिरात्मवान्,<br>
प्रभुः प्रवव्राज सहिष्णुरच्युतः ॥ १ ॥

विहायेत्यादि । यो विनिर्विण्णो नाभिनन्दनः स प्रवव्राज प्रव्रज्यां गृहीतवान् । किं कृत्वा ? विहाय वसुधावधूं वसु द्रव्यं दधाति इति वसुधा पृथ्वी सैव वधूः महिला तां । नारकादिवसुधा तेन त्यक्ता भविष्यतीत्याह । इमां दृश्यमानां । किंविशिष्टां ? सागरवारिवाससं सागरः समुद्रस्तस्य वारि पानीयं तदेव वासः परिधानं यस्यास्तां । सकलसमुद्रपर्यंता पृथ्वी त्यक्त्वेत्यर्थः । पुनरपि कथम्भूतां ? सतीमन्येनाभुक्तां । कामिव ? वधूमिव । यथा निर्विण्णेन भगवता सती वधूरन्तःपुरमहिला परित्यक्ता तथा सापीत्यर्थः । किंविशिष्टोसौ तां विहाय प्रवव्राजेत्याह । मुमुक्षुर्मोक्तुमिच्छुर्मुमुक्षुः । संसारसमुद्रादुत्तितीर्षुरित्यर्थः । पुनरपि किंविशिष्टः ? इक्ष्वाकुकुलादिः । इक्ष्वाकवो राजानस्तेषां कुलं वंशस्तस्यादिः । आत्मवान् वश्येन्द्रियः । अतएव प्रभुः स्वतंत्रः । सहिष्णुः परीषहैरपराजितस्तान्सोढुं समर्थ इत्यर्थः । अत एवाच्युतो दुःसहपरीषहक्लेशोपनिपातेऽपि प्रतिज्ञातव्रतादनपसृतत्वात् ।

मराठी अर्थः—संसारसमुद्रांतून तरून जाण्याची इच्छा कर.

णारा इक्ष्वाकु वंशामध्यें प्रथम उत्पन्न झालेला [ इक्ष्वाकु वंशाची स्थापना यांनींच केली ती अशी कल्पवृक्षांचा जेव्हां अभाव झाला त्यावेळेस ऊस पिळून त्याचा रस प्यावा ह्मणजे भूक शांत होईल असा उपदेश त्यांनीं आपल्या प्रजेला केला होता ह्याव- रून आदितीर्थंकरास व त्यांच्या वंशजांस इक्ष्वाकुवंशीय असें ह्मणतात, याविषयीं महापुराणांत जो उल्लेख मिळतो तो हा— आकनाच्च तदेक्षूणां रससङ्ग्रहणे नृणाम् ॥ इक्ष्वाकुरित्यभूद्देवो जगतामभिसम्मतः ]

आपलीं इन्द्रियें स्वाधीन ठेवणारा व ह्मणूनच स्वतन्त्र झा- लेला [ खरें पाहिलें असतां स्वतंत्रता व आत्मोन्नति इन्द्रियांचा पराजय केल्यानेंच प्राप्त होते. आपली इन्द्रियें ताब्यांत ठेविलीं ह्मणजे आपल्या आत्मिक स्वरूपाची प्राप्ति होते व ती प्राप्ति होणें ह्मणजेच वास्तविक स्वतंत्रता होय. कारण जोपर्यंत हीं इंद्रियें आपआपल्या विषयाकडे आत्म्याला खेचून नेतात तोपर्यंत हा आत्मा तद्विषयक सुखांत गुंग होतो व मग त्याला स्वरूपाची बिलकूल ओळख होत नाहीं. यासाठीं त्यांचा पराभवच केला पाहिजे व असें केल्यानेंच आत्मा स्वावलम्बी व स्वतंत्र बनतो. इंद्रियांच्या सुखांत जोपर्यंत आत्मा रममाण होतो तोपर्यंतच संसार आहे व त्यापासून परावृत्त होण्यानें मोक्षाची स्वतंत्रतेची प्राप्ति होते, ] तसेंच रत्नत्रयाची प्राप्ति व्हावी ह्मणून ज्यानें सर्व परिषह सहन केले, व अशा तऱ्हेचे परी- षह सहन करण्याचें सामर्थ्य असल्यामुळें जो तरवारीच्या धा- रेप्रमाणें कठिण अशा तपश्चर्येपासून तिळमात्रही ढळला नाहीं, ह्मणून अच्युत हें नांव ज्याचें सार्थक झालें अशा त्या आदि- तीर्थकरानें आपल्यावर एकनिष्ठेनें प्रेम करणाऱ्या स्त्रीला जसें सोडलें त्याचप्रमाणें अनन्यभुक्त समुद्रवसना पृथ्वीला [ समुद्र-

वलयांकित पृथ्वीला ] सोडलें व दीक्षा घेतली. या श्लोकांतून दुसरा एक भाव निघतो तो असा कीं, ज्यावेळेस आदितीर्थकरांनीं दीक्षा घेतली त्याचवेळेस स्वामिभक्तीनें प्रेरित होऊन पुष्कळशा राजांनीं दीक्षा घेतली अर्थात् ते मुमुक्षु नव्हते. तसेंच ते इंद्रिय वशींही नव्हते, कारण जेव्हां भुकेची तीव्र वेदना होऊं लागली, त्यावेळेस त्यांनीं तपश्चरण सोडून दिलें. व स्वच्छन्द वृत्तीनें ते वागूं लागले. ते सहिष्णु नव्हते म्हणून परीषह सहन केले गेले नाहींत, व प्रतिज्ञातव्रत जें तपश्चरण त्यापासून भ्रष्ट झालें यामुळें त्यांना अच्युत असेंही म्हणतां येत नाहीं. अर्थात् त्यावेळेस आदितीर्थकरांनींच प्रतिज्ञातव्रत उत्कृष्टपणें पाळलें व सर्व राजे त्या व्रतापासून भ्रष्ट झालें हाही भाव या श्लोकापासून व्यक्त होतो.

प्रव्रज्यामादाय भगवान्किं कृतवानित्याह ।

भगवान् आदिजिनानें दीक्षा घेऊन कोणतें कृत्य केलें हें स्तुतिकार सांगतात

स्वदोषमूलं स्वसमाधितेजसा,
निनाय यो निर्दयभस्मसात्क्रियाम्॥
जगाद तत्त्वं जगतेऽर्थिनेऽञ्जसा,
बभूव च ब्रह्मपदामृतेश्वरः ॥ ४ ॥

**स्वदोषे**त्यादि । स्वस्यात्मनो दोषा रागादयस्तेषां मूलं कारणं घातिकर्मचतुष्टयम् । तत् **निनाय** नीतवान् । कां ? **निर्दयभस्मसात्क्रियां** दयातो निष्क्रान्ता निर्दया । सा चासौ भस्मसात्क्रियाच । कार्त्स्न्येन भस्मकरणं भस्मसात्क्रिया । केन ? **स्वसमाधितेजसा** स्वस्य समाधिः परमशुक्लध्यानं स एव तेजोऽग्निः तेन । तत्क्रियां नयन्स किं कृतवानित्याह। **जगाद** कथितवान् । किं ? **तत्त्वं** जीवादिस्वरूपं । कस्मै ? **जगते** प्राणिग-

नाम । कथम्भूताय ? अर्थिने तत्त्वपरिज्ञानाभिलाषिणे । सुगतकपिल-प्रतारकवैमासौ तत्त्वं कथितवान् भविष्यतीत्याह । इति चेत्येत्यध्याहारः । अंजसा परमार्थेन । ननु बुभुक्षादिदुःखपीडितः कदाचिद्वितथमपि कथयिष्यत्यतोऽञ्जसेत्ययुक्तमित्यत्राह । बभूव च ब्रह्मपदामृतेश्वरः । ब्रह्मपदं मोक्षस्थानं तस्य अमृतं अनन्तं सुखं तस्येश्वरः स्वामी । अतः कथं तत्र क्षुद्दुःखलेशोऽपि यतः केवलिभुक्तिपरिकल्पना श्रेयसी स्यात् ॥

मराठी अर्थः—आदितीर्थकरानें आपल्या शुक्लध्यानरूपी अग्नीनें आत्म्याच्या ठिकाणीं असलेल्या रागद्वेषाच्या उत्पत्तीचें मूलकारण अशा चार घातिकर्मांचें निर्दयपणें भस्म केलें, व जीवादिपदार्थांचें स्वरूप जाणण्याची अभिलाषा बाळगणाऱ्या भव्य जीवांना जीवादि तत्वांचें खरें स्वरूप समजाऊन सांगितलें, आणि मोक्षांतील सुखाचें स्वामित्व मिळविलें. विशेष स्पष्टीकरण बुद्ध वगैरे भिन्न मतसंस्थापकांनीं जो उपदेश केला होता तो परमार्थ नव्हता, ह्मणजे सत्य नव्हता. बुद्धादिकांचा उद्देश लोकांना फसविण्याचा होता. व श्री जिनेश्वराचा उपदेश खरा असल्यामुळें यांत फसवेगिरीचा लेशही नाहीं हें सिद्ध होतें. आतां येथें कोणी ह्मणेल कीं, सर्वज्ञ केवली जर आहार करीत नाहींत तर भुकेनें पीडित होऊन एखादेवेळेस ते असत्य देखील उपदेश करतील, तेव्हां त्यांचा उपदेश आह्मी कसा प्रमाण मानावा? या शंकेचें उत्तर आचार्यांनीं असें दिलें कीं, श्री भगवान आदितीर्थंकर मोक्षांत असलेल्या अनंत सुखाचे स्वामी होते. यामुळें त्यांना भुकेची वेदना होत नव्हती व त्यामुळें त्यांच्या ज्ञानांत उणेपणाही न आल्यामुळें त्यांचा उपदेश अबाधित व प्रामाण्ययुक्त होता, हें सिद्ध होतें. याचें स्पष्टीकरण असें कीं, श्वेताम्बर लोक केवली कवलाहार करतात असें मानतात; परंतु त्यांचें हें ह्मणणें योग्य नव्हे. कारण जर

केवलींना भूक लागली तर त्यांच्या अनंत सुखाचा अभाव झाला असें ह्मणावें लागेल, एवढेंच नव्हे तर त्यांच्या अनन्तज्ञान व अनन्तशक्ति व अनन्तदर्शन या गुणांचाही अभाव मानावा लागेल. कारण केवली भुकेनें दुःखित झाल्यामुळें त्यांच्या शक्तीचा ऱ्हास व ज्ञानाचा क्षय आणि अनन्त दर्शनामध्येंही व्यत्यय होणें साहजिक आहे, यास्तव त्यांना भूक लागत नाहीं हें मानणें फारच सयुक्तिक व निर्दोष आहे. अन्यथा केवलीला आपल्या अनन्त चतुष्टयाला तिलाञ्जलि द्यावी लागेल. त्याचप्रमाणें केवली हे रागद्वेष रहित असल्यामुळें देखील आहार करीत नाहींत. कवलाहार केलातर यांना सराग ह्मणावें लागेल. कारण आहार हा स्मरण व इच्छा यांनीं होतो. ह्मणजे ज्यावेळेस आठवण होते व जेवण्याची इच्छा होते त्याचवेळेस मनुष्य जेवण्यास बसतो. व पूर्ण पोट भरल्यावर अरुचि उत्पन्न होते त्यामुळें तो जेवण आटोपतो. तेव्हां अभिलाषा अरुचि वगैरे विकार उत्पन्न झाल्यामुळें केवलीस कसें बरें वीतराग ह्मणतां येईल. यावरून केवली आहार करीत नाहींत हें सिद्ध होतें. जर केवली आहार करीत नाहींत तर त्यांचें शरीर पुष्कळ कालपर्यंत टिकून रहाणार नाहीं हें ह्मणणेंही उचित नाहीं. बाहुबलि, भगवान् आदितीर्थंकर वगैरे साधुजनाच्या शरीरांची स्थिती आहारावाचून वर्षपर्यंत टिकून राहिली असें आपण पुराणांतरीं ऐकतो. वास्तव याठिकाणीं शरीर टिकून राहण्याला आयुकर्मच प्रधान कारण आहे, जेवण वगैरे गौण कारण आहे. तसेंच लाभान्तराय कर्माचा अभाव झाल्यामुळें प्रत्येकसमयीं शरीर पुष्ट करणाऱ्या दिव्य परमाणूंचा लाभ होऊन केवलींचें शरीर पुष्कळ काळ आहाराशिवाय देखील टिकून राहतें.

असातावेदनीय कर्माच्या उदयानें भूक लागते हें जोर

खरी आहे, परंतु मोहनीय कर्माचें त्याला पाठबळ नसल्यामुळें तें आपलें कार्य बजावण्यास समर्थ होत नाहीं. ज्याप्रमाणें मंत्रादिकांनीं निर्विष केलेलें विष प्राणघातक होत नाहीं, त्याचप्रमाणें मोहनीय कर्माच्या अभावीं असातावेदनीय आपला प्रताप दाखवूं शकत नाहीं, यामुळें केवलींना भूक लागत नाहीं हें सिद्ध होतें व त्यामुळें त्यांच्या ज्ञानांत कोणत्याही तऱ्हेनें हीनता येत नाहीं, ज्या योगें त्यांच्या उपदेशांत अप्रामाण्य येईल. तेव्हां या श्लोकांतील ' बभूवच ब्रह्मपदामृतेश्वरः ' हें विशेषण योग्य आहे हें सिद्ध झालें.

अत्राह मीमांसको भगवतोऽतीन्द्रियज्ञानविकलतया सकलार्थपरिज्ञानासम्भवात्कथमञ्जसा तावत्प्रतिपादनं घटेतेत्याह।

मीमांसक हा सर्वज्ञवादी नाहीं तो वेदासच प्रमाण मानतो व त्यापासूनच सर्व पदार्थांचें ज्ञान होतें व मनुष्यांचें ज्ञान अतीन्द्रिय नाहीं. त्याचें ज्ञान इन्द्रियापासूनच उत्पन्न होतें, म्हणून ते सर्व पदार्थांस जाणूं शकत नाहीं. यास्तव जिनेश्वर सर्वज्ञ नसल्यामुळें परमार्थ तत्वाचें प्रतिपादन त्याच्याकडून होणें शक्य आहे काय ? अशी शंका मीमांसकानें केली. या शंकेस उत्तर म्हणून स्तुतिकारानें पुढील श्लोक सांगितला तो असा.

स विश्वचक्षुर्वृषभोऽर्चितः सतां ।
समग्रविद्यात्मवपुर्निरञ्जनः ॥
पुनातु चेतो मम नाभिनन्दनो ।
जिनो जितक्षुल्लकवादिशासनः ॥ ५ ॥

स विश्वचक्षुरित्यादि । स प्रागुक्तविशेषणविशिष्टो भगवान् । विश्वचक्षुः चक्षुरिव चक्षुः केवलज्ञानं, पदार्थप्रकाशनहेतुत्वात् । वि-

अस्मिन् त्रैलोक्योदरवर्तिवरसंघाते चक्षुः प्रकाशकत्वेन प्रवृत्तं केवलज्ञानं यस्य । किंनामासौ ? **वृषभो** वृषो धर्मस्तेन भाति शोभते स वा भाति प्रकटीभवति यस्मादसौ वृषभः । कथम्भूतः ? **अर्चितः** पूजितः । केषां ? **सतां** विपश्चितामिन्द्रादीनां । ननु सकलकर्मक्षयात्पूर्वमसौ विश्वचक्षुरस्तु तत्क्षये तु जडो भविष्यति बुद्ध्यादिविशेषगुणानामत्यन्तोच्छेदात् इति यौगाः । चैतन्यमात्ररूपं इति सांख्याः । अत्राह–**समग्रविद्यात्मवपुर्निरञ्जनः** । अञ्जनाज्ज्ञानावरणादिकर्मणो निष्क्रान्तो निरञ्जनः । सकलकर्मविप्रमुक्तः सन्नात्मा समग्रविद्यात्मवपुर्भवति न जडो नापि चैतन्यमात्ररूपः । समग्रा संपूर्णा जीवाद्यशेषवस्तुविषया विद्या बुद्धिरात्मनो वपुः स्वरूपं यस्य सः । इत्थम्भूतो भगवान् किं करोतु ? **पुनातु** पवित्रीकरोतु सकलदोषविशुद्धं करोत्वित्यर्थः । किं तत्? **चेत** आत्मस्वरूपं । कस्य ? **मम** स्तुतिकर्तुः । पुनरपि कथम्भूतो वृषभः ? **नाभिनन्दनो** नाभेश्चतुर्दशकुलकरस्य नन्दनः सुतः । **जिनो** निखिलबाह्याभ्यन्तरशत्रूणां निर्मूलमुन्मूलकः । **जितक्षुल्लकवादिशासनः** । क्षुल्लकानि लघूनि विशिष्टपुरुषप्रणीतत्वाभावात् । तानि च तानि वादिशासनानि च । परस्परविरुद्धसर्वथानित्यक्षणिकादितत्त्वं वदन्ति इति वादिनः कपिलेश्वरसुगतादयस्तेषां शासनानि मतानि । जितानि क्षुल्लकवादिशासनानि येनेति । अजितक्षुल्लकवादिशासन इति च पाठः । न जितं क्षुल्लकवादिभिः शासनं यस्येति तदर्थः ।

**मराठी अर्थ**—इंद्रादि देवतांकडून ज्याचें पदकमल पूजिलें गेलें आहे असा, त्रैलोक्यांतील सर्व पदार्थांस पहाणारा आहे, केवल ज्ञानरूपी डोळा ज्याचा असा जो सर्व कर्म रहित आहे व सर्व तत्वांना जाणणारें ज्ञान हेंच ज्याचें स्वरूप आहे असा, सांख्य बौद्ध वगैरे क्षुल्लक वाद्यांचीं तत्वें ज्यानें खोडून टाकलीं आहेत असा. बाह्य शत्रुंचा व अंतःस्थ रागद्वेषादि शत्रुंचा ज्यानें नाश केला आहे असा, नाभिराजाचा पुत्र वृषभनाथ तीर्थंकर

माझें आत्म स्वरूप सर्व दोषांनीं रहित करो. वृषभ या शब्दाचा अर्थ याप्रमाणें करतात. वृष ह्मणजे धर्म त्यानें शोभणारा तो वृषभ होय किंवा ज्याचे योगानें धर्माला शोभा आली तो. तात्पर्य-वृषभनाथ तीर्थकरांनीं तृतीय कालाच्या अंतीं जैन धर्माचा प्रसार केला. यावरून त्यांचें ' वृषभ ' हें नांव सार्थक आहे हें सिद्ध होतें. येथें नैयायिक अशी शंका करितात कीं सर्व कर्मे नाहींशीं होण्यापूर्वी जिनेश्वरास सर्वज्ञ ह्मणत असाल तर आमची कांहीं हरकत नाहीं, परंतु सर्व कर्मांचा क्षय झाल्यावर तो सर्वज्ञ असूं शकत नाहीं, कारण ज्यावेळेस आत्म्यास मोक्ष प्राप्त होते, त्यावेळेस त्याच्या ज्ञानादि गुणांचा अत्यंत नाश होतो, त्यामुळें मोक्षामध्यें आत्मा पूर्ण जड असतो. परंतु हें ह्मणणें योग्य नाहीं कारण ज्ञान हा आत्म्याचा असाधारण गुण आहे. त्याचा केव्हांच नाश होणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें तो गुण आत्म्यापासून सर्वथा भिन्न नाहीं कारण सर्वथा भिन्न जे पदार्थ असतात त्यांचा संबंध केव्हांच होत नाहीं. जसें सह्य व विन्ध्य-पर्वत. यावरून आत्म्याचा ज्ञान गुण त्याच्यापासून अगदींच भिन्न नाहीं हें सिद्ध होतें. कारण ज्ञान जर सर्वथा भिन्नच असतें तर ' आत्म्याचें ज्ञान ' असें कसें बरें ह्मणतां येईल. पुद्गलाचा किंवा आकाशाचा ज्ञान गुण आहे असें ह्मणण्यास कोणती हरकत आहे हें समजत नाहीं. यासाठीं त्यास भिन्न कल्पून मुक्त्यवस्थेंत त्याचा नाश मानणें युक्तिसंगत दिसत नाहीं. तसेंच सांख्य हें मोक्षावस्थेंत आत्मा केवळ आपल्या चैतन्य स्वरूपांत राहतो असें ह्मणतात. ह्मणजे त्यांनीं दोन तत्वें मानलीं आहेत. एक प्रकृति व दुसरें तत्व आत्मा, परंतु आत्म्या-मध्यें जे ज्ञान असतें तें प्रकृतीच्या संबंधानें झाल्यानें असतें; व मोक्ष होण्याचे वेळेस प्रकृति आत्म्यापासून सर्वथा वेगळी होते, तेव्हां

ज्ञानही नाहींसें होतें व आत्मा शुद्ध चैतन्य स्वरूपांत विराजमान होतो असें ह्मणतात. परंतु हेंही ह्मणणें उचित नाहीं कारण आपणास जें ज्ञान असतें तें ज्ञानावरणाच्या क्षयोपशमानें उत्पन्न झालेलें असतें व तें प्राकृतिक पौद्गलिक ह्मटलें असतां चालेल. कारण आत्म्याच्या ज्ञानामध्यें त्या पुद्गलांचें मिश्रण झाल्यानें त्याच्यांत कमजोरपणा दिसून येतो. सर्व वस्तूंना जाणण्याची जी त्याची शक्ति त्या शक्तीवर ज्ञानावरणाचें दडपण पडल्यामुळें पूर्णपणें उद्भूत न होतां ती मंद रीतीनें पदार्थांना जाणते यामुळेंच सर्व पदार्थ तिचे विषय होत नाहींत. हें जे स्थित्यंतर होतें याला कारण ती प्रकृति ह्मणजे तो ज्ञानावरणाचा क्षयोपशम होय. परंतु जेव्हां या कर्माचा-प्रकृतींचा पूर्णपणें आत्म्यापासून संबंध सुटतो. तेव्हां वास्तविक त्याचा ज्ञान गुण आपल्या सर्व किरणांनीं सर्व पदार्थांना प्रकाशित करतो ह्मणून सांख्यांचेंही ह्मणणें उचित नाहीं. हें दाखविण्यासाठीं स्तुतिकारानें 'समग्रविद्यात्मवपुर्निरंजनः' हीं विशेषणें देऊन नैयायिक व सांख्य यांचें खंडन केलें आहे. प्रथम जिनाचें स्तोत्र संपलें.

अजितस्तुतिः ।

यस्य प्रभावात्त्रिदिवच्युतस्य
क्रीडास्वपि क्षीबमुखारविन्दः ॥
अजेयशक्तिर्भुवि बन्धुवर्ग-
श्चकार नामाजित इत्यवन्ध्यम् ॥६॥

यस्य प्रभावादिति । यस्य नाम चकार कृतवान् । कोसौ ? बन्धुवर्गः । कथम्भूतस्य ? त्रिदिवच्युतस्य त्रिदिवात्स्वर्गाच्च्युतोऽवतीर्ण-

स्तस्य । किंविशिष्टो बन्धुवर्गः? अजेयशक्तिः न जीयते इत्यजेया श-क्तिः सामर्थ्यं यस्य। क? क्रीडास्वपि, न केवलं महायुद्धेषु । कुतः? प्रभाव।त्माहात्म्यात् । यस्येत्येतदत्रापि सम्बध्यते । पुनरपि किंविशिष्टोसौ? क्ष्वीबमुखारविन्दः । मुखमेव अरविन्दं कमलं मुखारविन्दं, क्षीबं समदं हर्षितं मुखारविन्दं यस्य । इत्थम्भूतो बन्धुवर्गो बन्धुसमूहः क तस्य नाम चकार? भुवि पृथिव्यां । कथम्भूतं नाम? अजित इति न केनचिज्जीयते इत्यजितः । अत एव अवन्ध्यमन्वर्थम् ।

अर्थः—विजय नांवाच्या अनुत्तर विमानांतून अवतीर्ण झालेल्या ज्याच्या पुण्यप्रभावानें, शत्रु जिचें दमन करूं शकत नाहींत अशी प्रचंड शक्ति धारण करणारे, युद्धाची गोष्ट दूरच राहूं द्या परन्तु क्रीडांमध्यें देखील मकरंदपूर्ण विकसित कमलाप्रमाणें ज्यांचीं तोंडें आहेत अशा ज्यांच्या बंधुवर्गानें ज्या तीर्थकराचें अजित हें सार्थक नांव ठेविलें तो अजित जिनेन्द्र आमचे कल्याण करो।

भावार्थः—तीर्थकरप्रकृतीचा बंध ज्यांना झाला आहे अशा विमलवाहन नांवाच्या मुनीनीं समाधिमरण साधून प्राण सोडल्यामुळें तपश्चरणाच्या प्रभावानें त्यांचा जीव विजय नांवाच्या अनुत्तर विमानामध्यें अहमिन्द्र होऊन जन्मला व तेथील आयुष्य संपल्यानंतर ते या भूलोकीं अजित तीर्थकर झाले. यांच्या पुण्यप्रभावानें यांच्या बंधुवर्गास युद्ध व क्रीडेमध्येंही सर्वदा विजय मिळूं लागला, शत्रुंना ते अजिंक्य होऊन बसले. यास्तव बंधुवर्गानीं या तीर्थकराचें अजित हें सार्थक नांव ठेविलें. खरें पाहिलें असतां आपल्या कुटुंबीय जनांची एकसारखी उन्नति होऊं लागली तर तेथें तसाच एखादा पुण्यवान मनुष्य उत्पन्न झाला असावा असें अनुमानानें सिद्ध होतें. जसें धन्यकुमाराचा ज्यावेळेस जन्म झाला तेव्हांपासूनच त्याच्या कु-

टुंबीय लोकांची उन्नति होऊं लागली होती परंतु जेव्हां त्याच्या सात बंधूंनीं त्यास मारहाण करून हाकून लाविलें, तेव्हांपासूनच त्यांच्या अवनतीस प्रारम्भ झाला, व ते सर्व भिकेस लागले. यावरून पुण्यवान मनुष्याचा जन्म झाल्यानें सर्वत्र विजय व कीर्तीही मिळते; व उन्नति होते. त्या मनुष्याच्याअभावीं अवनति होते. अजित तीर्थकर हे अतिशय पुण्यश्लोक सत्पुरुष असल्यामुळें यांच्या जन्मापासून त्यांच्या कुटुंबीय जनांची अलौकिक उन्नति झाली व त्यांचा सर्वत्र विजय झाला; यामुळें बन्धुवर्गांनीं यांचें अजित हें सार्थक नांव ठेवलें.

अत एवेष्टप्रयोजनप्रसिद्ध्यर्थं भव्यजनैरिदानीमपि तदुच्चार्यत इत्याह।

म्हणूनच मंगलकार्याची निर्विघ्न समाप्ति व्हावी यासाठीं भव्य-जीव आजदेखील अजिततीर्थकराचें नामस्मरण करितात हें स्तुतिकार या श्लोकांत सांगतात-

अद्यापि यस्याजितशासनस्य ।
सतां प्रणेतुः प्रतिमंगलार्थम् ॥
प्रगृह्यते नाम परं पवित्रं ।
स्वसिद्धिकामेन जनेन लोके ॥७॥

अद्यापीत्यादि । अद्यापि इदानीमपि, न केवलं तत्काले । यस्य अजितस्य भगवतः । कथम्भूतस्य ? अजितशासनस्य अजितमनिराकृतं परवादिभिः शासनमनेकान्तमतं यस्य तस्य । कथम्भूतस्य ? सतां प्रणेतुः सतां भव्यानां प्रणेतुः सन्मार्गे प्रवर्तकस्य । नाम प्रगृह्यते उच्चार्यते । परमुत्कृष्टं पवित्रं सकलमलविलयकारणं । केन ? जनेन । कथम्भूतेन ? स्वसिद्धिकामेन स्वस्य सिद्धिः परपरिभवेनात्मनोऽभिप्रेतप्रयोजननिष्पत्तिः तत्र कामो यस्य तेन । आत्मजयाभिलाषिणा इत्यर्थः । किमर्थं ? प्रतिमंगलार्थं मंगलं मंगलं प्रति । सिद्धिनिमित्तमित्यर्थः । क ? लोके यस्य भगवतो नाम गृह्यते ।

मराठी अर्थ—भव्यांना सन्मार्ग दाखविणाऱ्या व बौद्ध-नैयायिक इत्यादि परवाद्याकडून अभेद्य अशा अनेकान्तमार्गाचा प्रसार करणाऱ्या हे जिना, संपूर्ण पातकराशींचा नाश करण्यास समर्थ असलेलें तुझें नांव भव्यजीव प्रत्येक मांगलिक कार्याच्या प्रारंभीं विघ्नांचा नाश होऊन स्वकार्यांची सिद्धि व्हावी म्हणून याजगीं अद्यापि घेतात.

भावार्थ—प्रत्येक मांगलिककार्याचें प्रारंभीं श्री जिनेश्वराचें मंगलदायकनांव अवश्य घेतलें पाहिजे. कारण त्या योगें आपलें कार्य निर्विघ्न पार पडतें. व जिनेश्वराचें नामस्मरण केल्यानें पापांचा नाश होतो व पुण्यांची प्राप्ति होतें व त्यायोगें शुभकार्यांत अडथळा आणणाऱ्या विघ्नांचा परिहार होतो. तसेंच त्यांचें नामस्मरण केल्यानें आपलें अंतःकरण पवित्र होतें. भगवज्जिनसेनांनीं महापुराणामध्यें नामस्मरणाचें महत्व याप्रमाणें वर्णिलें आहे—

नामग्रहणमात्रं च पुनाति परमेष्ठिनाम् ।
किं पुनर्मुहुरापीतं तत्कथाश्रवणामृतम् ॥ १ ॥

परमेष्टींचें केवळ नामस्मरणानें आपलें अंतःकरण शुद्ध होतें; तर अशा महात्म्यांचीं चरित्रें श्रवण केल्यानें किंवा त्यांचें गुण गान केल्यानें मन कां बरें पवित्र होणार नाहीं ! या आचार्यांच्या उक्तींवरून नामस्मरणाचें महत्त्व व्यक्त होतें, व त्याचा प्रभाव अवर्णनीय कसा आहे हें सिद्ध होतें.

स किमर्थं प्रतिबन्धकप्रक्षयं कृत्वा सर्वज्ञः प्रादुर्भूत इत्याह ।

श्री अजितजिनेश्वर घातिकर्मांचा नाश करून सर्वज्ञ कशाकरितां झाले. याचें स्तुतिकार या श्लोकांत वर्णन करितात.

यः प्रादुरासीत्प्रभुशक्तिभूम्ना ।
भव्याशयालीनकलंकशान्त्यै ॥

महामुनिर्मुक्तघनोपदेहो ।

यथारविन्दाभ्युदयाय भास्वान् ॥ ८ ॥

**यः प्रादुरासी**दित्यादि । **यो** भगवान्**प्रादुरासी**त्प्रादुर्भूतवान् । किमर्थं ? **भव्याशयालीनकलंकशान्त्यै** । भव्यानामाशयश्चित्तं चिद्रूपमात्मस्वरूपं तत्रालीनो लग्नः सचासौ कलंकश्च अज्ञानं तत्कारणं ज्ञानावरणादि कर्म, तस्य शान्त्यै विनाशाय । भव्यप्रतिबोधनार्थमित्यर्थः । केन? **प्रभुशक्तिभूम्ना** प्रभवति समर्थो भवत्युपकारं कर्तुमिति प्रभुर्जगतामुपकारको भगवान्, तस्य शक्तिर्वाणी, यया तेषामुपकारं कर्तुं शक्तो भवति तस्या भूम जीवाद्यर्थप्ररूपणे माहात्म्यविशेषः प्राचुर्यं वा, तेन । कथम्भूतोसौ ? **महामुनिः** । गणधरदेवादिमुनीनां प्रधानः प्रत्यक्षज्ञानी वा । क इव करनै प्रादुरासीदित्याह मुक्त इत्यादि । **यथा भास्वा**नादित्यः । प्रादुरासीत् । किमर्थं ? **अरविन्दाभ्युदयाय** । अरविंदानां अभ्युदयो विकाशलक्षणा विभूतिस्तस्मै । किंविशिष्टो भास्वान् ? **मुक्तघनोपदेहः** । मुक्तो घनैरुपदेह उपलेपः प्रच्छादनं यस्य । तदर्थं कलंकशान्त्यर्थम् ।

**मराठी अर्थः**—ज्याप्रमाणें आपल्या तेजस्वी किरणांनीं आपल्यास घेरून टाकलेल्या मेघसमूहास दूर सारून कमलांना विकसित करण्यासाठीं सूर्य उदय पावतो; तद्वत् गणधरदेवादि मुनींमध्यें श्रेष्ठ व प्रत्यक्षज्ञानी असे अजित भगवान् द्रव्यांचे निर्बाध वर्णन करण्यास समर्थ असलेल्या आपल्या दिव्यध्वनीनें भव्य जीवांच्या आत्मस्वरूपामध्यें अनादिकालापासून विलग्न-लेल्या अज्ञानाचा व त्यास कारण असलेल्या ज्ञानावरणादि कर्मांचा नाश करण्यासाठीं उत्पन्न झाले. म्हणजे त्यांनीं आत्मस्वरूपाचा उपदेश करून भव्यजीवांच्या तद्विषयक अज्ञानाचा नाश केला.

**भावार्थः**–सूर्य उगवला म्हणजे कमलें विकसित होतात. कमलांना विकासित करण्यामध्यें सूर्याचा कोणताही स्वार्थ नसतो किंवा कमलावर सूर्याचें प्रेम आहे असेंही नाहीं. तेव्हां सूर्याचा कमलांना विकासित करण्याचा स्वभावच आहे असें म्हटलें पाहिजे. तद्वत् जिनेश्वरांचा भव्यजीवांना उपदेश करण्यांत कोणताही स्वार्थ नाहीं अथवा त्यांच्यावर प्रीति आहे असेंही नाहीं तेव्हां येथें उपदेश करण्याचा त्यांचा स्वभावच आहे असें सिद्ध होतें. यावरून जिनेश्वरांना रागभाव नाहीं व कृतकृत्य झाल्यामुळें त्यांचा कोणताच स्वार्थही राहिला नाहीं कीं ज्याच्या सिद्ध्यर्थ ते भव्यजीवांना उपदेश करतील. परोपकार करणें हा सत्पुरुषांचा स्वभावच आहे यामुळें जिनेश्वरांचा निरपेक्ष उपदेश लोकांच्या कल्याणार्थ होत असतो.

प्रादुर्भूतेन च तेन किंकृतमित्याह ।

उत्पन्न होऊन अजित तीर्थकरांनीं काय केलें हें स्तुतिकार या श्लोकांत सांगतात.

येन प्रणीतं पृथु धर्मतीर्थं,
ज्येष्ठं जनाः प्राप्य जयन्ति दुःखम् ।
गाङ्गं ह्रदं चन्दनपङ्कशीतं,
गजप्रवेका इव घर्मतप्ताः । ९ ।

येनेत्यादि । येन अजितनाम्ना तीर्थकरदेवेन । प्रणीतं प्रकाशितं । किं ? धर्मतीर्थं । धर्मस्य उत्तमक्षमादिलक्षणस्य चारित्रलक्षणस्य च प्रतिपादकं तीर्थं श्रुतं । कथम्भूतं ? पृथु महत् । सकलपदार्थविषयत्वात् ज्येष्ठं सकलधर्मतीर्थप्रधानं । पुनरपि कथम्भूतं ? जनाः प्राप्य जयन्ति दुःखं । यदित्यध्याहार्यं । यद्धर्मतीर्थं प्राप्य लब्ध्वा जना भव्या जयन्ति निराकुर्वन्ति दुःखं संसारपरिभ्रमणक्लेशं । किमिव कथम्भूतं के इत्याह ।

**गाङ्ग**मित्यादि । गंगाया अयं गांगो ह्रदस्तं । कथम्भूतं ? **चन्दन-पङ्कशीतं** चंदनस्य पंकं यक्षकर्दमस्तस्य शीतमिव शीतं यस्य तं ह्रदं प्राप्य । **गजप्रवेका इव** । गजानां प्रवेकाः प्रवरा यथा घर्मेण तप्ता जयन्ति दुःखमिति ।

**मराठी अर्थ**—जसे ग्रीष्मऋतूंतील सूर्याच्या प्रचुर किरणांनीं दुःखित झालेले मोठे हत्ती चन्दनाच्या उटीप्रमाणें थंडगार असलेल्या गंगेच्या डोहांत शिरून उत्पन्न झालेलें दुःख नाहींसे करतात; त्याचप्रमाणें उत्तमक्षमादि दशधर्म व चारित्राचें सांगोपांग वर्णन करणारें, संपूर्ण तत्वांचें प्रतिपादन करणारें असल्यामुळें अतिशय मोठें असें, अजिततीर्थकरांनीं प्रतिपादिलेलें जें द्वादशांगश्रुत त्याचा आश्रय करून अथवा अध्ययन करून भव्यजीव संसारपरिभ्रमणापासून होणारें दुःख नाहींसें करतात.

**भावार्थ**—उष्णतेपासून जें दुःख होतें तें नाहींसे करण्यासाठीं थंड उपचार करतात, तद्वत संसारापासून उत्पन्न झालेल्या दुःखांचा परिहार करण्यासाठीं भव्य जीवांनीं अजिततीर्थकरांनीं उपदेशिलेल्या परमशांतिदायक आगमचा आश्रय केला व आपलें चिरकालचें संसारदुःख दूर केलें.

ननु किं फलमुद्दिश्य भगवता धर्मतीर्थं प्रणीतमित्याह ।

कोणत्या फलाची इच्छा धरून भगवान् अजित तीर्थकरानें आगमाची रचना केली हें स्तुतिकार व्यक्त करतात ।

स ब्रह्मनिष्ठः सममित्रशत्रु-
विंद्याविनिर्वांतकषायदोषः ॥
लब्धात्मलक्ष्मीरजितोऽजितात्मा ।
जिनः श्रियं मे भगवान्विधत्ताम् ॥ १० ॥

**स ब्रह्मनिष्ठ** इत्यादि । सोऽजितो भगवान् । **ब्रह्मनिष्ठः** ब्रह्मणि सकलदोषरहिते परमात्मस्वरूपे निष्ठा परिसमाप्तिर्यस्य । अतो न किंचित्तत्प्रणयने फलमसावपेक्षते कृतकृत्यत्वात् केवलं परार्थैवास्य प्रवृत्तिः । अत एव **सममित्रशत्रुः** । मित्राणि च शत्रवश्च मित्रशत्रवः । ते समा यस्य । कथमसौ ब्रह्मनिष्ठः कथं वा सममित्रशत्रुरित्याह-**विद्ये**त्यादि । विद्यया परमागमज्ञानतदर्थानुष्ठानलक्षणया विशेषेण निर्वान्तास्त्यक्ताः कषाया द्रव्यक्रोधादयो दोषा भावक्रोधादयो येन । निराकृतद्रव्यभावरूपघातिकर्ममलकलंक इत्यर्थः । यत एवंविधोऽसौ ततो ब्रह्मनिष्ठः सममित्रशत्रुश्च भवति । भवतु तथाविधोसौ तन्निष्ठस्तथापि तदा चैतन्यमात्रस्वरूपः किंचिज्ज्ञो वा भविष्यति । अतः कथं धर्मतीर्थं प्रणीतवानित्याह-**लब्धात्मलक्ष्मीरिति** । आत्मनो लक्ष्मीरनन्तज्ञानादिलक्षणा । लब्धा प्राप्ता सा येनासौ लब्धात्मलक्ष्मीः । समासान्तो विधिरनित्य इति वचनाद्कणोरिति कप् न भवति । स इत्थम्भूतोऽजितः । अन्तरंगैर्बाह्यैश्च शत्रुभिर्न जीयते इति अजितः । **जितात्मा** जित आत्मा येनासौ जितात्मा । आत्मवान् इत्यर्थः । इन्द्रियाधीनो न भवतीति यावत् । **भगवान्** विशिष्टज्ञानवान्पूज्यो वा । **विधत्तां** करोतु । कां? **जिनश्रियं** जिनस्य श्रीरनन्तज्ञानादिविभूतिस्तां मे मह्यं ।

**मराठी अर्थः—अठरा दोषांनींरहित अशा परमात्म स्वरूपाची प्राप्ति ज्यांस झाली आहे. व म्हणूनच परमागमाची रचना करण्यांत परोपकाराशिवाय दुसरा कोणताही उद्देश ज्यांचा नव्हता; कारण, स्वतः कृतकृत्य असल्यामुळें ते निरिच्छ होते. म्हणून परोपकाराशिवाय दुसरा कोणता वरें उद्देश असं शकेल ? यामुळेंच मित्र व शत्रु या उभयतांवर समान दृष्टि ठेवणारे व केवल ज्ञानाची प्राप्ति व चारित्र गुणाची पूर्ति झाल्यानें द्रव्य क्रोधादि व भावक्रोधादि दोषांचा नाश ज्यांनीं केला, अर्थात् घातिकर्ममलांचा ज्यांनीं नाश केला आहे, व**

अनन्त चतुष्टयरूपी लक्ष्मी ज्यांस प्राप्त झाली आहे असे, आणि अन्तरङ्ग व बाह्य शत्रुकडून जे जिंकले गेले नाहींत, तसेंच ज्यांनीं आपल्या आत्म्याला इन्द्रियांच्या आधीन होऊं दिलें नाहीं असे ते पूज्य ज्ञानी अजित तीर्थंकर अन्तरङ्ग अनन्त-ज्ञानादि चतुष्टय लक्ष्मी व बहिरङ्ग समवसरण लक्ष्मी ही मला प्रदान करोत.

भावार्थ—ज्याला आपल्या आत्म्याच्या स्वरूपाची प्राप्ति झाली आहे तो आत्मा निरिच्छ असतो व त्याचा उपदेश निरपेक्ष असतो त्या उपदेशापासून त्याला स्वतःला कोणताच स्वार्थ साधून घ्यावयाचा नसतो. अशा महात्म्याचीं कृत्यें सर्व परोपकारार्थच होत असतात. आणि यामुळेंच मित्र व शत्रु, कांचन व मृत्तिका यांच्याकडे ते समान दृष्टीनेंच पाहत असतात. जसें चंदनाचें पोषण करणाऱ्या व त्यास कुऱ्हाडीनें तोडणाऱ्या दोन्हीं व्यक्तींला तो चंदन वृक्ष आपल्या सुगंधानें आनंदित करितो. याचप्रमाणें सज्जन व दुर्जन यांच्याविषयीं हे आदर्श पुरुष समदृष्टि असतात. व अशा माहात्म्यांनाच अविनाशी ज्ञानादि संपत्ति प्राप्त होत असते. इन्द्रियांचा विजय अशांच्या हातूनच होत असतो. यास्तव महात्मा अजित भगवान् मला आपली ज्ञानादि संपत्ति देवोत.

याप्रमाणें द्वितीय जिनाचें स्तोत्र संपलें.

ह्या पांच पद्यामध्यें उपजाति छंद आहे.

---

संभवजिनस्तुतिः ।

त्वं शम्भवः सम्भवतर्षरोगैः
सन्तप्यमानस्य जनस्य लोके ।
आसीरिहाकास्मिक एव वैद्यो
वैद्यो यथानाथरुजां प्रशान्त्यै ॥ ११ ॥×

त्वं शम्भवइत्यादि । समन्तभद्रस्वामी तृतीयतीर्थकरदेवं चेतसि प्रत्यक्षतया व्यवस्थाप्य त्वमित्याचाह । शम्भव इत्यन्वर्थेयं संज्ञा शं सुखं भवत्यस्माद्भव्यानां इति शम्भवः । शम्भवेत्यादि । शं सुखं भवति येभ्यस्ते शम्भवाः स्रग्वनितादयः । यदिवा संगतोऽनुव्यद्रपप्रादुर्भावो यत्रासौ सम्भवः संसारः तत्र तर्षः तृष्णाः ता एव रोगा दुःखहेतुत्वात् तैः । सन्तप्यमानस्य पीड्यमानस्य । जनस्य प्राणिगणस्य । आसीरभूः । वैद्यः । क ? इह लोके । कथम्भूतः ? आकस्मिक एव तत्फलनिरपेक्ष एव । अत्र दृष्टांतमाह—वैद्यो यथेत्यादि । वैद्यश्चिकित्सकः । यथा येन फलानपेक्षप्रकारेण । अनाथरुजां अनाथा अशरणा द्रव्यसहायहीनास्तेषां रुजो व्याधयस्तासां । प्रशान्त्यै उपशमनाय । आकस्मिक एव वैद्योभूत् तथा त्वमप्यासीः ।

**मराठी अर्थः**—जसें एखादा दयाळु वैद्य द्रव्याची इच्छा न करतां द्रव्यसहाय ज्यांना नाहीं अशा गरीब प्राण्यांचे रोग नाहींसे करतो; ह्मणजे त्यांनीं न बोलावतांच स्वतः दयेनें प्रेरित होऊन त्यांच्या घरीं जो वैद्य जातो व त्यांचीं दुःखें [ रोग ] बरीं करतो त्यास आकस्मिक वैद्य ह्मणतात. त्याचप्रमाणें भव्यजीवांचें कल्याण करणाऱ्या हे संभवनाथजिना तूं संसारिक सुखांना [ सुखाभास ] देणाऱ्या स्त्रीपुत्राविषयीं उत्पन्न झालेल्या

× येथून पांच श्लोकांत इन्द्रवज्रा छन्द समजावा.

तृष्णारूपी रोगांनीं पीडित झालेल्या प्राण्यांना रोगरहित करण्याकरितां या जगांत आकस्मिक अपूर्व वैद्य आहेस.

तात्पर्यः—दयाळू व वैद्यशास्त्रनिपुण असा वैद्य कांहींहीं इच्छा न धरतां रोग्यांचे रोग बरे करीत असतो. व एखादा दुर्वैद्य रोग्याचे रोगांचा नाश न करतां त्या रोगांची वृद्धि करतो. त्याचप्रमाणें श्रीजिनेश्वर हे अपूर्व वैद्य आहेत व ते अनादि कालापासून सर्व जीवांच्या पाठीमागें लागलेल्या संसाररूपी भयंकर रोगाला निरपेक्षपणें दूर करतात. व ब्रह्मा विष्णु महेशादिक हे दुर्वैद्य आहेत. यांच्यापासून आमच्या संसार रोगाची व्यथा दूर न होतां प्रतिदिन ती वाढत जाईल, यासाठीं अशा दुर्वैद्यांच्या नादीं न लागतां भव्य जीवांनीं संसाररूपी रोग दूर करण्यासाठीं आकस्मिक अपूर्व वैद्य जे श्रीजिनेश्वर, यांचा आश्रय घेतला पाहिजे व आपला संसाररूपी रोग दूर केला पाहिजे.

यस्य जगतो भगवानाकस्मिको वैद्यः संपन्नः तज्जगत्कीदृशमित्याह ।

ज्या जगावर आकस्मिक वैद्याप्रमाणें यांनीं उपकार केले त्या जगाचें स्वरूप स्तुतिकार वर्णितात.

अनित्यमत्राणमहंक्रियाभिः,
प्रसक्तमिथ्याध्यवसायदोषम् ।
इदं जगज्जन्मजरान्तकार्त्तं,
निरंजनां शान्तिमजीगमस्त्वम् ॥१२॥

अनित्यमित्यादि । इदं प्रतीयमानं, जगत् प्राणिसंघातः । कथंभूतं ? अनित्यं विनश्वरं । अनेन सर्वमाविर्भावतिरोभाववदिति सांख्यमतं प्रत्युक्तम् । पुनरपि कथम्भूतं ? अत्राणं न विद्यते त्राणं रक्षणं अस्येत्यत्राणं । अशरणमित्यर्थः । अनेनेश्वरो विष्णुर्वा तस्य भर्तेति योगमी-

मांसकमतं निरस्तं । कथं तदत्राणमित्याह अहंक्रियाभिरित्यादि । अहमस्य सर्वस्य स्त्र्यादिविषयस्य स्वामीति क्रिया अहंक्रियाः ताभिः प्रसक्तः संलग्नः प्रवृत्तो वा मिथ्या असत्योऽध्यवसायोऽभिनिवेशः स एव दोषो यस्य तत्तथोक्तं । अतएव जन्मजरांतकार्त्तं तज्जगत् । जन्म प्रादुर्भावो, जरा वृद्धत्वं, अन्तको मरणं, तैरार्त्तं पीडितं । तदित्थंभूतं जगत्कि कृतवान्भगवानित्याह । निरंजनामित्यादि । शान्तिं परमकल्याणं । अजीगमस्त्वं । इदं जगत्प्रापितवांस्त्वं । कथम्भूतां ? निरंजनां अंजनात्कर्ममलान्निष्क्रांतं तद्वा निष्क्रांतं यस्याः सा निरंजना तां । मुक्तिरूपामित्यर्थः ।

मराठी अर्थः–हें दिसणारें सर्व जगत् ( प्राण्यांचा समूह ) अनित्यक्षणांत नाश पावणारें आहे अर्थात् स्वप्नांत दिसणाऱ्या पदार्थाप्रमाणें लौकरच नाश पावणारें आहे, या जगांतील कोण्त्याही प्राण्यांचा कोणी संरक्षक नाहीं. आयुकर्म जोपर्यंत या जीवांस एका शरीरामध्यें कोंडून ठेवतें तोपर्यंत हे जीव या शरीरामध्यें राहतात व त्याचा क्षय झाला म्हणजे त्या जीवांचें एक क्षण पर्यंतही इंद्रादिक शक्तिशाली देव रक्षण करूं शकत नाहीं. यास्तव या जगाचा कोणीही संरक्षक नाहीं. तसेंच हें जगत् स्त्री-पुत्र द्रव्य इत्यादिकांचा मी स्वामी आहे अशा मिथ्या कल्पनेनें दूषित झालेलें आहे. व हें जगत् पुनर्जन्म, जरा व मरण या तीन भयंकर दुःखांनीं हमेशा पीडित झालेलें आहे. हे जिनेश सम्भवनाथ ! अशा जगतास आपण कर्मोपदेश करून त्यास मोक्षमार्ग दाखविला; त्यायोगें या जगतानें कर्ममलरहित अशा शान्ति सुखाची प्राप्ति करून घेतली.

भावार्थः–या श्लोकांत स्तुतिकारानें जगाचें स्वरूप दाखविलें आहे. ते दाखवितांना प्रथम त्याविषयीं हें जगत् अनित्य आहे असें त्यानें म्हटलें आहे. असें म्हणण्याचें कारण हें आहे

कीं, सांख्य या जगतास नित्य मानतात, व सर्व पदार्थ सर्वत्र आहेत अशी त्यांची कल्पना आहे. जसें उदाहरणार्थ बीजामध्यें वृक्ष पानें, फुलें व फळें आहेत. यद्यपि बीजापासून अंकुर तद्नंतर पानें फुलें व फळें हीं कालक्रमानें उत्पन्न होत असतात. तथापि हीं सर्व त्या बीजामध्यें प्रथमच सांठऊन राहिलीं आहेत. हीं जर बीजामध्यें नसतीं तर पुढें यांचा आविर्भाव झाला नसता यासाठीं उपादान कारणामध्यें त्यापासून उत्पन्न होणारीं सर्व कार्ये प्रथमपासूनच अस्तित्वांत आहेत. असें नसतें तर मनुष्यानें उपादान कारणांचा स्वीकारच केला नसता. असें साळीपासून पुढें साळीच उत्पन्न होतात तेव्हां पुढें साळी [ भात ] उत्पन्न होण्यास कारण साळी. याचा आपणांस निश्चय झाल्यामुळें आपण निःसंशय होऊन साळी पेरतो कारण त्यापासून साळीच उत्पन्न होतात. साळीपासून साळी उत्पन्न झाल्या नसत्या तर आपण कोद्रव बीज देखील साळी उत्पन्न होण्यासाठीं पेरलें असतें. यास्तव कारणामध्यें कार्य हें पूर्वीच सांठऊन राहिलें आहे. सहकारीं कारणें मिळालीं म्हणजे कार्याचा आविर्भाव होतो व तदभावीं तीं त्या कारणामध्येंच गुप्त असतात म्हणजे त्यांचा तिरोभाव होतो. सहकारीं कारणें केवळ अभिव्यंजक आहेत. तीं मिळाली म्हणजे कार्य हें आपण होऊन आपलें स्वरूप प्रकट करितें. एवढ्या विवेचनावरून सांख्य हे सत्कार्यवादी आहेत असें सिद्ध होतें. त्यांचें खण्डन करण्याकरितां आचार्यांनीं श्लोकांत अनित्य या शब्दाचा प्रयोग केला आहे. येथें ‘ अनित्य ’ शब्दानें सर्वथा जगत् अनित्य आहे असें केव्हांहीं समजूं नये, कारण, सर्वथा अनित्य किंवा सर्वथा नित्य असा कोणताच पदार्थ नाहीं असें स्याद्वाद सांगतो. कथंचिन्नित्यानित्यात्मक तत्व आहे असा जैनांचा सिद्धान्त आहे. तेव्हां

सांख्य सर्वथा नित्यत्ववादी असल्यानें त्यांच्या मतानें कारणापासून कार्यांची उत्पत्ति होणें असम्भवनीय आहे. कारण, उपदानकारणामध्यें परिणति झाली ह्मणजे कार्य उत्पन्न होतें, परंतु सर्वथा नित्यामध्यें परिणति होऊं शकत नाहीं ह्मणून जो पदार्थ ज्या अवस्थेंत आहे तो पदार्थ हमेशा त्याच अवस्थेंत राहील व दुसरी अवस्था मानली कीं नित्यत्व त्याचें नष्ट झालें; व तो नित्यत्ववादी आपल्या सिद्धान्तापासून च्युत झाला असें समजावें. तसेंच बीजामध्यें अंकुर, पानें, फुलें, फळें वगैरे अवस्था आहेत हें ह्मणणेंही योग्य नाहीं, कारण या सर्व अवस्था त्यामध्यें आहेतच तर सहकारी कारणांची जरूरत पडलीच नसती. यासाठीं सर्वथा सत्कार्यवाद मानला तर दुधामध्यें एकाचकालीं दहीं, ताक, लोणी इत्यादिक भिन्नरूपानें विशिष्ट रसाला धारण करणारे आढळून येतील. व दही वगैरे उत्पन्न करण्यास ज्या साधनांचीं अपेक्षा पडते ती व्यर्थ होईल. व कालान्तरानें दुधापासून दही बनलेलें आपल्या नजरेस पडतें तसें तें दुधाच्या अवस्थेमध्येंही दिसून येईल. यासाठीं कथञ्चित्सत्कार्यवाद मानला पाहिजे. व दही लोणी इत्यादि स्वरूपानें परिणत होण्याची दुधामध्यें शक्ति आहे असें ह्मणत असाल तर आपलें ह्मणणें योग्य आहे, कारण शक्ति ह्मणजे द्रव्यच होय. जसें मातीच्या गोळ्यामध्यें घटरूपानें परिणत होण्याची शक्ति आहे ह्मणून मातीच्या गोळ्यांत घटावस्था शक्तिरूपानें आहे व पर्यायरूपानें पाहिले असतां घटावस्था नाहीं; व यामुळेंच तीं घटावस्था उत्पन्न करण्याचीं साधनें गोळा करावीं लागतात. व त्याचप्रमाणें कारणामध्यें कार्य असतेंच व तें व्यक्त करण्यास सहकारीं कारणांची जरूरी आहे असें ह्मणणेंही योग्य नाहीं. कारण, कारणें दोन तऱ्हेचीं आहेत एक उत्पादक व दुसरें अ

भिव्यंजक; मृत्पिण्डापासून घागर बनविण्यासाठीं लागणाऱ्या चक्र दंडादि साधनांना उत्पादक कारणें ह्मणतात. या साधनापासून जी घागर मातीच्या गोळ्यापासून बनली ती तीं साधनें मिळण्यापूर्वीं अस्तित्वांत नव्हती. यासाठीं घागर बनविणाऱ्या या साधनास उत्पादक कारण किंवा कारक असें ह्मणतात. अभिव्यंजक कारण त्यास ह्मणतात कीं, भिन्नकारणापासून उत्पन्न झालेल्या पदार्थांना उघड करून दाखविणें. जसें घागर अंधारामध्यें आहे व ती आपल्या कारणापासून उत्पन्न झाली आहे परंतु दिवा अंधाराचा नाश करून तिचें स्वरूप व्यक्त करतो यामुळें दिव्यास आपण अभिव्यंजक कारण ह्मणतो. अभिव्यंजक कारण पदार्थांना उत्पन्न करीत नाहीं, परंतु ते पदार्थ अंधार किंवा कपडा वगैरेंनीं आच्छादित असल्यास अभिव्यंजकाच्या साहाय्यानें त्यांचें स्वरूप समजतें हा या दोन कारणामध्यें फरक आहे. परंतु सर्वांना अभिव्यंजक कारणच मानलें तर दिव्याप्रमाणें तींही लांब राहूनच घटादि कार्यें उत्पन्न करतील. यासाठीं सर्वथा सत्कार्यवाद योग्य नाहीं. हें दाखविण्यासाठीं आचार्यांनीं श्लोकांत ' अनित्यम् ' असा शब्द योजिला आहे. तसेंच या श्लोकांत ' अत्राणम् ' असा शब्द आला आहे, याचा अर्थ जगाचा कोणीही संरक्षक नाहीं असा होतो. कित्येक ईश्वर किंवा विष्णु या जगाचा कर्ता आहे असें ह्मणतात. त्याचें खंडन करण्याच्या उद्देशानें आचार्यांनीं हा शब्द योजिला आहे. परंतु ईश्वर हा जगाचा कर्ता होऊं शकत नाहीं कारण जगामध्यें जें अनेक वैचित्र्य आहे ते एका ईश्वराचे हातून उत्पन्न होऊं शकत नाहीं. तसेंच ईश्वर दयाळू असल्यामुळें सर्व प्राण्यांना समान स्थितींत त्यानें ठेवलें असतें. परंतु जगांत एक श्रीमान् व एक दरिद्री, एक अल्पायु व एक

दीर्घ जीवनाचा असा भेद कां दृष्टीस पडावा ? त्याचप्रमाणें ईश्वरानेंच जग बनविलेलें असेल तर मनुष्य कर्तृत्वशून्य होईल. ईश्वर ज्ञानी असल्यामुळें त्यानें हिंस्र व दुष्टप्राणी केव्हांच बनविले नसते. त्यानेंच दैत्यांना उत्पन्न केलें व तोच त्यांचा नाश करतो यामुळें तो पापी कसा ठरें होणार नाहीं ? दैत्य हे दुष्ट निपून सज्जनांचा छल करतील हें त्यास माहीत झालें नसावें. माहीत झाले असते तर त्यांना बनविण्याचे त्याचे सर्व श्रम वाचले असते व जगास त्याच्या अज्ञतेचा परिचय झाला नसता. इत्यादि गोष्टींचा विचार केला असतां ईश्वरानें सर्व पदार्थ उत्पन्न केलें नाहींत हें सिद्ध होतें. मनुष्यालाच काय प्राणिमात्रांना देखील जें सुख किंवा दुःख मिळतें तें पूर्वोपार्जित शुभाशुभ कर्मामुळें मिळत असतें. श्रीमान् व दरिद्र बुद्धिवान व मूर्ख, कुरूप व सुंदर अशीं जीं माणसें दिसून येतात, तीं सर्व शुभाशुभ कर्मानें तशीं झालेलीं आहेत. यामुळें, अज्ञो जंतुरनीशोऽयमात्मनः सुखदुःखयोः । ईश्वरप्रेरितो गच्छेत्स्वर्गं वा श्वभ्रमेव वा ॥ १ ॥ या श्लोकांत सर्व प्राणी अज्ञ आहेत व आपल्याला सुख व्हावें दुःख होऊं नये, अशी त्यांची इच्छा असली तरी त्यांची इच्छा पूर्ण होत नाहीं. ईश्वर सर्व सत्ताधीश आहे, तो प्राण्यांना आपल्या इच्छेप्रमाणें स्वर्गास किंवा नरकास पाठवित असतो, हें म्हणणें सर्वथा असत्य आहे. जर ईश्वरच नरकास किंवा स्वर्गास पाठवितो, मनुष्य जर असमर्थ आहे तर या लोकीं माणसें जीं वाईट कर्में करतात, तीं कर्में ईश्वरच करीत असला पाहिजे; कारण माणसें सर्वथा असमर्थ आहेत. यामुळें ईश्वर पातकी असल्यामुळें मनुष्यास दंड करणें अन्यायाचें ठरेल. वास्तविक पाहतां ईश्वरासच दंड केला पाहिजे तोच दंडनीय आहे. वास्तव ईश्वरास जगत्कर्ता किंवा

जगाचें रक्षण करणारा मानले असतां पुष्कळ दोष उत्पन्न होतात. तेव्हां जगाचा रक्षणकर्ता कोणी नाहीं, हें दाखविण्या-साठीं आचार्यांनीं ' अत्राणम् ' हा शब्द श्लोकांत घालून नैयायिक व यौग यांच्या ईश्वर जगत्कर्ता व रक्षणकर्ता आहे या मताचें खंडन केलें.

अपरंच किं कृतवांस्त्वमित्याह ।

पुनः सम्भवतीर्थकरांनीं कोणतें कृत्य केलें हें आचार्य पुढील श्लोकांत सांगतात-

शतन्हृदोन्मेषचलं हि सौख्यं,

तृष्णामयाप्यायनमात्रहेतुः ॥

तृष्णाभिवृद्धिश्च तपत्यजस्रं,

तापस्तदायासयतीत्यवादीः ॥ १३

शतन्हृदोन्मेषेत्यादि । शतन्हृदा विद्युत् तस्या उन्मेष उन्मीलनं स इव चलं अस्थिरं इन्द्रियसुखं । कथम्भूतं तदित्याह—तृष्णेत्यादि । तृष्णा संसारसुखाभिलाषः सैव आमयो व्याधिः तस्याप्यायनमात्रं पुष्टिमात्रं । तस्य हेतुः । तत्पुष्टिश्च किं करोतीत्याह—तृष्णाभिवृद्धिश्च तपत्यजस्रं । तृष्णाया अभिवृद्धिः पुष्टिः तपति संतापयति । अजस्रं अनवरतं । तज्जनिततापो जगतः किं करोति तदाह-ताप इत्यादि । तापस्तज्जगदायासयति । अनेकदुःखपरम्परया क्लेशयति । सेवादिक्रियासु वा प्रवर्तयति इति एवं जगतः संबोधनार्थं त्वमेव अवादीः ।

**मराठी अर्थः**—इंद्रियजन्य सुख विजेप्रमाणें अतिशय चंचल आहे, व संसारसुखाभिलाषारूपी रोगाची पुष्टि करण्याला कारण आहे. व संसारसुखाभिलाषा वाढली म्हणजे तिच्यापासून प्राणिमात्रांना फार संताप होतो त्या संतापानें अनेक दुःखें होतात; व त्यांच्यापासून प्राण्यांना फार परिश्रम होतो. असा श्री भगवान् सम्भवनाथांनीं भव्यजीवांना उपदेश केला.

तात्पर्यः—संसारिक सुख हें नित्य नाहीं त्यामुळें त्याची प्राप्ती झाली तरी तें लौकरच नाश पावतें, त्या सुखाचा वारंवार उपभोग घेतला तरी तृप्ति होत नाहीं. तृष्णा ही वाढतच जातें. समुद्र एखादेवेळेस शेकडो नद्यांच्या पाण्यानें तृप्त होईल. अग्नि देखील लांकडांच्या समूहानें तृप्त होईल. परन्तु इंद्रिय सुखाचा उपभोग किती जरी घेतला तरी मनुष्याची इच्छा तृप्त होत नाहीं. वरचेवर ती वृद्धिंगतच होते. यास्तव इंद्रियसुखाची इच्छा कमी व्हावी अशी इच्छा असेल तर त्या सुखाचा त्यागच केला पाहिजे तेव्हांच इच्छा कमी होते. संसारिकसुखाचा उपभोग घेतल्यानें कर्मबन्ध होतो व संसारांत फिरावें लागते. संसारापासून मुक्त होण्याची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें अशा सुखाचा त्याग करून वास्तविक सुख प्राप्तीच्या उपायांचा अंगिकार केला पाहिजे. असा भगवान् सम्भवनाथांनीं उपदेश केला. याचें वर्णन या श्लोकांत केलें.

नतु सुगतादिभिरपि तत्संबोधनार्थं बन्धाद्युपदेशः कृतोऽतस्त्वमेवावादी-
रित्ययुक्तं इति चेत्तन,तन्मते बन्धमोक्षादेरेवासम्भवात् । एतदेवाह ।

येथें एक शंकाकार शंका करतो कीं बौद्धादिकांनीं लोकांच्या कल्याणासाठीं बन्धादिक तत्वांचा उपदेश केला असें असतां सम्भवनाथांनींच या तत्वांचा उपदेश केला असें म्हणणें कसें योग्य होईल ? याचें निरसन आचार्यांनीं असें केलें कीं बौद्धादिकांच्या मतामध्यें बंध मोक्ष वगैरे तत्वांची सिद्धीच होत नाहीं. यामुळें वास्तविक त्या तत्वांचा उपदेष्टा सम्भवतीर्थंकरच आहेत. हें या श्लोकांत स्पष्ट रीतीनें दाखवितात.

बन्धश्च मोक्षश्च तयोश्च हेतू,
बद्धश्च मुक्तश्च फलंच मुक्तेः

स्याद्वादिनो नाथ तवैव युक्तं,
नैकान्तदृष्टेस्त्वमतोऽसि शास्ता ॥ १४

**बन्धश्चेत्यादि** । जीवस्य कर्मणा संश्लेषो बन्धः, विश्लेषो **मोक्षः** । **चकारः** परस्परसमुच्चये । **तयोर्बंधमोक्षयोः हेतू च** । बन्धस्य मिथ्यात्वादिः ; मोक्षस्य हेतुः सम्यग्दर्शनादिः । न केवलमेतत्किन्त्वन्यदपि । बद्धश्च मुक्तश्च फलं च मुक्तेः । य एव पूर्वं **बद्धः** स एव पश्चान्मुक्तः तस्यैव **च मुक्तेः फलं** अन्यत् ज्ञानादिलक्षणसंपन्नम् । इत्येतत्सर्वं **तवैव** सम्भवस्यैव । कथम्भूतस्य ? **स्याद्वादिनो**ऽनेकान्तवादिनो मते **युक्त**मुपपन्नं । **नैकान्तदृष्टेः** सुगतादिमते न.

नहि क्षणिकैकान्तवादिनो मते तद् घटते । तत्र हि अन्यो बद्धोऽन्यश्च मुच्यते क्षणिकत्वात् । अन्यस्य बंधकारणानुष्ठानमन्यस्य च मुक्तिरिति । नापि नित्यैकान्तवादिनो मते तद् घटते । तत्र हि यदि बद्धस्तदा बद्ध एव स्यादात्मा, न मुक्तः । अथ मुक्तस्तदा मुक्त एव स्यान्न बद्धः, सर्वथैकरूपत्वात् । अन्यथा नित्यैकान्तविरोधः स्यात् । **अतः** सर्वथैकांतवादिमते बन्धमोक्षादेरनुपपत्तेः । हे **नाथ** स्वामिन् ! **त्वमेव** असि भवसि । **शास्ता** तत्त्वोपदेष्टा ।

**मराठी अर्थः**-जैनमतामध्येंच बन्ध व मोक्ष या तत्त्वांची सिद्धि होतें व त्यांचीं कारणें मिथ्यादर्शनादि व सम्यग्दर्शनादिक यांचीही सिद्धि याच मतामध्यें होतें. बन्ध ह्मणजे जीवाच्या प्रदेशांचा कर्मप्रदेशांशीं अत्यंत निबिड असा संबंध होणें. व बन्धाच्या कारणांचा अभाव झाल्यानें व निर्जरा यांच्या सहायानें आत्मा ज्ञानावरणादि कर्मापासून सर्वथा वेगळा होणें यास मोक्ष ह्मणतात. अर्थात् सम्यग्दर्शन ज्ञान व चारित्र या तीन गुणांची पूर्णता होते तेव्हां आत्म्यास मोक्ष प्राप्ति होते. याचप्रमाणें आत्मा बद्ध व मुक्त कसा होतो; व मोक्षाचें फल काय आहे यांची सिद्धि; हे जिनेश सम्भवनाथ, आपण प्रतिपा-

ट्न केलेल्या मतांमध्येंच होते. ह्मणजे जो आत्मा पूर्वी कर्मबद्ध होता तोच मुक्त होतो व त्यास मोक्षफल प्राप्त होतें. ह्मणजे अनंत ज्ञानादि गुणांनीं परिपूर्ण तो होतो. अन्य मतामध्यें या तत्वांची सिद्धि होत नाहीं.

सर्व पदार्थ क्षणिक आहेत असें बौद्ध ह्मणतात. त्यामुळें त्यांच्या मतांत बन्ध मोक्षादिक तत्वांची सिद्धि होत नाहीं. जीव सर्वथा क्षणिक आहे असें मानलें तर ज्याला कर्माचा बन्ध झाला आहे तो दुसऱ्या क्षणीं नाश पावतो त्यामुळें कर्माचें फल जें सुख किंवा दुःख याचा अनुभव त्याला कसचा येणार? तसेंच बन्ध एकाला होतो व दुसराच त्यापासून मुक्त होईल. कारण मोक्षप्राप्ति होईपर्यंत पहिल्या बद्ध जीवाचें अवस्थान नसल्यामुळें कर्मापासून सुटलेला जीव दुसराच आहे असें मानावें लागेल. बंध व मोक्ष या दोन तत्वांची सिद्धि होत नसल्यामुळें त्यांच्या कारणांची सिद्धि होणें लांबच राहते.

जसें सर्वथा क्षणिक पक्षामध्यें दोष येतो तसेंच सर्वथा पदार्थांना नित्य मानणाऱ्यांच्या मतांतही या तत्वांची सिद्धि होत नाहीं. कारण, जो आत्मा कर्मांनीं बांधला गेला तो सदैव बद्धच राहणार. त्याची कर्मापासून सुटका केव्हांच होणार नाहीं. जर कर्मापासून मुक्त झाला तर बन्धाचें नित्यत्व रहात नाहीं. बंध-तत्व अनित्य आहे असें ह्मणावें लागेल. तात्पर्य ज्या पदार्थांची जी अवस्था आहे त्यांची ती अवस्था कायमची राहील. त्या अवस्थेंत फेरबदल होणार नाहीं. ह्मणून मुक्तावस्था जी बन्धाचा अभाव झाल्यानें प्राप्त होते ती होणार नाहीं, किंवा मुक्तावस्था देखील अनादिकालापासूनच जीवाची आहे असें मानावें लागेल. व अनादिकालापासून ती मुक्तावस्था जीवांची असल्यामुळें मुक्ति होण्याचीं जीं कारणें शास्त्रांत वर्णिलीं

आहेत तीं सर्व व्यर्थ ठरतील. यामुळें सर्वथा वस्तु नित्य किंवा अनित्य मानू नये. कथंचिन्नित्यानित्यात्मक वस्तु आहे असें मानावें. असें मानलें असतां जीवाच्या बंधावस्था व मोक्षावस्थेचीही सिद्धि होते. व बंध व मोक्ष या दोन तत्वांचीं कारणें इत्यादिक पदार्थांचीही सिद्धि होते. यास्तव हे जिनेश, अशा युक्तियुक्त तत्वांचा उपदेशक आपणाशिवाय दुसरा कोण असूं शकेल !

विशेषार्थः–जैनमतांमध्येंच बन्धाचें व मोक्षाचें स्वरूप उत्तम रीतीनें सांगितलें आहे. येथें बन्धाचें स्वरूप विशेष रीतीनें सांगितलें असतां विषयान्तर होणार नाहीं असें वाटतें. बन्ध ह्मणजे जीवाच्या प्रदेशामध्यें कर्मांचें प्रदेश मिसळणें. ज्यावेळेस जीवाचा कर्मांशीं संबंध होतो त्यावेळेस जीव व कर्म हे आपला स्वभाव सोडून तिसरी अवस्था धारण करतात. जसें हळद व चुना यांचें मिश्रण झालें ह्मणजे त्याच्यामध्यें तांबडेपणा उत्पन्न होतो. हा तांबडेपणा केवळ चुना किंवा केवळ हळद यामध्यें आढळून येत नाहीं. परंतु या दोन पदार्थांचा एकजीव झाल्यानें अशी अवस्था दिसून येते. तेव्हां या दोन पदार्थांनीं जसा आपला स्वभाव सोडून दिला तद्वत् कर्मांचा उदयकाल आला ह्मणजे जीव चारित्र गुणापासून च्युत होतो व कर्मही आपल्या स्वभावापासून च्युत होतें. व यामुळें त्या दोघापासून रागद्वेषात्मक तिसरी अवस्था होते. तेव्हां दोघेही आपआपले स्वभाव सोडतात. याचा अर्थ, जीव पुद्गल स्वरूपानें परिणत होतो व पुद्गल जीवस्वरूपानें परिणत होतें असा, समजूं नये. कारण हीं दोन द्रव्यें सजातीय नाहींत तर विजातीय आहेत. जेथें सजातीयपणा असतो तेथें एक दुसऱ्याच्या स्वरूपानें परिणत होतें. जसें पाणी वायुरूपानें परिणत होतें. पाणी व वायू यांच्यामध्यें

सजातीयता आहे; ह्मणजे पुद्गलत्वानें हीं सजातीय आहेत; परंतु जीव व पुद्गल हीं दोन द्रव्यें वेगवेगळीं आहेत; त्यामुळें येथें सजातीयता नसल्यामुळें हीं परस्परांचीं स्वरूपें धारण करीत नाहींत. परंतु या दोघांच्या संश्लेषानें रागद्वेषात्मक तिसरी अवस्था होते. रागद्वेष हे जीव व पुद्गल या दोघांची वैभाविक अवस्था आहे. रागद्वेष जीवाचा वैभाविक भाव आहे असें ज्यावेळेस आपण ह्मणतो त्यावेळेस त्या सांगण्यांत विवक्षात असते. अर्थात् जीवाच्या अंशांच्या अपेक्षेनें रागद्वेषांना जीवाचे भाव असें ह्मणतात. याचप्रमाणें पुद्गलांच्या अंशांच्या अपेक्षेनें रागद्वेषांना पौद्गलिकही ह्मणतात. व यामुळेंच सिद्धामध्यें त्याचा अभाव दाखविला जातो. कारण, रागद्वेष कर्मकृत नसते तर ते जीवांच्या ज्ञानादिकगुणाप्रमाणें सदैव आत्म्यामध्यें राहिलें असते व सिद्धावस्थेंतही यांची सत्ता दिसून आली असती. यामुळें पुद्गल व जीव यांच्या निबिड संबंधानें ही अवस्था उत्पन्न होते, व हीं दोन द्रव्यें वेगळीं झालीं यांचें पृथक्करण पूर्णपणें झालें ह्मणजे दोघांनाही शुद्धावस्था प्राप्त होते. ही शुद्धावस्थाच मोक्ष आहे. याप्रमाणें बन्ध व मोक्ष याचें स्वरूप आहे.

बौद्ध किंवा नैयायिक यांनींही बन्धमोक्षादिक तत्त्वें मानलीं आहेत. परंतु त्यांनीं जीवादिक पदार्थ सर्वथा क्षणिक किंवा नित्य मानले आहेत; त्यामुळें बन्धमोक्षादिकांची उपपत्ति सिद्ध होत नाहीं. सर्वथा क्षणिक पदार्थ मानल्यामुळें तो पदार्थ अनेक क्षणपर्यंत राहण्यास असमर्थ असतो. त्यामुळें जो बद्ध झाला होता तोच कर्ममुक्त झाला हें ह्मणणें युक्त होत नाहीं. अर्थात् बद्ध झालेला आत्मा वेगळा व मुक्त होणारा आत्मा वेगळा आहे, असें ह्मणावें लागेल. अर्थात् एकानें चांगलें किंवा वाईट कर्म केलें असेल तर त्याचा भोक्ता तो न होतां दुसराच

होईल. कारण, तें कर्म केल्याबरोबर त्याचा नाश झाल्यामुळें तो त्या कर्मापासून होणाऱ्या सुखदुःखाचा भोक्ता होणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें हिंसा एका जीवानें केली असल्यास तिच्या फलाचा भोक्ता दुसराच जीव आहे, असें मानावें लागेल. त्यामुळें 'अंधळा दळतो व कुत्रा पीठ खातो, या म्हणीप्रमाणें कर्ता व उपभोक्ता हे एक न मानतां भिन्न मानावे लागतील. प्रतिक्षणीं पदार्थांचा नाश होतो असें मानलें तर जी वस्तु आपण दुसऱ्याला उसनी दिली तिची आठवण होणार नाहीं. कारण, ती दिल्याबरोबर आपला नाश झाला व मागतेवेळेस आपण नवीनच आहोत. यामुळें आपण ती वस्तु दिली नाहीं असें ठरेल व त्या वस्तुची आपणास स्मृति ही राहणार नाहीं. आपण जें शिकलो तेंही लक्षांत राहणार नाहीं. इत्यादिक दोष उत्पन्न होतात. यामुळें बन्ध मोक्षादि पदार्थांची सिद्धि क्षणिकवादाचा स्वीकार केल्यास होत नाहीं. तसेंच पदार्थ सर्वथा नित्य मानलें तरी बंधमोक्षादि तत्वांची सिद्धि होत नाहीं. यासाठीं सम्भवनाथ जिनेश्वरांनीं कथंचिन्नित्यानित्यात्मक तत्वांचा उपदेश केला आहे. अशा रीतीनें तत्वें मानलीं म्हणजे कोणताही दोष येत नाहीं.

स्तोता स्वात्मन औद्धत्यं परिहरन्नाह ।

आतां स्तुतिकार आपली लघुता प्रदर्शित करतात.

शक्रोऽप्यशक्तस्तव पुण्यकीर्तेः
स्तुत्यां प्रवृत्तः किमु मादृशोऽज्ञः ॥
तथापि भक्त्या स्तुतपादपद्मो
ममार्य देयाः शिवतातिमुच्चैः ॥ १५ ॥

**शक्रोऽपीत्यादि । शक्रः** इंद्रः **सोपि** अवधिज्ञानसंपन्नोऽपि सकलश्रुतधरोऽपि **अशक्तोऽ**समर्थः । कथम्भूतः ? **स्तुत्यां** स्तवने **प्रवृत्तः** सन् ।

कस्य ? **तव** सम्भवतीर्थंकरदेवस्य । कथम्भूतस्य ? **पुण्यकीर्तेः** पुण्या प्रशस्ता निर्मला कीर्तिः ख्यातिर्वाणी वा, कीर्त्यते प्रतिपाद्यते जीवादयोऽर्था ययेति व्युत्पत्तेः । पुण्याय वा पुण्यनिमित्तं कीर्त्तिः कीर्तनं स्तुतिर्यस्य । **किमु** किं पुनः । **मादृशो** मनुष्यमात्रः। कथंभूतः ? अज्ञोऽवध्यादिविशिष्टज्ञानविकलः शक्तो भविष्यति । **तथापि** अशक्तेनापि मया। **भक्त्या** अनुरागेण **स्तुतपादपद्मः** । पादावेव पद्मौ । स्तुतौ पादपद्मौ यस्य । । गुणैः गुणवद्भिर्व्यते समाश्रीयते इत्यर्थः तस्य संबोधनमार्य । **मम** स्तावकस्य । **देयाः** दद्याः त्वं भवान् । कां ? **शिवतातिं** । तायृ संतानपालनयोः । तायनं तातिः । शिवस्य सौख्यस्य तातिः संतानः शिवतातिः, तां । **उच्चैः** परमातिशयप्राप्तं । मोक्षसौख्यसंततिमूरमित्यर्थः ।

तृतीयः स्वयम्भूः समाप्तः ।

---

**मराठी अर्थः**—अनंत ज्ञानादि गुणसंपन्न गणधरादि ऋषिश्रेष्टांनीं पूज्य अशा जिना, निर्मल कीर्तीस धारण करणाऱ्या किंवा जीवादिक पदार्थांचें वर्णन करणाऱ्या दिव्य ध्वनीला धारण करणाऱ्या, आपली स्तुति करण्यास अवधिज्ञानसंपन्न व सकल श्रुतज्ञानी असा इंद्र देखील असमर्थ आहे. तेव्हां अवधिज्ञानरहित व उत्कृष्ट श्रुतज्ञान विकल असा मी आपलें स्तवन करण्यास समर्थ कसा बरें होइन ? तथापि भक्तीनें आपल्या गुणावरील प्रेमानें मी दोन चार वेड्यावाकड्या शब्दांनीं आपल्या पदकमलांची स्तुति केली आहे. हे जिनेश सम्भवनाथ आपण मला उत्कृष्ट अशा अनंत मोक्षसुखाची प्राप्ति करून द्यावी.

**भावार्थः**—स्तुतिकारांनीं या श्लोकांत आपली लघुता दाखविली आहे. ते म्हणतात; जिना, तुझी स्तुति करण्यास इंद्र

देखील असमर्थ आहे. मी पामरानें तुझी स्तुति काय करावी. तथापि मी भक्तिवश होऊन तुझी स्तुति केली आहे. आपलें पांडित्य आपली विद्वत्ता प्रदर्शित करावी म्हणून तुझी स्तुति मी केली नाहीं. गणधर चार ज्ञानाचे धारक असतात. ते देखील तुझी स्तुति करूं शकले नाहींत तेव्हां मी तुझ्या अनंत गुणाचें वर्णन कसा करूं शकेन. तात्पर्य तुझें गुणवर्णन करण्यास मी समर्थ नाहीं.

**याप्रमाणें सम्भवनाथ तीर्थकराची स्तुति समाप्त झाली.**

---

अभिनन्दन जिनस्तुतिः ।

गुणाभिनन्दादभिनन्दनो भवान् ।
दयावधूं क्षांतिसखीमशिश्रयत ॥
समाधितंत्रस्तदुपोपपत्तये ।
द्वयेन नैर्ग्रंथ्यगुणेन चायुजत् ॥

**गुणाभिनंदादिति** । **भवान्** चतुर्थतीर्थकरदेवोऽ**भिनंदनो**ऽभिनन्दननामा । कस्माद् ? **गुणाभिनन्दात्** गुणानां अन्तरङ्गानन्तज्ञानादीनां बहिश्च सकललक्ष्म्यादीनां अभिनन्दोऽभिवृद्धिस्तस्मात् । उत्पन्ने हि भगवति सकलप्राणिनां ज्ञानादयः सकलसंपदश्च वृद्धिंगता इति । इत्थमेतल्लब्धनामा भवान् किं कृतवान् ? **आशिश्रयत्** समाश्रितवान् । कां ? **दयावधूं** दयैव वधूः प्रियतमा । कथम्भूतां ? **क्षान्तिसखीं** । क्षान्तिः क्षमा सखी यस्यास्तां । अनेन सुगतस्य मातुरुदरं विपाट्य निर्गतस्य ईश्वरस्यच त्रिपुरदाहादौ प्रवृत्तस्य क्षान्तिदययोरभावादाप्तत्वं प्रत्याख्यातम् । ततः किंविशिष्टोऽसौ सम्पन्नः ? **समाधितन्त्रः** धर्म्यं शुक्लं च ध्यानं समाधिः स तंत्रं प्रधानं यस्य यदि वा तत्तंत्रोसौ । तदा किमिति नैर्ग्रन्थ्ये कृतादर इत्याह तदित्यादि । तस्य समाधेरुपपत्तिर्घटना तस्यैव तदुपोपपत्तये । ' प्रो-

पोत्ममा पादपूरणे ' इति द्विरत्नं । **अयुज्यत** कः । केन ? **नैर्ग्रन्थ्यगुणेन**ः कथम्भूतेन ? **द्वयेन** बाह्याभ्यंतरपरिग्रहत्यागरूपेण । अनेन श्वेतपटाः प्रत्युक्ताः । परिग्रहवतां एकाग्रतालक्षणध्यानानुपपत्तेः, परिग्रहस्य व्यग्रताहेतुत्वग्रहात् ।

**मराठी अर्थः**-चौथ्या तीर्थकराचें अभिनंदन हें नांव सार्थक होतें. कारण भगवान् स्वतः अंतरंग ज्ञानादि गुणांनीं व बाहेरील इहलौकिक ऐश्वर्यांनीं युक्त होते. एवढेंच नव्हें तर ज्यावेळेस भगवान् अभिनंदन तीर्थकरांचा जन्म झाला त्यावेळेस सर्व लोकांचे ज्ञानादिक गुण वाढले व ते ऐश्वर्यसंपन्न झाले. यामुळें भगवंताचें अभिनंदन हें नांव सार्थक योग्य होतें. कारण, अभि ह्मणजे सर्व बाजूंनीं, सर्व तऱ्हेनें नंदन ह्मणजे वाढलेले; ह्मणजे सर्व तऱ्हेनें ज्ञानादिक गुणांची व ऐश्वर्याची ज्यांनीं उन्नति केली आहे असा अर्थ या शब्दाचा होतो. यामुळें त्यांचें नांव सार्थक होतें. अशा भगवंतांनीं क्षमा जिची प्रियसखी आहे अशा दयारूपी प्रियतमेचें पाणिग्रहण केलें. यावरून भगवान् सर्व प्राणिमात्रावर दया करणारे व क्षमाशील होते. तसेंच या अभिप्रायावरून सुगत, महादेव व विष्णु वगैरे देवतांना दया व क्षमा नव्हती हें सिद्ध होतें. बुद्धानें जन्मल्याबरोबर आपल्या आईला मारून टाकलें. यावरून तो निर्दय होता. महादेवानें त्रिपुर नांवाच्या राक्षसाची आकाशांत रचलेली तीन सुंदर शहरें जाळलीं. यावरून त्याचें अंतःकरण निर्दयी व अक्षमायुक्त होतें हें सिद्ध होतें. तसेंच विष्णुनेंही पुष्कळ राक्षसांचा नाश केला. नृसिंहावतार धारण करून हिरण्यकशिपूचें वक्षःस्थल विदीर्ण केलें. यामुळें या तीघांच्या ठिकाणीं देवपणाला उचित असें गुण नाहींत. यास्तव यांना देव समजून यांची पूजा करूं नये. तसेंच कर्मांचा नाश करण्याकरितां धर्मध्यान व शुक्लध्यान

या दोहोंचा भगवंतानीं आश्रय केला. व या दोन ध्यानांची सिद्धि होण्याकरितां बाह्याभ्यंतर सर्व परिग्रहांचा त्यांनीं त्याग केला.

भावार्थः-अभिनंदन तीर्थंकरांनीं धर्मध्यान व शुक्लध्यानाची प्राप्ति व्हावी ह्मणून उभय परिग्रहांचा त्याग केला. सर्व प्राण्यावर क्षमा व दयाही धारण केली. येथें परिग्रहांचा त्याग केला ही विशेष महत्वाची गोष्ट आहे. याचें कारण हें आहे कीं परिग्रहापासून संक्लेश परिणाम होतात. इच्छा वाढत जातें व जोपर्यन्त इच्छा आहे तोपर्यन्त संसारांतून मुक्तता होणें शक्य नाहीं. परन्तु श्वेताम्बरांनीं परिग्रह धारण केल्यापासून मुक्ति प्राप्त होते असें ह्मटलें आहे. परन्तु त्यांचें हें ह्मणणें योग्य नाहीं. कारण परिग्रह धारण करणाऱ्या मनुष्यांचें चित्त एकाच पदार्थाकडे केव्हांही लागत नसल्यामुळें त्यांना धर्म्य व शुक्ल ध्यानाची प्राप्ति होत नाहीं. कारण, परिग्रहांनीं व्याकुलता उत्पन्न होते. परिग्रह धारण केल्यामुळें परमशुक्लध्यानाची प्राप्ति होत नाहीं व परिग्रह धारण केल्यापासून बराच त्रास सोसावा लागतो. हें विद्यानन्द आचार्यांनीं एका श्लोकांत स्पष्ट रीतीनें दाखविलें आहे. तो श्लोक असाः-

परिग्रहवतां सतां भयमवश्यमापद्यते ।
प्रकोपपरिहिंसने च परुषानृतव्याहृती ॥
ममत्वमथ चोरतः स्वमनसश्च विभ्रान्तता ।
कुतो हि कलुषात्मनां परमशुक्लसद्ध्यानता ॥ १ ॥

अर्थः—परिग्रह बाळगणाऱ्यांना चोरापासून अवश्य भीति उत्पन्न होते. व आपल्या वस्तु चोरणाऱ्यावर अतिशय क्रोध उत्पन्न होतो. चोर सांपडला असतां आपण त्याला मारतो. परिग्रहांची प्राप्ति व्हावी, यासाठीं मनुष्य खोटें देखील बोलतो.

परिग्रहावर अतिशय प्रेम उत्पन्न होतें. व चोर माझ्या वस्तु चोरून तर नेणार नाहींत ना? अशा तऱ्हेच्या चिन्तेनें त्याचें मन सदैव व्याकुल असतें. तेव्हां व्याकुल झालेल्या माणसाला परम शुक्ल ध्यानाची प्राप्ति कशी बरें होईल!

यामुळें मुनि तिळमात्र देखील परिग्रह आपल्याजवळ ठेवीत नाहींत. त्यांनीं एखादी लंगोटी जरी ठेविली तरी तिच्यापासून त्यांना बरेच त्रास सोसावे लागतील. ती मळाली असतां धुवावी लागेल; त्यामुळें जलकायिक जीवांची हिंसा होईल. एखाद्यावेळेस चोरानें चोरून नेल्यास मनामध्यें वाईट वाटण्याचा सम्भव आहे. ती मिळण्यासाठीं श्रावकलोकापाशीं तोंड वेंगाडण्याचा प्रसंग आल्यामुळें अयाचकवृत्तीला तिलाञ्जलि देणें भाग पडेल. आणि हमेशा लंगोटीवर प्रेम उत्पन्न झाल्यामुळें शुक्लध्यानाची प्राप्ति होणार नाहीं. ह्मणून त्यांना दिशा हेंच वस्त्र आहे. याचप्रमाणें आहार करण्यासाठीं आपल्याजवळ ते कोणतेंच पात्र ठेवीत नाहींत. कारण, पात्र ठेवल्यापासून देखील बरेच दोष उत्पन्न होतात. व पाणिपात्राहारवृत्ति सोडून द्यावी लागेल. पात्रामध्यें भोजन केल्यास काय दोष उत्पन्न होतो, याचेंही वर्णन विद्यानन्द स्वामींनें मजेदार केलेलें आहे. तें असें: —

स्वभाजनगतेषु पेयपरिभोज्यवस्तुष्वमी ।
यदा प्रतिनिरीक्षितास्तनुभृतः सुसूक्ष्मात्मिकाः ।
तदा कचिदपोज्झने मरणमेव तेषां भवे-
दथाप्यभिनिरोधनं बहुतरात्मसम्मूर्च्छनम् ॥ १ ॥
दिगम्बरतया स्थिताः स्वभुजभोजिनो ये सदा ।
प्रमादरहिताशयाः प्रचुरजीवहत्यामपि ॥
न बन्धफलभागिनस्त इति गम्यते येन ते ।

प्रवृत्तमनुबिभ्रति स्वबलयोग्यमद्याप्यमी ॥

**अर्थः** –मुनींनीं आपल्याजवळ पात्र ठेविलें तर त्यांत पिण्याचे व खाण्याचे पदार्थ बराच काल राहिल्यामुळें त्या पदार्थांत सूक्ष्म सम्मूर्च्छन जंतूंची उत्पत्ति होते. व त्यांतून पदार्थ टाकून दिल्यास त्या सर्व जंतूंचा नाश झाल्यामुळें मुनींना हिंसेचें पातक अवश्य लागणार. कदाचित् त्या पदार्थापासून ते जंतु वेगळे केले तरी त्या पदार्थापासून पुनः सूक्ष्म सम्मूर्च्छन जंतु उत्पन्न होण्याचें रोकलें जाणार नाहीं. यास्तव मुनि आपल्या जवळपात्र परिग्रह बिलकुल ठेवीत नाहींत. मुनि दिगंबर असतात व ते उभे राहून आजन्म पाणि पुटाहारी असतात. व हमेशा त्यांचें अंतःकरण पंधरा प्रमादांनीं रहित असतें. यामुळें त्यांच्या हातून हिंसा घडली तरी तिच्यापासून पातकाचा बन्ध होत नाहीं. झाला तरी त्यापासून सुख किंवा दुःख हें त्यांना भोगावें लागत नाहीं. कारण, ते यत्नाचारपूर्वक वागत असतात यामुळें हिंसेपासून कर्मांचा बन्ध झाला तरी त्यापासून दुःख होत नाहीं. ईर्यापथिक कर्माचा जरी त्यांना बंध होतो तरी त्या बन्धामध्यें स्थिति व फल देण्याची शक्ति नसते. जसें वाळलेल्या भिंतीवर दगड फेकला तरी तो त्या भिंतींत रुतून बसत नाहीं. परंतु तो जसा पुनः खालीं पडतो, त्याचप्रमाणें ईर्यापथिक कर्मामध्यें प्रकृति प्रदेश रूपानें परिणत होण्याची शक्ति असतें. तें कर्म आत्म्यामध्यें फार काल टिकून रहात नाहीं व त्यामध्यें फलदान शक्तिही नसते. यामुळें प्रमाद रहित होऊन चारित्र धारण करीत असतात. या कलिकालामध्यें देखील आपल्या शक्तिस अनुसरून योग्य असें चारित्र मुनीश्वर धारण करितात. एवढ्या विवेचनावरून परिग्रह धारण केल्यापासून धर्म्यध्यान व शुक्लध्यान हें सिद्ध होत नाहीं. हें व्यक्त झालें.

**यामुळें मुनींनीं परिग्रह धारण केला तरी मुक्ति प्राप्त होते हें श्वेतांबरांचें ह्मणणें अनुचित आहे हें सिद्ध होतें.**

दयावधूं समाश्रित्य भगवान् लोके किं कृतवानित्याह ।

**दयारूपी प्रियतमेचें पाणिग्रहण करून भगवान् अभिनंदनांनीं या लोकीं काय केलें हें स्तुतिकार सांगतात.**

अचेतने तत्कृतबन्धजेऽपि,
ममेदमित्याभिनिवेशकग्रहात् ।
प्रभङ्गुरे स्थावरनिश्चयेन च,
क्षतं जगत्तत्वमजिग्रहद्भवान् ॥ १७ ॥

**अचेतने**त्यादि । जगत्तत्वमजिग्रहदिति सम्बन्धः । कथम्भूतं जगत् ? क्षतं नष्टं । कुत इत्याह—अचेतने इत्यादि । **अचेतने** शरीरे । **तत्कृतबन्धजेऽपि** । चेतनाचेतनेन शरीरेण सह यः कृतः कर्मवशादात्मनो बन्धः तस्माज्जातं यत्सुखदुःखादि पुत्रकलत्रादि च तस्मिन् । अपिः संभावने । चकारः समुच्चये । तस्मिन् योसौ **ममेदं** शरीरादिकमहमस्य स्वामी इत्यभिनिवेशस्तस्मिन्भव आभिनिवेशकः स चासौ ग्रहश्च ग्रहणं । तस्मात्क्षतं नष्टं **जग**त्प्राणिसंघातः । न केवलं एतत्स्यात् । क्षतं नष्टं । **प्रभङ्गुरे** कथञ्चिदनित्ये च **स्थावरनिश्चयेन च** नित्यत्वाध्यवसायेन च क्षतं जगत्। अतस्**तत्त्वं** यथावज्जीवादिस्वरूपं । **अजिग्रहद्** ग्राहितवान्**भवान**भिनन्दनस्वामी ।

**मराठी अर्थः—अचेतन पदार्थामध्यें हा माझा आहे व मी यांचा स्वामी आहे. अशा तऱ्हेचा जो मिथ्याभिमान—मिथ्या प्रीति उत्पन्न होते इच्याा योगानें सर्व लोक त्या पदार्थांचें ग्रहण करतात. तसेंच अचेतन जें कर्म व शरीर यांच्या साह्यानें उत्पन्न झालेल्या रागद्वेषाच्या स्वाधीन होऊन पुत्रमित्र कलत्रादिक पदार्थामध्यें अतिशय स्नेह उत्पन्न होतो. त्यामुळें दे**

आत्म्यापासून भिन्न असून देखील त्यांच्यावर मिथ्या ममत्व-बुद्धि उत्पन्न होते. व यौवन, धनादिक क्षणिक पदार्थांमध्यें हे स्थिर आहेत असें मिथ्याज्ञान होतें. यामुळें हें जग भ्रान्त झालें होतें, मूढ झालें होतें. परन्तु भगवान् अभिनन्दन जिनानें दयेनें प्रेरित होऊन सत्य तत्वाचा या जगाला उपदेश केला. खरा मार्ग जगास दाखऊन दिला. व भगवान् अभिनन्दनानें जगाचा उद्धार केला.

भावार्थः—कावीळ रोग झालेल्या मनुष्यास सगळे पदार्थ पिवळे दिसतात. किंवा धोतरा ज्यानें खाल्ला आहे अशा मनुष्यास चोहोंकडे सोनेंच सोनें दिसूं लागतें. तद्वत् मिथ्या ज्ञानाच्या योगानें पदार्थांचें वास्तविक ज्ञान होत नाहींत. त्यामुळें आपल्यापासून स्वरूपानें भिन्न असलेल्या शरीर, स्त्रीपुत्रादि पदार्थांमध्यें आपलेपणा उत्पन्न होतो. परन्तु विचार केला असतां ते आपल्यापासून भिन्न आहेत त्यामध्यें आपलेपणाची कल्पना चुकीची आहे. कारण, आत्म्याचे जे ज्ञानदर्शनादिक गुण आहेत त्यामध्यें आत्मकल्पना होणें योग्य आहे. कारण, आत्म्यांशीं त्यांचा अविनाभाव सम्बन्ध आहे. त्यांचा कधींच वियोग होत नाहीं. आणि शरीरादिक बाह्य पदार्थ आत्म्यापासून वियुक्त होतात; यामुळें त्यांच्यामध्यें ममत्वकल्पना चुकीची आहे. त्याचप्रमाणें कर्मजन्य जो उपाधिभाव जीवास प्राप्त होतो त्यानें जीवाच्या ठिकाणीं अहंकार उत्पन्न होतो त्यायोगें, मी राजा आहे, मी श्रीमान् आहे, मी गोरा आहे अशी कल्पना उत्पन्न होते. तेव्हां हें सर्व मिथ्याज्ञान आहे. ममत्व व अहंकार यांची लक्षणें नागसेन आचार्यांनीं अशीं सांगितलीं आहेत.

शश्वदनात्मीयेषु स्वतनुप्रमुखेषु कर्मजनितेषु ।
आत्मीयाभिनिवेशो ममकारो मम यथा देहः ॥ १ ॥

ये कर्मकृता भावाः परमार्थनयेन चात्मनो भिन्नाः ।
तत्रात्माभिनिवेशोऽहंकारोऽहं यथा नृपतिः ॥२ ॥

**अर्थः**—बिलकूल आत्म्यापासून भिन्न असलेल्या शरीर स्त्री मित्र पुत्रादि पदार्थांमध्यें, जे पुण्योदयानें प्राप्त झाले आहेत त्यामध्यें हे माझे आहेत अशी कल्पना होते. या कल्पनेला ममत्व ह्मणतात. जसें हा माझा देह आहे. ही माझी बायको आहे. इत्यादि.

तसेंच शुभकर्माच्या उदयानें उत्पन्न होणाऱ्या पर्यायामध्यें अहंबुद्धि उत्पन्न होते. निश्चयनयानें पाहिलें असतां कर्मजन्य भाव-पर्याय आत्म्यापासून अगदींच वेगळे आहेत. त्यांचा आत्म्यांशी बिलकुल संबंध नाहीं. तथापि आत्मा मोहवश होऊन त्यामध्यें अहंबुद्धि धारण करतो. जसें, मी राजा आहे. यांस अहंकार ह्मणतात. आतां येथें राजेपणा हा भाव शुभकर्मोदयानें उत्पन्न झाला आहे. वास्तविक विचार केला असतां आत्मा राजा नाहीं, रंक नाहीं, काळा गोरा इत्यादि वर्णयुक्त नाहीं. हें आत्म्याचें स्वरूपच नव्हें. यास्तव यामध्यें जो अहंपणा उत्पन्न होतो तो खोटा आहे. यांच्या योगानें आत्म्याला बंध होतो. कारण मोहनीय कर्माच्या योगानें बंध होतो व त्या मोहास हे मिथ्याज्ञान देखील साहाय करितें. ह्मणून अज्ञान-मिथ्याज्ञान हें देखील बन्धास कारण आहे. यामुळें भगवान् अभिनन्दन तीर्थकरांनीं अज्ञानमूढ झालेल्या लोकांचा उद्धार करावा ह्मणून खऱ्या तत्वाचा उपदेश केला व त्यांचा अज्ञानांधकार दूर केला व खऱ्या तत्वांचें लोकाकडून ग्रहण करविलें.

भगवानभिनन्दनस्वामी केन रूपेण तत्वमजिग्रहदित्याह।

**अभिनन्दन तीर्थकरांनीं कोणत्या रीतीनें खऱ्या तत्वांचें ग्रहण करविलें हें स्तुतिकार सांगतात.**

क्षुदादिदुःखप्रतिकारतः स्थिति-
नचेन्द्रियार्थप्रभवाल्पसौख्यतः ।
ततो गुणो नास्ति च देहदेहिनो-
रितीदमित्थं भगवान्व्यजिज्ञपत् ॥१८॥

क्षुदादीत्यादि । क्षुद् बुभुक्षा आदिर्यस्य पिपासादेस्तदेव दुःखं तस्माद्वा दुःखं तस्य प्रतीकारो भोजनादिना उपशमनं तृप्तिसुखोत्पाद इत्यर्थः तस्मात्ततः । **स्थितिः** देहदेहिनोस्तृप्तिसुखसमन्वितयोः सर्वदा अवस्थानं । **नच** नैव । कुतः ? पुनरपि क्षुदादिपीडोपलम्भात् । तर्हि मनोज्ञरूपशब्दादिविषयप्रभवसुखात्तयोः सुखेनावस्थानं भविष्यतीत्याह **नचे**त्यादि । इन्द्रियाणि स्पर्शनादीनि, अर्थास्तद्विषयाः स्पर्शादयः तेभ्यः प्रभवत्युत्पद्यते इतीन्द्रियार्थप्रभवं तच्च तदल्पसौख्यं च सुखलवमात्रं. तस्मात्ततः । **नच** नैव स्थितिः सुखेनावस्थानं देहदेहिनोरिति सम्बन्धः । यत एव **ततः** कारणाद्गुण उपकारो **नास्ति** च न विद्यते एव क्षुदादिप्रतिकारादिभ्यः । कयोः ? **देहदेहिनोः** । इति हेतोः । एव**मिदं** जगत् **इत्थ**मनेन प्रकारेण । **भगवान**भिनन्दनस्तीर्थकरदेवः **व्यजिज्ञपत्** ज्ञापितवान् ॥

**मराठी अर्थ**–आत्मा व देह यांस भूक तहान इत्यादिकापासून होत असलेली पीडा जेवण्यानें किंवा पाणी प्याल्यानें नाहींशी होत नाहीं. यांच्यापासून देह व आत्मा यांचें कायमचें रक्षण होत नाहीं. जेवल्यापासून भूक मिटतें व सुख होतें; परन्तु तें सुख फार वेळपर्यन्त टिकून रहात नाहीं. तहान लागली असतां तिच्या शमनार्थ पाणी प्यालें गेलें तरी पुनः कांहीं वेळानें तहान लागतेंच. तेव्हां एकदां भोजन केल्यानें किंवा एकदा पाणी प्याल्यानें जन्मभर भोजन व पाणी न मिळालें तरी देह व आत्मा यांचें संरक्षण होऊं शकणार नाहीं. इन्द्रियजनित स्पर्शादि सौख्यापासून देह व आत्मा यांची पूर्ण

तृप्ति होत नाहीं. कारण, जोपर्यन्त सुखसामग्री आहे तोपर्यन्त देह व आत्मा यांना सुख होतें. व त्यांचा अभाव झाला म्हणजे पुनः देह व आत्मा यांना दुःख भोगावें लागतें. तात्पर्य, इन्द्रियजनित सुखामध्यें देह व आत्मा यांना कायमचें सुखी करण्याची शक्ति नाहीं. याचें कारण हें आहे कीं इन्द्रियजन्य सुखच मुळीं टिकाऊ नाहीं. तेव्हां तें आत्म्याला व देहाला कायमचे सुखी कसें करूं शकेल? यामुळें भोज्य पदार्थ व इंद्रियजन्य स्पर्शादि सुख यापासून आत्मा व देह यांच्यावर कोणताच उपकार होत नाहीं असा भगवान् अभिनंदन तीर्थकरांनीं आपल्या सर्व भव्यांना आपल्या मधुर व हितकर वाणीनें उपदेश केला.

भावार्थः—इंद्रियजन्य सुखामध्यें पूर्ण तृप्ति करण्याची शक्तिच नाहीं. तें सुख वरचेवर इच्छेला उत्पन्न करतें. जरी इंद्रियजन्य सुखापासून थोडासा आनंद मिळतो तरी तो लौकरच विलयाला जाऊन दुःखाचा भडका होतो. जसें, खरूज किंवा गजकर्ण खाजविण्यामध्यें प्रथमतः आनंद वाटतो परंतु जेव्हां आंतून रक्त निघूं लागतें त्यावेळेस तो सारा आनंद पार नाहींसा होतो व दुःसह वेदना होऊं लागतात. याचप्रमाणें विषयोपभोगांचा अनुभव घेतांना सुख झालें तरी त्यापासून परिणामीं दुःखा दत्त म्हणून पुढें उभें राहतें. संसारिक सुख वास्तविक दुःख आहे. कारण, हें आत्म्यापासून उत्पन्न झालेलें नसतें, कर्मजन्य आहे. याचा उपभोग घेतेवेळेस अनेक संकटें येतात. हें कर्मबन्धास कारण आहे. यामुळें याला दुःखच म्हटलें पाहिजे. याच आशयाची प्रवचनसार ग्रंथामध्यें एक गाथा आहे. ती अशीः—

सपरं बाधासहियं विच्छिण्णं बन्धकारणं विसमं ।
जं इंदियेहि लद्धं तं सुक्खं दुक्खमेव तहा ॥ १ ॥

यामुळें संसारिक सुखानुभवापासून तृप्ति न होतां तृष्णा वाढत जाते. इंद्र चक्रवर्ती इत्यादि पुण्यशाली जीवांना देखील जें सुख होतें त्यापासून त्यांचीही तृष्णा वाढत जातेंच. यामुळें त्यांना देखील वास्तविक सुख नाहीं. जर त्यांना वास्तविक सुख मिळतें तर त्यांना वारंवार विषय सेवनांत प्रयत्न करावा लागला नसतां. या एवढ्या विवेचनावरून हें ठरलें कीं देह व आत्मा यांच्यावर इंद्रिय सुखापासून कोणताच उपकार होत नाहीं उलट दुःख मात्र होतें, यासाठीं विषयसुख हें दुःखच आहे. याला सुख समजणें ही भ्रांति आहे. या सुखाचा त्याग करा असा भगवान् अभिनंदनांनीं जीवांना उपदेश केला.

इदं च परमकारुणिको भगवान् जगदुपकारार्थमवादीदित्याह ।

परम दयाळू भगवान अभिनंदनांनीं आणखी जगाच्या कल्याणासाठीं जो उपदेश केला त्याचें वर्णन स्तुतिकार सांगतात.

जनोतिलोलोप्यनुबन्धदोषतो,
भयादकार्येष्विह न प्रवर्तते ।
इहाप्यमुत्राप्यनुबंधदोषवित्,
कथं सुखे संसजतीति चाब्रवीत् ॥१९॥

जनोतिलोलो इत्यादि । जनो लोकोऽतिलोलोप्यतिविषयासक्तोऽपि अनुबंधः आसक्तिः । स एव दोष ऐहिकपारत्रिकापायहेतुत्वात् । तस्मात् अनुबंधदोषतः । परमासक्तिवशादपि । अकार्येषु । अकृत्येषु परस्त्रीगमनादिषु । इह लोके न प्रवर्तते । कस्माद्भयाद्राजादित्रासात् । यस्तु जन इहाप्यस्मिन्नपि जन्मनि । अमुत्रापि च । परलोकेऽपि च । अनुबंधदोषवित् विषयासक्तिदोषवेदकः । स कथं सुखे वैषयिके संसजति संबंधमुपयातीति इदमपि चाब्रवीद् उक्तवान् ।

**मराठी अर्थः**-पंचेन्द्रियांच्या विषयामध्यें गढून जाणें हा दोष आहे. कारण या दोषामुळें इहलोकीं व परलोकीं दुःखें भोगावीं लागतात. आसक्ति त्या दुःखाला कारण आहे. तेव्हां सर्व जीवांच्या ठिकाणीं विषय सेवन करण्याची तीव्र लालसा असूनही या लोकीं राजा, धर्म, कुलीनता इत्यादिकांची भीति मनांत जागृत असल्यामुळें त्या विषयाकडे त्यांची अन्याय प्रवृत्ति होत नाहीं. तेव्हां विषयासक्त माणसांची धर्मादिकांच्या भीतिमुळें विषयसेवनीं प्रवृत्ति जर दिसून येत नाहीं तर ज्याला विषय सेवनापासून उत्पन्न होणारे दोष सूर्य प्रकाशाप्रमाणें अतिशय स्पष्ट दिसत आहेत असा चांगला मनुष्य वैषयिक सुखाला बिलगून न राहील काय? याप्रमाणें भगवान् अभिनंदन जिनांनीं भव्यांना उपदेश केला.

अत्रैवानुबन्धदोषांतरं दर्शयन्नाह ।

विषयासक्तिपासून अजून कोणतें दोष उद्भवतात याचा भगवान निर्देश करितात.

स चानुबन्धोस्य जनस्य तापकृत्
तृषोभिवृद्धिः सुखतो नच स्थितिः ।
इति प्रभो लोकहितं यतो मतं
ततो भवानेव गतिः सतां मतः ॥ ५ ॥

स चानुबंध इत्यादि । चकारो भिन्नप्रक्रमे तृषोभिवृद्धिरित्यस्यानंतरं द्रष्टव्यः । सोनंतरोक्तोऽनुबंधो विषयासक्तिः । अस्यातिलोलस्य जनस्य तापकृत् क्लेशप्रदः । न केवलमनुबन्धस्तापकस्तृषोऽभिवृद्धिश्च । यांवति स्त्र्यादिविषये स्वर्णाद्यर्थे वा आसक्तिः अभिलाषानुबंधः संजातस्तस्मिन्संपन्नेऽपि इतोप्यपरं यदि स्यात्ततोऽपरमित्युत्तरोत्तराकांक्षा तृषोभिवृद्धिः । सा च तापिका । तदलाभे तत्प्राप्त्यर्थं तल्लाभे तत्संरक्षणाद्यर्थं च सं-

तापप्रबंधस्य प्रवृत्तेः । ननु विषयसुखं प्राप्य संतापविवर्जिता जनस्य स्थितिर्भविष्यति इत्याह, सुखतो नच स्थितिः । सुखतः सम्प्राप्तविषयसुखत्वात् अस्य जनस्य नच नैव स्थितिः सुखेनावस्थानं पुनः संताप-प्रबंधप्रवृत्तेः । इति एवं । प्रभोऽभिनंदन स्वामिन् । लोकहितं लोकेभ्यो हितं उपकारकं यतो यस्मात्कारणात्त्वदीयं मतं । ततः कारणाद्भवानेव गतिः शरणं । सतां विवेकिनां मुक्त्यर्थिनां । मतः सद्भिरभिप्रेत इत्यर्थः । मतिबुद्धिपूजार्थाच्चेति सम्प्रति क्तः तद्योगे सतामित्यत्र ' भवती ' त्यनेन कर्तृता । कर्तरि ता ।

चतुर्थः स्वयम्भूः समाप्तः ।

---

मराठी अर्थः—संसारी लोकांच्यामागें लागलेली ही विषयाभिलाषा त्यांना दुःख देतें. इतकेंच नव्हे तर या विषयाशेपासून उत्तरोत्तर इच्छा वाढत जातें. द्रव्य, घर व सुंदर स्त्री एतद्विषयक इच्छा उत्तरोत्तर ते पदार्थ मिळाले असतां वाढत जाते व त्यामुळें समाधान रहात नाहीं म्हणून दुःख होतें. जे विषयभोगाचे पदार्थ आपल्याला मिळाले नसतात ते मिळविण्यासाठीं आपलीं सारखी धडपड चाललेली असतें. यामुळें ही दुःख होतें व ते पदार्थ मिळाले असतां त्यांचें संरक्षण करण्याची चिंता हमेशा उत्पन्न होतें. यामुळें विषयाशा दुःखद आहे हें सिद्ध होतें. तसेंच थोड्याशा वैषयिक सुखाची प्राप्ति झाली म्हणजे संसारी जीव कायमचे सुखी होतात असेंही नाहीं. पुनः त्यांना अभिलाषेपासून दुःख होऊं लागतेंच. यासाठीं हे प्रभो ! आपले सर्व जनांचें कल्याण करणारें मत आहे म्हणून सर्व विवेकी जीवांचें रक्षण करण्यास आपणच समर्थ आहांत.

**तात्पर्य**- विषयांच्या इच्छेपासून उत्तरोत्तर विषयेच्छा वाढतच जाते. व इच्छा वाढत चालली म्हणजे समाधानास हृदयांत स्थान मिळत नाहीं. मनुष्य हावरा बनतो. यासाठीं भगवंतांनीं इच्छेचा त्याग करण्याचा जो उपदेश केला तोच लोकांचें कल्याण करणारा आहे. व सत्पुरुष भगवन्ताच्या मताचा आश्रय करून आपलें कल्याण करून घेतात.

यामप्रमाणें अभिनंदन तीर्थकरांची स्तुति संपली ।

---

सुमतितीर्थकरस्तुतिः ।

उपजाति छन्दः ।

अन्वर्थसंज्ञः सुमतिर्मुनिस्त्वं
स्वयं मतं येन सुयुक्तिनीतम् ।
यतश्च शेषेषु मतेषु नास्ति
सर्वक्रियाकारकतत्त्वसिद्धिः ॥ २१ ॥

**अन्वर्थसंज्ञे**त्यादि । अन्वर्था अनुगतार्था संज्ञा नाम यस्यासावन्वर्थसंज्ञो यथार्थनामेत्यर्थः । कासौ संज्ञा अनुगतार्था तस्येत्याह **सुमतिरि**ति शोभना मतिर्यस्यासौ सुमतिः । कथम्भूतः ? **मुनिः** प्रत्यक्षवेदी । कथं शोभना मतिरस्य सिद्धा यतोऽन्वर्थसंज्ञत्वं स्यादित्याह **स्वय**मित्यादि । स्वयमात्मना **मत**मंगीकृतं तत्त्वं । **येन** कारणेन । **सुयुक्तिनीतं** शोभना युक्तिरुपपत्तिः सुयुक्तिः तया आनीतं प्रणीतं तस्यां वा नीत प्रापितं । अनेकधर्मात्मकं जीवादितत्त्वं विवक्षिताविवक्षितधर्मगुणप्रधानभावेन प्रतिपादितं प्रमाणगोचरचारितया वा व्यवस्थापितमित्यर्थः । न केवलं एतस्मात्कारणात्त्वं सुमतिः किंत्वेतस्मादपीत्याह । **यतश्च** यस्माच्च कारणात् । **शेषेषु मतेषु** । त्वन्मतादन्येषु मतेषु **नास्ति** न विद्यते । कासौ इत्याह **सर्वे**त्यादि । क्रियाश्च कारकाणि च । सर्वाणि च तानि क्रियाकारकाणि च तेषां तत्त्वं स्व-

रूपं । तस्य सिद्धिरुत्पत्तिर्ज्ञप्तिर्वा । नहि क्षणिकैकान्ते उत्पत्तिर्घटते कारणत्वेन अभिमतक्षणस्य क्षणिकत्वेन सर्वथा नष्टत्वात् । कार्यत्वेनाभिमत-क्षणस्य च सर्वथाऽलब्धात्मलाभतया असत्त्वात् । न चासत् खरविषाणतुल्यं कस्यचित्कारणं कार्यं वा युक्तं अतिप्रसंगात् । नापि नित्यैकान्ते सा घटते । सर्वथा अविकारिणः खपुष्पवत्कार्यकारणभावाभावात् तत्र उत्पत्त्यनुपपत्तेः । अत एव ज्ञप्तिरपि क्षणिकाद्येकान्ते दुर्घटा । उत्पन्नं हि प्रमाणं ज्ञापकं भवति । न तदेकान्ते उत्पत्तिः सम्भवतीत्युक्तं ।

मराठी अर्थः—प्रत्यक्षज्ञानी अशा सुमति तीर्थकराचें नांव अगदीं अन्वर्थ होतें. कारण, सुमति ह्मणजे चांगली–वस्तुस्वरूपास यथार्थ जाणणारी आहे बुद्धि ज्याची तो. असा अर्थ या सुमति शब्दाचा आहे. व हे जिनपति प्रत्यक्षवेदी असल्यामुळें यांना हें सुमति असें नांव अगदीं योग्य होतें. तसेंच यांनीं ज्या मताचा अंगिकार केला होता ज्या मताचा यांनीं प्रसार केला होता, तें मत सुयुक्ति–अखंड्य अशा युक्तींनीं स्थापिलें होतें. अर्थात् जीवादि पदार्थांमध्यें अनेक धर्म आहेत. परंतु वक्त्याची जो धर्म वर्णन करण्याची इच्छा असते, त्यावेळेस तो धर्म त्या पदार्थामध्यें मुख्य रीतीनें मानला जातो व इतर धर्म त्यावेळेस गौण समजले जातात. कारण, त्यावेळेस इतर गुणांचें प्रदर्शन करण्याची वक्त्याची इच्छा नसते. अशा रीतीनें जीवादिगत धर्मांची सिद्धि होतें व ती सुयुक्तिपरिप्लुत आहे. तसेंच प्रत्यक्ष व परोक्ष प्रमाणांनींही या पदार्थांची सिद्धि होते. यामुळें सुमति जिनेश्वराचें मत उत्कृष्ट आहे हें सिद्ध होतें. तसेंच हे जिनेश दुसऱ्यांच्या मतामध्यें बौद्ध, नैयायिक इत्यादिकांच्या सर्वथा अनित्य व नित्य पदार्थांना मानणारांच्या मतामध्यें सर्व क्रिया व कारक यांच्या स्वरूपांची उत्पत्ति व ज्ञान होत नाहीं. याचें स्पष्टीकरण–बौद्ध हे

सर्वथा सर्व वस्तु क्षणिक आहेत असें प्रतिपादन करतात. यामुळें क्षणिकैकांतमतामध्यें कार्यरूप पदार्थ व कारणरूप पदार्थ या दोघांचीही सिद्धि होत नाहीं. कारण, आपण ज्याला कारण ह्मणतो तेंही क्षणिक असल्यानें कार्य उत्पन्न होण्यापूर्वी सर्वथा नाश पावतें. व कारणाचा बिलकुल नाश झाल्यामुळें कार्याची उत्पत्ति व्हावयाचीच नाहीं तें हमेशा गाढवाच्या शिंगाप्रमाणें असत् समजलें जाईल. गाढवाचें शिंग ही वस्तु जशी जगांत नाहीं तद्वत कार्य देखील जगांत उत्पन्न होणार नाहीं. कारणाचा जर निरन्वय नाश मानला तर त्यापासून कार्याची उत्पत्ति होत नाहीं. तसेंच पदार्थ जर सर्वथा क्षणिक मानला तर तो कोणाचें कारण अथवा कोणाचें कार्य होउ शकत नाहीं. जसें गाढवाचें शिंग सर्वथा असत् असल्यानें तें कशाचें कार्य व कारणही होऊं शकत नाहीं.

नैयायिक व सांख्य हें पदार्थ नित्य मानतात. पदार्थ नित्य मानल्यानें देखील त्यामध्यें कार्यकारण भाव सिद्ध होत नाहीं. कारण सर्वथा नित्य पदार्थांमध्यें विकार–परिणति होत नसल्यामुळें तो पदार्थ हमेशा एकाच अवस्थेंत राहील.

बौद्धमतामध्यें पदार्थाचें ज्ञानही होऊं शकत नाहीं. कारण; त्यांनीं ज्ञान उत्पन्न होण्यास पदार्थांना कारण मानलें आहे. पदार्थांच्या अभावीं ज्ञान होऊं शकत नाहीं. जसें घागर नेत्राला दिसली ह्मणजे तिचें आपणास ज्ञान होतें व ती दिसली नाहीं तर तिचें ज्ञान होणार नाहीं. परंतु यांच्यामतें सर्व पदार्थ क्षणिक असल्यामुळें ज्ञान होणार कसें ? पदार्थ पहिल्या क्षणीं उत्पन्न झाला त्यावेळेस ज्ञान होऊं शकत नाहीं. पहिला क्षण त्याच्या उत्पत्तींतच नष्ट झाल्यामुळें तो ज्ञानास कारण होऊं शकत नाहीं; व दुसऱ्या क्षणीं पदार्थ नाश पावतो यामुळेंही तो पदार्थ

ज्ञानाच्या उत्पत्तीस कारण होत नाहीं. आणि जर ज्ञान उत्पन्न झालें तर तें पदार्थांच्या अभावीं झाल्यामुळें त्याला सत्यता येणार कशी ? व जेवढीं ज्ञानें होतील तीं सर्व पदार्थांचा नाश झाल्यावरच उत्पन्न झाल्यामुळें त्यांना प्रमाण मानता येणार नाहीं. यामुळें ज्ञानाची उत्पत्ति हीं बौद्धाच्या मतांत सिद्ध होत नाहीं. यास्तव हे जिनेश आपलेंच मत सर्व पदार्थांची निर्दोष सिद्धि करणारें आहे.

तदेवमंगीकृतस्य तत्वस्य सुयुक्तिनीतत्वं प्रदर्शयन्नाह ।

सुमति जिनेश्वरांनीं स्वीकारलेलें मतच सयुक्तिक आहे असें ग्रंथकार या श्लोकांत दाखवितात.

अनेकमेकं च तदेव तत्त्वं
भेदान्वयज्ञानमिदं हि सत्यम् ।
मृषोपचारोऽन्यतरस्य लोपे
तच्छेषलोपोपि ततोऽनुपाख्यम् ॥ २२

**अनेकमि**त्यादि । तदेव जीवादिलक्षणं **तत्त्वं** अनेकस्वभावं । सुखदुःखादिबालकुमारादिपर्यायापेक्षया । **तदेव चैकं** । सकलपर्यायान्वयार्थैकद्रव्यापेक्षया । कथम्भूतं तदनेकमेकं च स्यादित्याह **भेदान्वयज्ञान**मिति । भेदान्वययोर्ज्ञानं ग्राहकं प्रमाणं यत्र । जीवादितत्त्वे हि सुखादिभेदप्रतीतिर्भेदज्ञानं । सुखादौ बालकुमारादौ च स एवाहमित्यात्मद्रव्यस्याभेदप्रतीतिरभेदज्ञानं । ननु पर्यायमात्रमेव वास्तवं तत्त्वं न द्रव्यं तस्य अनाद्यविद्याकल्पितत्वात् । अतो भेदज्ञानमेव सत्यमिति सौगताः । जीवादि द्रव्यं वास्तवं न सुखादिपर्यायास्तेषामौपाधिकत्वात् इति सांख्याः । अत्राह इदं हि सत्यमिति । **इदं** भेदान्वयग्राहि ज्ञानं । **हि** स्फुटं **सत्यं** । सकलप्रमाणबाधकवैधुर्यात् । क्षणिकचित्तादिक्षणेषु एकत्वमेकसंततिपतितत्वेनारोपितमिति बौद्धाः । जीवादिद्रव्ये अनेकत्वमुपचारात्

संतेऽत्यन्ताभिन्नैरनेकसुखादिपर्यायैः संबंधेन तत्रानेकत्वव्यवहारात् इति नैयायिकादयः । अत्राह मृषोपचार इत्यादि । **मृषा** असत्यः । कः ? **उपचारो** भेदान्यथज्ञानादस्वरूपात्तत्र भेदाभेदयोर्वास्तवयोः प्रसिद्धः । तदन्यतरापह्नवे दूषणमाह । अन्यतरस्यादि । **अन्यतरस्या**नेकत्वस्यैकत्वस्य वा लोपेऽभावे । **तच्छेषलोपोऽपि** तस्माल्लुप्ताच्छेषस्यान्यतरस्यापि **लोपः** स्यात् द्रव्यपर्याययोरन्योन्याविनाभावित्वात् । **ततोऽनुपाख्यं** तत्स्यात् । उपाख्या एकत्वानेकत्वादिस्वभावः सा न विद्यते यस्य तदनुपाख्यं निःस्वभावमिति यावत् । तथाच अवाच्यं तत्स्यात् । स्वभावाभावेन केनचिद्रूपेण तस्य वक्तुमशक्यत्वात् ।

**मराठी अर्थः**—हीं जीवादि सात तत्वें अनेक स्वभावाला धारण करणारीं आहेत. म्हणजे सुख, दुःख, बालपणा, कुमारावस्था इत्यादि पर्यायांकडे आपण दृष्टि फिरविली म्हणजे या सात तत्वांत आपल्याला अनेक धर्म आढळून येतील. तसेंच हीं तत्वें एकस्वरूपाचीं देखील आहेत. जसें सुख, दुःख बाल्यावस्था व कुमारावस्था इत्यादि पर्यायामध्यें जीव एकच असतो कारण तो संपूर्ण अवस्थेमध्यें भिन्नपणानें दिसून येत नाहीं. जसें जपमाळेंतील सर्व मण्यांतून एक दोरा असतो तद्वत् सर्व पर्यायामध्यें हा जीव एकच आहे. यावरून पर्यायांच्या अपेक्षेनें हीं तत्वें अनेक स्वभावानें भरलेलीं आहेत. व द्रव्याची अपेक्षा घेतली तर हीं द्रव्यें एक स्वभावी आहेत. तसेंच या तत्वांमध्यें या जीवादि पदार्थांमध्यें भेद व अभेद विषयक जीं दोन ज्ञानें उत्पन्न होतात तीं खरीं आहेत. सुख, दुःख, स्नेह द्वेष इत्यादि भिन्न भिन्न विकारांचें जें ज्ञान होतें तें भेदज्ञान होय. व सुख दुःख, बालपणा तरुणपणा इत्यादिकांमध्यें मी एकच आहे असें जें ज्ञान होतें तें अभेदज्ञान होय. जसें पूर्वी मी लहान होतो आतां मी मोठा झालों आहे. या उदाहरणांत लहान व मोठा

या दोन अवस्थेत आत्मा एक आहे. एकाच आत्म्याच्या या दोन अवस्था आहेत. तोच मी आहे असें जें ज्ञान होतें तें अभेद ज्ञान होय. ज्या मनुष्यास काल मी पाहिलें तोच हा मनुष्य आहे. या वाक्यांत त्या मनुष्याचा कालच्या व आजच्या अवस्थेतील एकपणा आपणास दिसून येईल. अशा एकत्व दाखविणाऱ्या ज्ञानास अभेद ज्ञान असें म्हणतात. हीं दोन ज्ञानें खोटीं नाहींत. कारण पदार्थामध्यें भेद अभेद हें आपणास स्पष्ट दिसतात म्हणून हीं दोन ज्ञानें सत्य आहेत. वस्तूमधील एकपणा व अनेकपणा हे परस्पर सम्बद्ध आहेत यांचा अविनाभाव आहे. वस्तूमध्यें एकत्व नाहीं मानलें तर अनेकत्व देखील सिद्ध होऊं शकत नाहीं. जसें अग्निच्या अभावीं धुराची उत्पत्ति बिलकुल होऊं शकत नाहीं तद्वत् एकत्वाच्या अभावीं अनेकत्व राहूं शकत नाहीं व अनेकत्वाच्या अभावीं एकत्व राहूं शकत नाहीं. यास दुसरें एक उदाहरण असें आहे कीं स्त्रीला पति असेल तरच तिच्या ठिकाणीं पत्नीत्व राहूं शकतें व पुरुषासही पत्नी असेल तरच त्याच्यांत पतिपणा येतो. म्हणजे पतित्व किंवा पत्नीत्व स्त्रीपुरुषाश्रित आहे; तसेंच एकत्व अनेकत्वावर अवलंबून आहे व अनेकत्व एकत्वावर अवलंबून आहे. या दोन धर्मांपैकीं एकच मानला तर दुसऱ्या धर्माचा अभाव होतोच; परन्तु त्याबरोबर जो धर्म आपण मानला आहे, त्याचा देखील अभाव होतो. व धर्मांचा अभाव झाल्यावर वस्तू निःस्वभाव झाल्यामुळें तिचें शब्दांनीं वर्णन होऊं शकत नाहीं, यामुळें ती अवाच्य होईल. कोणताच स्वभाव जर वस्तुमध्यें नाहीं तर तिचें वर्णन तरी कसें करतां येईल. यास्तव वस्तु एकानेक धर्मात्मक आहे असें मानलें पाहिजे. तसेंच भेदाभेदात्मक ज्ञानही खरें मानलें पाहिजे. जीवादि द्रव्यामध्यें आपणास अनेक

धर्म दिसून आल्यामुळें आपण तेथें अनेकत्वाचा आरोप करितो परन्तु तो मिथ्या आहे. कारण, अनेक सुखदुःखादि धर्मांच्या संबंधानें जीवादि पदार्थांमध्यें अनेकत्वव्यवहार होतो. वास्तविक पाहिलें असतां जीवादि द्रव्यापासून त्याचे धर्म, गुण हे सर्वथा भिन्न आहेत. यास्तव जीवद्रव्य अनेकधर्मात्मक आहे असें ह्मणणें हा उपचार आहे असें नैयायिक ह्मणतात. परन्तु उपचार ह्मणजे काय याचा आपण विचार करूं या. उपचाराचें लक्षण असें आहे ' मुख्याभावे सति प्रयोजने निमित्ते चोपचारः प्रवर्तते ।' जेथें मूलपदार्थ नाहीं परन्तु कोणतेंही प्रयोजन त्यापासून निष्पन्न होत असेल किंवा तो पदार्थ कोणत्यातरी कार्यामध्यें निमित्त रूपानें आढळून येईल तर अशा ठिकाणीं त्या मुख्य पदार्थाची उपचारानें सत्ता स्वीकारली जाते. जसें एका मुलामध्यें क्रौर्य, पराक्रम वगैरे गुण पाहून त्यास आपण हा सिंह आहे असें ह्मणतो. खरें पाहिलें असतां तो सिंह नाहीं कारण, सिंहाला तीक्ष्ण दाढा असतात. त्याचे डोळे पिंगट असतात व नखें वक्रट व तीक्ष्ण असतात. मुलाचें स्वरूप सिंहासारखें नाहीं व त्याचे अवयवही तसे नाहींत. तथापि क्रौर्य शौर्य इत्यादि गुणांच्या प्रयोजनामुळें आपण त्या मुलास सिंह ह्मणतो. वास्तव त्या मुलामध्यें सिंहाचा उपचार सर्वथा व्यर्थ नाहीं. परन्तु प्रयोजनसिद्ध्यर्थ आपण तेथें तो करतो.

याचप्रमाणें कोठें कोठें कांहीं निमित्ताच्या आश्रयानें देखील उपचार करीत असतात. जसें मतिज्ञान व श्रुतज्ञान यांना मूर्त ह्मणतात. या दोन ज्ञानांमध्यें मूर्तिकपणाचा उपचार केला आहे तो कर्मनिमित्तक आहे. यावरून उपचारव्यवहार कोठें व कसा करतात हें लक्ष्यांत आलें असेल. आतां जीवद्रव्यामध्यें जें अनेकत्व दृग्गोचर होतें ते उपचारानें तेथें आलें नाहीं. जी-

वामध्यें अनेक धर्म स्वाभाविक अनादि कालापासून आहेत. जीवामध्यें ज्ञान, दर्शन, सुख हे गुण हमेशा असतात. ते त्यापासून केव्हांच सर्वथा वेगळे असें दिसून येत नाहींत. तसें दिसून आलें असतें तर जीवाच्या ठिकाणीं अनेकत्व उपचारानें आहे असें आम्ही मोठ्या खुषीनें स्वीकारलें असतें. नैयायिकांनीं जीवद्रव्यामध्यें अनेकत्व उपचारानें कां मानलें ? या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं त्यांनीं भेदवाद मानला आहे. गुण गुणीपासून सर्वथा भिन्न आहेत. धर्म धर्मीपासून बिलकूल वेगळे आहेत. जीवद्रव्यापासून त्याचे ज्ञानादिक गुण सर्वथा वेगळे आहेत. यास्तव जीवापासून त्याचे गुण भिन्न असल्यामुळें गुणांच्या संबंधानें जीवाच्या ठिकाणीं अनेकत्व आलें. वास्तविक अनेकत्व तेथें नाहीं. यामुळें जीवांच्या ठिकाणीं सुख दुःखादिपर्याय पाहून जें भेदज्ञान उत्पन्न होतें तें खोटें आहे. तें औपचारिक आहे वास्तविक नाहीं असें नैयायिक म्हणतात. परंतु हें त्यांचें म्हणणें खरें नाहीं.

जीवद्रव्यामध्यें ज्ञानगुण हा समवाय संबंधानें आलेला आहे असें ते ह्मणतात. परंतु विचार केला असतां जीवद्रव्य, ज्ञानगुण व समवाय हे तीन पदार्थ परस्परापासून भिन्न आहेत. जसें जीवापासून ज्ञान भिन्न आहे, तसेंच जीवापासून समवाय देखील भिन्न आहे, यामुळें तो समवाय जीवामध्यें ज्ञानाचा संबंध कसा करूं शकेल. तसेंच ज्ञानाचा आत्म्यामध्यें संबंध करण्यासाठीं दुसऱ्या समवायाची कल्पना करावी लागेल यामुळें अनवस्था दोष उत्पन्न होतो. तसेंच नैयायिकांनीं एकच समवाय मानला आहे व तो व्यापक आहे असें ते ह्मणतात. यामुळें ज्ञानगुणाची योजना जशी त्यांनीं आत्म्यामध्यें केली तशीच तो पृथ्वी, तेज, आकाश इत्यादिक द्रव्यामध्यें देखील

करूं शकेल व त्यामुळें ज्ञान हा गुण सर्वांचाच मानावा लागेल. यामुळे जीव व ज्ञान यामध्यें सर्वथा भेद न मानतां कथंचित् भेद व कथंचित् अभेद मानला पाहिजे. ह्मणजेच जीव व ज्ञान यामध्यें गुण गुणिभाव सिद्ध होईल. यावरून, अनेकत्व उपचारानें आहे असें नयायिकांचें ह्मणणें अयोग्य आहे असें सिद्ध होतें.

तसेंच बौद्ध हे, आत्म्याच्या ठिकाणीं एकत्व उपचारानें आहे असें मानतात. कारण, प्रतिक्षणीं आत्मा भिन्नच असतो. जो आत्मा पूर्वक्षणांत होता तोच आत्मा उत्तरक्षणांत दिसून येत नाहीं. उत्तरक्षणीं दिसणारा आत्मा वेगळाच आहे असें ते समजतात. जसें पायाचीं नखें आपण काढून टाकलीं असतां पुनः तीं वाढतात व त्या नखामध्यें तींच हीं नखें जीं पूर्वी काढून टाकलीं होतीं असें जें ज्ञान होतें तें खोटें आहे. कारण, काढून टाकलेलीं नखें भिन्न आहेत व नं काढलेलीं नखें भिन्न आहेत. तथापि तींच हीं नखें आहेत; असें जें सदृश पदार्थांमध्यें एकत्वाचें ज्ञान होतें हें जसें मिथ्या खोटें आहे तसेंच प्रतिक्षणीं आत्मतत्व भिन्न असतांही त्यामध्यें तोच हा आत्मा असें जें एकत्वप्रदर्शक ज्ञान होतें तें खोटें आहे. त्या आत्मतत्वामध्यें एकत्व औपचारिक आहे.

परंतु हें त्यांचें ह्मणणें अनुचित आहे. कारण, प्रतिक्षणीं आत्मतत्व वेगळेंच मानलें तर स्मरण, प्रत्यभिज्ञान वगैरेची सिद्धि होऊं शकणार नाहीं. तसेंच बंध व मोक्ष, पाप व पुण्य यांचीही सिद्धि होत नाहीं. यांची कां सिद्धि होत नाहीं याचें वर्णन आम्ही, 'बंधश्च मोक्षश्च तयोश्च हेतुः, या श्लोकांत केलें आहे. यावरून जीवादिद्रव्यामध्यें एकत्व अनेकत्व विषयक जें ज्ञान होतें तें सत्य आहे असें सिद्ध होतें.

एवं द्रव्यपर्यायात्मकत्वं जीवादितत्त्वस्य प्रदर्श्येदानीं भावाभावात्मकत्वं प्रदर्शयितुमाह.

याप्रमाणें जीवादिपदार्थ द्रव्य व पर्याय स्वरूप आहेत हे वरच्या श्लोकांत स्पष्टपणें दाखविलें. आतां जीवादि पदार्थ भावाभावस्वरूप कसे आहेत हें आचार्य सिद्ध करतात.

सतः कथंचित्तदसत्त्वशक्तिः
खे नास्ति पुष्पं तरुषु प्रसिद्धम् ।
सर्वस्वभावच्युतमप्रमाणं
स्ववाग्विरुद्धं तव दृष्टितोऽन्यत् ॥ २३ ॥

**सतःकथंञ्चिदित्यादि** । **सतो** विद्यमानस्य आत्मादितत्त्वस्य स्वरूपादिचतुष्टयेन । **कथञ्चित्**परस्पादिचतुष्टयप्रकारेण तस्य **असत्त्वशक्तिः** तथा प्रतीतेः । अत्र निदर्शनमाह । खे नास्तीत्यादि । **खे** आकाशे । **नास्ति पुष्पं** । **तरुषु** पुनः **प्रसिद्धं** प्रमाणविषयतां गतम् । यदि सत्त्वमेव हि वस्तुनः स्वरूपं स्यात्तदा स्वरूपादिनेव पररूपादिनापि तस्य सत्त्वं स्यात् । तथा च तरुवत्खेपि पुष्पस्य सत्त्वं स्यात् । न चैतद्युक्त प्रतीतिविरोधात् । अतः सत्त्वाद्वैतवादिनो मतमयुक्तमेव ।

यदि पुनरसत्त्वमेव वस्तुनः स्वरूपं इष्यते तदा पररूपादिचतुष्टयेनेव स्वरूपादिचतुष्टयेनापि स्यादसत्त्वं । तथाच खे इव तरुष्वपि पुष्पासत्त्वं स्यात् । न चैवमस्ति, प्रतीतिविरोधात् । अतः शून्यैकांतवादिमतमप्ययुपपन्नम् । एतदेवाह **सर्वे**त्यादि । सर्वे च ते स्वभावाश्च अस्तित्वनास्तित्वादिसकलरूपाणि । तेभ्यश्च्युतं अपगतं तानि वा च्युतानि यस्मात्तदेवंविधं । सत्त्वाद्वैतरूपं, सकलशून्यतारूपं वा तत्त्वं । **अप्रमाणं** न विद्यते व्यवस्थापकं प्रमाणं यस्य । कुतस्तस्य व्यवस्थापकं तन्नास्तीतिचेदत्राह

**स्ववागित्यादि । तव** दृष्टिः सर्वं जीवादितत्त्वमनेकांतात्मकमिति मतं । ततोऽन्यन्मत्त द्वैतलक्षणं शून्यतैकांतस्वभावं वा तत्त्वं । तत्प्रमाणं अभ्युपगच्छतां तद्वादिनां स्ववाचा विरुद्धं स्यान्माता मेवन्ध्येत्यादिवत् । यदि हि अद्वैतं, कथं प्रमाणं, द्वैतप्रसंगात् । यदि च शून्यतैकांतः, कथं प्रमाणं, तत्सद्भावतस्तदेकांतविरोधानुषंगात् ।

**मराठी अर्थः**–जीवादि पदार्थ स्वरूप चतुष्टयाच्या अपेक्षेनें कथंचित् सत् आहेत. व पररूपचतुष्टयानें ते कथंचित् असत् आहेत. अशी प्रतीति( अनुभव )येत असते. यास उदाहरण असें समजावें कीं स्वरूपचतुष्टयाच्या अपेक्षेनें फूल हें झाडावर दिसतें परंतु आकाशामध्यें फुलाचा अभाव आहे. तात्पर्य-फुलें हीं झाडाला येत असतात, तीं आकाशाला लागत नाहींत. त्याचप्रमाणें प्रत्येक वस्तु स्वचतुष्टयाच्या अपेक्षेनें मात्र आपलें अस्तित्व कायम ठेवितात. परचतुष्टयाच्या अपेक्षेनें तिचा अभाव मानला जातो. स्वपरचतुष्टयाच्या अपेक्षेनें वस्तूचें अस्तित्व केव्हांच सिद्ध होत नाहीं. अशा वस्तूचें अस्तित्व सिद्ध करून देणार प्रमाण जगांत कोणतेंही नाहीं. म्हणून अशा रीतीनें वस्तुव्यवस्था माननाऱ्याचें वचन विरुद्ध आहे. जसें माझी आई वांझ आहे असें म्हणणाऱ्याचें बोलणें अगदीं विरुद्ध आहे. कारण, जिला मातृपणा प्राप्त झाला आहे ती वंध्या नसते व जी वंध्या आहे तिला मातृपणाची प्राप्ति केव्हांच होत नाहीं. त्याचप्रमाणें स्वपरचतुष्टयाच्या अपेक्षेनें वस्तूचें अस्तित्व मानणें हें स्ववचनविरुद्ध आहे. कारण. स्वचतुष्टयाच्या अपेक्षेने वस्तूचें अस्तित्व सिद्ध होतें परंतु परचतुष्टयाचे अपेक्षेनें देखील तें मानणें बिलकूल विरुद्ध आहे. यास्तव हे जिनेश आपल्या अनेकांत मतामध्येंच वस्तुसिद्धि होते. यास्तव आपलेंच मत सर्वोत्कृष्ट आहे.

विशेषार्थ--जैनमतामध्यें सर्व पदार्थ सदसदात्मक आहेत. कोणतीही वस्तु सर्वथा सदात्मक किंवा सर्वथा असदात्मक नाहीं. अर्थात् स्वद्रव्य, स्वक्षेत्र, स्वकाल व स्वभाव यांच्या योगें वस्तुचें अस्तित्व सिद्ध होतें व परद्रव्यचतुष्टयाच्या अपेक्षेनें तिचें नास्तित्व सिद्ध होतें. आतां तेथें स्वद्रव्यचतुष्टय ह्मणजे काय या विषयीं लिहिल्यास विषयान्तर होणार नाहीं. स्वद्रव्य ह्मणजे गुण पर्याय यांनीं युक्त जो पदार्थ त्याला द्रव्य ह्मणतात. आपल्या गुणपर्यायांनीं प्रत्येक द्रव्य युक्त असतें. दुसऱ्या पदार्थाचें गुण व पर्याय कोणतेंही द्रव्य धारण करीत नाहीं. अन्यथा, विवक्षित द्रव्याचें लक्षणच करतां आलें नसतें. ह्मणून उमास्वामी आचार्यांनीं ' नित्यावस्थितान्यरूपाणि ' या सूत्रांत अवस्थित शब्द ठेवला आहे तो याच अर्थाचा द्योतक आहे. यावरून प्रत्येक द्रव्य आपल्या स्वभावामध्येंच स्थिर राहतें.

स्वक्षेत्र ह्मणजे प्रदेश, पदार्थाचे अवयव, पदार्थ आपल्या प्रदेशामध्यें--अवयवामध्येंच राहतो क्षेत्र याचा अर्थ आकाश असाही होतो. परंतु तो अर्थ येथें घेणें इष्ट नाहीं. कारण, जेवढ्या आकाशप्रदेशामध्यें तो पदार्थ आहे तेवढ्याच आकाशप्रदेशामध्यें इतर पदार्थही आहेत; तेव्हां त्या आकाशप्रदेशांना स्वक्षेत्र कसा ह्मणतां येईल ? यास्तव पदार्थाचे जितके प्रदेश आहेत तेच त्याचें स्वक्षेत्र आहे.

स्वकाल या शब्दाचा अर्थ कालद्रव्य असा नाहीं. प्रत्येक समयीं अवस्था बदलत असते. यामुळें भिन्नभिन्न अवस्था उत्पन्न करण्यास प्रत्येक द्रव्य समर्थ आहे. ह्मणून द्रव्यासच काल ह्मटलें आहे. द्रव्य आपली अवस्था बदलण्यास उपादान कारण आहे व काल द्रव्य हें निमित्त कारण. द्रव्याच्या ज्या अवस्था

होतात त्यांसच स्वकाल म्हणावयाचे. कारण, त्या अवस्था त्या द्रव्यापासून भिन्नभिन्न आहेत. यांसच स्वकाल म्हणतात.

स्वभाव--गुण, पदार्थांतील गुणांस स्वभाव म्हणतात. यासच धर्म, प्रकृति, वगैरे नांवें आहेत. द्रव्य गुणसमुदायरूप आहे. जर द्रव्याकडे आपण गुणाच्या दृष्टीनें पाहिलें तर त्यामध्यें सर्व गुणच दिसून येतील. द्रव्य म्हणून वेगळे कांहीं दिसणार नाहीं. जसें हें आपलें शरीरच पहा ना ! याकडे आपण हात, पाय, तोंड, नाक, कान इत्यादि अवयव या दृष्टीनें पाहिल्यास आपल्यास अवयवापासून वेगळें असें शरीर दिसेल काय. सर्व अवयव म्हणजेच शरीर. याचप्रमाणें गुणदृष्टी मनांत ठेऊन द्रव्याकडे पाहिले असतां गुणाशिवाय द्रव्य बिलकुल वेगळे दिसणार नाहीं.

अशा या स्वद्रव्यचतुष्टयानें प्रत्येक वस्तु आपल्या स्वरूपामध्यें रहात असते. म्हणूनच स्वद्रव्यचतुष्टयाच्या अपेक्षेनें ती वस्तु सत् आहे. याप्रमाणें वस्तुमध्ये भावाभावात्मकता दिसून येते. सर्वथा वस्तु सदात्मकच आहे असें म्हणणें योग्य नाहीं. तसें मानल्यास जसें वस्तु स्वरूपानें भावात्मक आहे तशी ती पररूपानें देखील भावात्मकच होईल. याचप्रमाणें वस्तु सर्वथा अभावात्मकही पण नाहीं. सर्वथा तिचा अभाव मानल्यास स्वरूपानें देखील तिचा अभाव होईल व यामुळें गाढवाचें शिंग जसें सत् नाहीं तद्वत् वस्तूचा बिलकुल अभावच होईल. यास्तव स्वरूपाच्या अपेक्षेनें वस्तुचा सद्भाव सिद्ध होतो व पररूपाच्या अपेक्षेनें वस्तूचा अभाव सिद्ध होतो.

अद्वैतवादी सर्वथा सद्भावात्मक वस्तु मानतात. तसें मानल्यास वर सांगितलेलें दूषण प्राप्त होतें. सर्वथा अद्वैत मानल्यास

प्रमाण प्रमेय इत्यादि विभाग सिद्ध होणार नाहीं. अद्वैत प्रमाण आहे असें ह्मटल्यास तेथें द्वैतवादाचा प्रसंग आला. अर सर्वथा वस्तु शून्य मानली तर वर सांगितलेलें दूषण प्राप्त होईल. शून्य वादाची सिद्धि ज्या प्रमाणानें कराल तें प्रमाण शून्य आहे कीं अशून्य ? तें प्रमाण शून्य असल्यास शून्यवादाची सिद्धि कशी होणार ? व जर प्रमाण अशून्य आहे असें ह्मणाल तर त्यापासून सर्व पदार्थांचा सद्भाव सिद्ध होईल, शून्यवाद हा त्या प्रमाणापासून सिद्ध होणार नाहीं. यास्तव वस्तु भावाभावात्मक आहे हें सिद्ध होतें.

एवं युगपज्जीवादितत्त्वस्य सदसद्भावतां प्रतिपाद्य विपक्षे दूषणपुरःसरतया क्रमेणापि तस्य तां प्ररूपयन्नाह ।

याप्रमाणें युगपत् जीवादि पदार्थांमध्यें सदसद्भावता कशी येतें हें आचार्यांनी वर्णिलें. आतां क्रमानें सदसद्भावता कशी आहे हें दाखवितात.

न सर्वथा नित्यमुदेत्यपैति,
नच क्रियाकारकमत्र युक्तम् ।
नैवासतो जन्म सतो न नाशो
दीपस्तमःपुद्गलभावतोऽस्ति ॥ २४ ॥

न सर्वथेत्यादि । वस्तु सर्वथा न उदेति उदयं गच्छति । न अपैति नाशं गच्छति । योगसांख्यमीमांसकैः यदि सर्वथा द्रव्यप्रकारेणापि पर्यायप्रकारेणापि नित्यं तत्त्वं परिकल्प्यते, तदा तत्तथाविधं तावदुदेति उत्पद्यते । उत्तराकारस्वीकारं करोति च न तथा अपैति पूर्वाकारपरित्यागं करोति न । पूर्वाकारपरित्यागोत्तराकारस्वीकारयोः सर्वथा नित्ये विरोधात् । किंच क्रियाकारकसद्भावसिद्धौ उदयो व्ययो वा धर्मश्चिन्त्येत । नच सर्वथा नित्ये वस्तुनि तत्सद्भावः सम्भवतीति नचेत्या-

दिनाह । नच नैव । अत्र सर्वथा नित्ये क्रिया स्थानगमनादिलक्षणा कारक च तस्या निर्वर्तकं । तद् युक्तमुपपन्न । सर्वथैकरूपे हि वस्तुनि यदि गमन, तदेव सर्वदा स्यान्न स्थान । तथा गमनादिक्रियाया यदि सत्कारक तदा सर्वदा तस्य कारकत्वप्रसगाद् न कदाचिदकारकत्व स्यात्ततस्तत्क्रियोपरम स्यात् । अथ कदाचित्तस्यास्तदकारक तदा सर्वथा तदकारकत्वानुषगात् नच स्वप्नेऽपि तत्र तत्क्रियोपलम्भ स्यात् । ननु सर्वथा नित्ये उक्तप्रकारेणोदयव्ययव्यवस्थासम्भवेऽपि न कथंचिन्नित्यात्मके भवन्मते तत्सम्भवो युक्त सर्वथा क्षणिक एव तत्सम्भवात् इत्यत्राह नवासत इत्यादि । सर्वथैव्यतदत्रापि सम्बध्यते । सर्वथा पर्यायप्रकारेणेव द्रव्यप्रकारेणापि असतो गगनेंदीवरवन्ना जन्म युक्त । सतश्च विद्यमानस्य घटादे सर्वथा नाशो न युक्त । ननु विद्यमानस्यापि प्रदीपादे सर्वथा विनाशप्रतीत सतो न नाश इत्येतदयुक्तमित्यत्र हि दीप इत्याह । दीपः प्रदीप । तमःपुद्गलभावतोऽस्ति । पुद्गल रूपि द्रव्य । तमोरूप पुद्गलस्तम पुद्गलस्तस्य भावस्तम पुद्गलभाव, तेन, तम पुद्गलभावत । तम पर्यायरूपेण वर्तिष्ठत इत्यर्थ ।

मराठी अर्थः—जीवादिक पदार्थ सर्वथा नित्य मानले तर त्यांची उत्पत्ति होणार नाही, तसेंच हे पदार्थ सर्वथा नित्य मानल्यामुळें यांचा नाशही होणार नाहीं. अर्थात् नित्य पदार्थामध्ये उत्पाद व व्यय हे दोन धर्म दिसून येत नाहीत. कारण नित्य पदार्थामध्य नित्यता कायमची राहते व तिचा उत्पत्ति व नाश यांच्याशी कायमचा विरोध आहे. तसेंच हे पदार्थ सर्वथा नित्य मानले तर यांच्यामध्यें स्थान, शयन, गमन इत्यादिक क्रिया होणार नाहीत. व या क्रियांना उत्पन्न करण्याचें सामर्थ्य-ही त्या नित्य पदार्थामध्ये राहणार नाहीं यात्रमाणें सर्वथा पदार्थ नित्य मानल्यास ही दूषणे उत्पन्न होतात.

याचप्रमाणें जो पदार्थ आहे त्याचीच उत्पत्ति व विनाश

होतात. जो पदार्थ नाहीं त्याची उत्पत्ति होत नाहीं. अन्यथा गाढवाच्या शिंगाची देखील उत्पत्ति झाली असती. याचप्रमाणें जो पदार्थ आहे त्याचा सर्वथा नाश केव्हांच होत नाहीं. कारण त्या पदार्थाचें अस्तित्व नाहींसे होत नाहीं. तो पदार्थ आकाशांतील फुलाप्रमाणें अभावात्मक होत नाहीं. यावरून विद्यमान पदार्थाचाच कथंचित् विनाश व उत्पत्ति हे होत असतात. यास उदाहरण.

हें पहा कीं, दिवा मालवला ह्मणजे तो अंधकाररूपानें परिणत होत असतो. ह्मणजे एका पुद्गलद्रव्याच्या या दोन अवस्था आहेत. एक प्रकाशरूप अवस्था व दुसरी अंधकाररूप अवस्था येथें प्रकाशरूप अवस्थेचा नाश होऊन अंधकाररूप अवस्थेची उत्पत्ति झाली व या दोन्ही अवस्थामध्यें पुद्गल द्रव्य आपणास दिसून येतें. ह्मणून असत् पदार्थाची उत्पत्ति व सत्पदार्थाचा विनाश होत नाहीं. ह्मणजे सत्पदार्थाच्या किती जरी अवस्था बदलल्या तरी त्याचा विनाश होत नाहीं. तसें जर होऊं लागलें तर ' नैवासतो जन्म सतो न नाशः ' हा सिद्धांत बाधित होईल. व सारी तत्त्व व्यवस्था बिघडून जाईल. यासाठीं सर्वथा पदार्थ नित्य नाहीत. असत् पदार्थाची उत्पत्ति होत नाहीं. व सत्चा सर्वथा नाश नाहीं असें मानणें उचित आहे.

विशेषार्थः—कोणताही पदार्थ सर्वथा नित्य नाहीं. द्रव्य दृष्टीनें पाहिलें असतां तो नित्य आहे व पर्यायदृष्टीनें पाहिलें ह्मणजे तो अनित्य आहे. व या दोन्हीं दृष्टी परस्पर सापेक्ष आहेत. या दोन्ही दृष्टींनीं पाहिलें ह्मणजेच वस्तूचें खरें ज्ञान होतें. व एकाच दृष्टीनें पाहिलें असतां जें वस्तूचें ज्ञान उत्पन्न होतें तें मिथ्या आहे. कारण एका दृष्टीनें संपूर्ण वस्तूचें ज्ञान होत नाहीं त्यामुळें एखाद्या पदार्थाच्या एखाद्या अवयवालाच पाहून त्या

अवयवालाच जर तो पदार्थ आहे असें आपण मानूं लागलों तर तें आपलें ज्ञान जसें मिथ्या आहे तद्वत् पर्याय दृष्टीनेंच किंवा द्रव्य दृष्टीनेंच पदार्थाकडे पाहिलें तर त्यापासून उत्पन्न होणारें ज्ञान खरें कसें असूं शकेल.

योग, सांख्य, मीमांसक यांनीं सर्वथा पदार्थ नित्य मानला आहे. व सर्वथा पदार्थ नित्य मानल्यास उत्पत्ति व विनाश या दोन अवस्था त्यांत होणार नाहींत. उत्पत्ति ह्मणजे द्रव्य आपल्या चेतन किंवा अचेतन जातीला न सोडतां बाह्याभ्यन्तर कारणें मिळालीं ह्मणजे आपली पूर्वीची अवस्था सोडून नवीन अवस्था धारण करतें. त्या अवस्थेला उत्पाद ह्मणतात. व विनाश ह्मणजे पूर्वीची अवस्था नष्ट होणें यास विनाश ह्मणतात. या दोन अवस्था नित्य पदार्थांत होत नाहींत.

नित्य पदार्थांत जर कांहीं हलन चलनादिक क्रिया किंवा कांहीं स्थित्यन्तर झालें तर उत्पत्ति व विनाश हें त्यांत दिसून आलें असतें. नित्य पदार्थ सर्वदा एकरूप असल्यामुळें त्याच्यांत एखादी क्रिया होऊं लागली तर तीच हमेशा होऊं लागेल ह्मणजे हमेशा ती एकच क्रिया करूं लागेल. व तो सदा कारकच राहील. त्यामध्यें अकारकत्व केव्हांही होणार नाहीं. व यामुळें त्या क्रियेची केव्हांच समाप्ति होणार नाहीं. व जर तो कोणती ही क्रिया करीत नाहीं असें ह्मणाल तर तो कायमचाच क्रियारहित होईल. व त्यामध्यें सदा अकारकत्व येईल. स्वप्नामध्यें देखील त्यांत क्रिया होत असलेली दिसून येणार नाहीं.

याचप्रमाणें सर्वथा अनित्य पदार्थ मानला तरी त्यामध्यें उत्पाद व्ययही संभवत नाहींत. कारण अनित्य पदार्थ प्रथम क्षणीं उत्पन्न होऊन दुसऱ्या क्षणीं लागलीच बिलकुल नाश पावल्यामुळें तदनन्तरक्षणीं जर एखाद्या पदार्थाची उत्पत्ति झा-

लेली दिसली तर त्या पदार्थाची उत्पत्ति अकस्मात् झाली असें मानावें लागेल, व असत् पदार्थाची उत्पत्ति होऊं लागेल तर जगांत हमेशा अनन्तानन्त पदार्थ उत्पन्न होऊं लागतील. ह्मणून सर्वथा पदार्थ विनाशिक मानूं नये.

पदार्थ नित्यानित्यात्मक मानला ह्मणजे कोणतेंही दूषण उत्पन्न होत नाहीं. हें आचार्यांनीं दिव्याचा दृष्टान्त घेऊन सिद्ध करून दाखविलें आहे; तसेंच असत् पदार्थाची उत्पत्ति व सत्पदार्थाचा नाश होत नाहीं हेंही सिद्ध केलें.

इदानीं नित्यानित्यात्मकत्वं जीवादेः प्ररूपयन्नाह ।

आतां आचार्य जीव दिक पदार्थ नित्यानित्यात्मक आहेत याचें वर्णन करतात.

विधिर्निषेधश्च कथंचिदिष्टौ,
विवक्षया मुख्यगुणव्यवस्था ।
इति प्रणीतिः सुमतेस्तवेयं,
मतेः प्रवेकः स्तुवतोऽस्तु नाथ ॥२५॥

**विधिरित्यादि** । विधीयत इति **विधिरस्तित्वं** । नित्यत्वमित्यर्थः । निषिध्यते इति **निषेधो** नास्तित्वमिति यावत् । तौ च द्वौ जीवादिवस्तुनि **कथंचिद्** द्रव्यपर्यायरूपताप्रकारेणेष्टौ सुमतिस्वामिना मतौ । द्रव्यरूपतया हि तत्र विधिरिष्टः । पर्यायरूपतया तु निषेध इति । अनयोर्मध्ये कस्य प्रधानता कस्य चाप्रधानता इत्यत्राह **विवक्षयेत्यादि** । वक्तुमिच्छा विवक्षा तया **मुख्यगुणव्यवस्था** मुख्यं प्रधानं, गुणोऽप्रधानं तयोर्व्यवस्था स्थितिः । यस्य हि प्रतिपत्तुर्द्रव्ये विवक्षा प्रवृत्ता तस्य **विधिर्मुख्यो** निषेधो गौणः । यस्य तु पर्याये सा प्रवृत्ता तस्य **निषेधो** मुख्यो विधिर्गौणः । **इत्येवं इयं** प्रदर्शितप्रकारा **प्रतीतिः** तत्त्वस्वरूपप्रतिपादनं,

**सुमते**: शोभनमते: **तव** भगवतः **तां** तत्त्वप्रणीतिं तद्द्वारेण भवन्तं वा **स्तुवतो** नमस्कुर्वतो वा मे **मतेः प्रवेको** प्रविशिष्टता प्रकर्षता **अस्तु** भवतु **नाथ** सुमतिस्वामिन् ।

मराठी अर्थः--श्री सुमति जिनेश्वरांनीं जीवादितत्वांचें वर्णन करतांना विधि व निषेध यांचें वर्णन केलें आहे. विधि ह्मणजे पदार्थांचें अस्तित्व- नित्यता. निषेध ह्मणजे नास्तित्व, अनित्यता, प्रत्येक द्रव्यामध्यें नित्यत्व व अनित्यत्व हीं असतातच. यां-नांच आपण द्रव्यरूपता पर्यायरूपता अशीं नांवें देतो. ही द्रव्यरूपता-नित्यता व पर्यायरूपता--अनित्यता श्री सुमति तीर्थकरांना सर्वथा मान्य नाहीं ह्मणजे सुमति तीर्थकरांनीं सर्वथा वस्तु नित्यच आहे किंवा सर्वथा ती अनित्यच आहे असें मानलें नाहीं. त्यांनीं या नित्यत्व, अनित्यत्व धर्मांमध्यें मुख्य-प्रधान, गौण-अप्रधान कोणास मानावें हे वक्त्याचे इच्छेवर अवलंबून आहे असें सांगितलें आहे.

ह्मणजे ज्या वेळेस वस्तूच्या नित्य स्वरूपाचें वर्णन करण्याची वक्त्याची इच्छा असते, त्यावेळेस ती वस्तु त्यास नित्य स्वरूपानें युक्त आहे असें वाटतें; व तो तिच्या नित्य स्वरूपाचेंच वर्णन करतो. त्यावेळेस वस्तूंत असलेली अनित्यता गौण ठरते. तिला वक्ता त्यावेळेस महत्व देत नाहीं. तसेंच ज्यावेळीं वक्त्याच्या अंतःकरणामध्यें वस्तूच्या अनित्यत्वाचा विचार चालला असेल त्यावेळेस तो अनित्यधर्ममुखानें वस्तूंचे वर्णन करतो. वास्तविक त्यावेळेस त्याला अनित्यता ही इष्ट वाटते व नित्यधर्म हा गौण वाटतो. अर्थात् वस्तूच्या ज्या धर्माला आपण मुख्यता द्यावी तो धर्म मुख्य समजला जातो व इतर सारे धर्म, अप्रधान-गौण, महत्वहीन समजले जातात. याप्रमाणें आपल्या केवलज्ञानाच्या सामर्थ्यानें, चराच-

व वस्तु पाहणाऱ्या सुमति तीर्थकांनीं तत्वाचें स्वरूप प्रतिपा-दिलें आहे.

हे जिनेश, तें तुमचें तत्वाचें प्रतिपादन स्तुति करणाऱ्या माझ्या बुद्धीची वृद्धि करणारें होवो. एवढीच आपल्या चरणा-जवळ प्रार्थना आहे.

. भावार्थः-वस्तु सर्वथा नित्यही नाहीं किंवा ती अनित्यही नाहीं. परन्तु नित्यानित्य आहे. यामुळे आपली ज्या धर्माकडे दृष्टि वळेल त्याधर्माला आपण मुख्यता देतो. व इतरास गौण समजतो. जसें समुद्रामध्यें हमेशा पुष्कळ लाटा उद्भवतात व त्यांचा नाशही होतो, तथापि समुद्राचा नाश झाला आहे काय? समुद्राचीं कितीही स्थित्यन्तरें होत गेलीं तरी तो कायमच राहतो. त्याचा नाश होत नाहीं. जीवास अनादि कालापासून नरनारकादि पर्याय धारण करून या संसारांत फिरावें लागत आहे व अनन्तानन्त नरनारकादि पर्यायांचा नाश झाला व त्यांची तितके वेळा उत्पत्ति झाली व होईलही, परन्तु जीवाचा केव्हांच नाश झाला आहे काय? तो सर्व पर्यायामध्यें एकच हमेशा दिसून येत आहे. इत्यादि विचार करीत असतां आपली दृष्टि पदार्थाच्या नित्यत्वाकडे असते. व ज्या वेळेस आपली दृष्टी पर्यायस्वरूपाला विषय करते त्या वेळेस वस्तु पर्यायात्मकच दिसते. तिच्यांतील नित्यता त्यावेळेस अन्तर्भूत होते. ती त्यावेळेस दिसत नाहीं. जसें जीवतत्वाचा आपण विचार करतो त्यावेळेस त्याचे सर्व पर्यायच नजरेस येतात. या पर्यायांना सोडून जीवतत्व वेगळें बिलकुल दिसत नाहीं. समुद्राकडे पहा, त्यांतही लाटाशिवाय आपणांस काय दिसेल? हमेशा लाटा उत्पन्न होतात व त्या नाश पावतात. हा त्यांचा क्रम अव्याहत चालत असलेला दिसून

येईल. यावरून वस्तूमध्यें नित्यत्वही आहे व अनित्यत्वही आहे असें दिसतें. व ज्यास आपण मुख्यता देतो त्याहून इतरांस आपोआपच गौणता प्राप्त होतें. याप्रमाणें तत्व प्रतिपादन करण्याचा नियम श्रीसुमतितीर्थकरांनीं अखिल जनांना घालून दिला आहे. वस्तु स्वरूपाला ओळखण्याचा हाच मार्ग खरा आहे. याच मार्गानें बुद्धि विशद होते. असा स्तुतिकाराचा अभिप्राय आहे.

याप्रमाणें सुमतितीर्थकराचें हें पांचवें स्वयंभु स्तोत्र संपलें.

---

पद्मप्रभजिनस्तुतिः ।

उपजाति छंदः ।

पद्मप्रभः पद्मपलाशलेश्यः,
पद्मालयालिंगितचारुमूर्तिः ।
बभौ भवान्भव्यपयोरुहाणां,
पद्माकराणामिव पद्मबन्धुः ॥

**पद्मप्रभेत्या**दि । पद्मस्य प्रभेव प्रभा वर्णो यस्यासौ **पद्मप्रभः** षष्ठतीर्थकरस्येयं संज्ञा । कथम्भूतोऽसौ ? **पद्मपलाशलेश्यः** । पलाशं पत्रं तद्वल्लेश्या यस्य सः । शुक्लेश्य इत्यर्थः । पुनरपि कथम्भूतः ? **पद्मालयालिंगितचारुमूर्तिः** । पद्मालयं आवासस्थानं यस्याः सा पद्मालया लक्ष्मी-स्तया आलिंगिता क्रोडीकृता चार्वी मनोहरा मूर्तिरात्मस्वरूपलक्षणा शरीरस्वरूपलक्षणा च यस्य । अनंतज्ञानादिलक्षणया हि लक्ष्म्या आत्मस्वरूपलक्षणा चार्वी निर्मला मूर्तिरालिंगिता यस्य । निःस्वेदतादिलक्षणया तु शरीरस्वरूपलक्षणा चार्वी सकललक्षणोपेता मूर्तिरालिंगिता । स जिनः कोसौ इत्याह **बभौ** भासितवान् **भवान्** पद्मप्रभः । केषां संबंधित्वेन ? **भव्यपयोरुहाणां,** भव्या एव पयोरुहाणि कमलानि तेषां । केषामिव क

इत्याह पद्माकराणामिव पद्मबन्धुः । पद्मानामाकराः षण्डानि तेषां यथा पद्मबन्धुरादित्यो विकाशं कुर्वन् शोभितवान्, तथा भगवानपि भव्य-पयोरुहाणां हितोपदेशविकाशं कुर्वन्निति ।

**मराठी अर्थः**—जसें कमलांच्या समूहाला विकसित करणारा सूर्य शोभतो तसेंच हे पद्मप्रभ जिनेश ! भव्य लोकरूपी कमलांना हितोपदेशरूपी विकासानें आपण युक्त करून शोभा धारण केली. पांढऱ्या कमलाच्या पानाप्रमाणें आपली शुक्ल लेश्या आहे. आणि चार घातिकर्मांचा नाश केल्यामुळें आपला आत्मा अनंतज्ञान, अनन्त दर्शन, अनन्त सुख व अनंतवीर्य अशा अनन्तचतुष्टय लक्ष्मीनें आलिंगित झाला आहे. अनेक शुभ लक्षणांनीं युक्त, सुंदर असें आपलें शरीर, घाम न येणें, रक्त दुधाप्रमाणें पांढरें असणें इत्यादि चौतीस अतिशयरूपी लक्ष्मीनें आलिंगित झाल आहे. अशा तऱ्हेचें आपलें दिव्य स्वरूप पाहून कोणाचे नेत्र आनंदित होणार नाहींत बरें ?

भावार्थः-येथें श्री पद्मप्रभ तीर्थकरांस शुक्ल लेश्या आहे असें सांगितलें आहे. लेश्या दोन प्रकारची असते. एक द्रव्यलेश्या व दुसरी भावलेश्या वर्णनाम कर्माच्या उदयानें जो शरीरास वर्ण प्राप्त होतो ती द्रव्यलेश्या होय. पद्मप्रभ तीर्थकरांचें शरीर चंद्राप्रमाणें शुभ्र होतें ह्मणून त्यांची द्रव्यलेश्या शुक्ल होती असें आचार्यांनीं ह्मटलें आहे. कषायोदयानें युक्त झालेली जी मन, वचन व काय या तीन योगांची प्रवृत्ति तिला भावलेश्या ह्मणतात. परंतु कषायांचा उदय दहाव्या गुणस्थानापर्यंत होतो तेथपर्यंत होत असलेली कषाय सहचरित जी योगप्रवृत्ति तिला लेश्या ह्मणता येईल. परंतु तीर्थकर प्रकृतीचा उदय तेराव्या सयोग केवली नांवाच्या गुणस्थानामध्यें होतो. व तेथें कषायांचा विलकुल अभाव अ-

सल्यामुळें शुक्ललेश्या त्या गुणस्थानवर्ती तीर्थंकरांना कशी असूं शकेल ? परंतु आचार्यांनीं ' पद्मपलाशलेश्यः ' हा शब्द ठेऊन त्यांना शुक्ललेश्या आहे असें सांगितलें, यामुळें या ठिकाणीं आचार्यांचें हें वचन विरुद्ध आहे असें वाटतें. पण थोडासा विचार केला तर हा विरोध दूर होऊं शकतो. तो असाः-

कषाय व योगप्रवृत्ति यांना लेश्या ह्मणतात. यापासून चार प्रकारचा बंध होत असतो. चार प्रकारच्या बंधामध्यें प्रकृति बंध व प्रदेश बंध हे दोन योगप्रवृत्तिमुळें होतात. 'जोगा पयडिपदेसा ' हें वचनही तेंच सांगतें. व स्थिति बंध आणि अनुभाग बंध हे कषायापासून होतात. ' ठिदि अणुभागा कसायदो होंति ' या वचनावरूनही हेंच सिद्ध होतें. पण जेथें कषायोदय नसतो तेथें केवळ योगांनाच उपचारानें लेश्या असें ह्मटलें आहे. व तेथें उपचरित शुक्ल लेश्येचें कार्य देखील केवळ प्रकृति, प्रदेशबंध हेच होतात. स्थिति व अनुभागबंध होत नाही. ह्मणुन पद्मप्रभ तीर्थंकरांना भावलेश्या शुक्ललेश्याही उपचारानें समजावी.

' पद्मालयालिंगितचारुमूर्तिः ' हें एक विशेषण पद्मप्रभ तीर्थंकरांचें वर्णनाकरितां दिलेलें आहे. याचा अर्थ स्पष्ट लिहिला आहे. येथें विशेष हें आहे कीं केवलीचें शरीर परमौदारिक असतें. व त्यांत निगोद जीवांना स्थान मिळत नाहीं. तसेंच तीर्थंकराचें शरीर समचतुरस्र संस्थान युक्त असतें ह्मणून तें अतिशय सुंदर दिसतें. जसें एखाद्या चतुर कारागिरानें बांधलेला राजवाडा प्रमाणबद्ध व निर्दोष, सुंदर असतो. तद्वत् समचतुरस्र संस्थान नामकर्मोदयानें तीर्थंकरांचें शरीर अतिशय सुंदर, प्रमाणबद्ध व अनेक शुभ लक्षणांनीं युक्त असें असते.

**कथमसौ तदीयो हितोपदेशः प्रमाणं यथावत्पदार्थपरिज्ञानासम्भवात् वाग्व्यापारासम्भवाद् वा इत्याशंक्याह ।**

**पदार्थांचें खरें ज्ञान नसल्यामुळें किंवा ज्ञानप्राप्ति झाल्याबरोबर मोक्षप्राप्ति झाल्यामुळें ते हितोपदेश करण्यास समर्थ कसे होणार ? व त्यांचा तो उपदेश प्रमाण कसा मानला जाईल ? या शंकेचें उत्तर आचार्य देतात.**

बभार पद्मां च सरस्वतीं च,
भवान् पुरस्तात्प्रतिमुक्तिलक्ष्म्याः ।
सरस्वतीमेव समग्रशोभां,
सर्वज्ञलक्ष्मीं ज्वलितां विमुक्तः ॥ २८ ॥

**बभारे**त्यादि । यो **भवान्बभार** धृतवान् । **पद्मां** चानंतज्ञानादिलक्ष्मीं न केवलं तां च **सरस्वतीं च** विशिष्टां वाणीं । अतः कथं तदीयोपदेशस्याप्रामाण्य ? कदा तां बभारेत्याह पुरस्तादित्यादि । **पुरस्ता**त्पूर्वं । कस्याः ? **प्रतिमुक्तिलक्ष्म्याः** मुक्तिं लक्षणीकृत्य प्रतिमुक्तिर्या लक्ष्मीस्तस्याः पूर्वं । अर्हदावस्थायां बभार, न सिद्धावस्थायां इत्यर्थः । ननु पद्मां सरस्वतीं च बभारेत्ययुक्तमुक्तं, वेदनीयसद्भावतो बुभुक्षादेरपि तेन भगवता धृतत्वादित्यत्राह– **सरस्वतीमेवे**ति । एवकारेण बुभुक्षादेर्निरासः । पद्मायाः कुतो न निषेध इति चेदुक्तत्वात् । उक्तस्य हि एवकारेण न निषेधः । यथा द्वौ पुत्रौ जनयामास नरनारायणमेव चेति । किंविशिष्टां तां ? **समग्रशोभां** । समग्रा परिपूर्णा शोभा यथावन्निखिलार्थप्रतिपादनलक्षणा विभूतिः, समवसरणादिविभूतिर्वा । यदि प्रतिमुक्तिलक्ष्म्याः पुरस्तात्पद्मां च सरस्वतीं च बभार तदा विमुक्तः सन्नसौ कां बभारेत्याह–सर्वज्ञलक्ष्मीं ज्वलितां विमुक्तः । **सर्वज्ञलक्ष्मीं** अनंतज्ञानादिविभूतिं **ज्वलितां** निर्मलां बभारेति सम्बन्धः । विशेषेण मुक्तः सकलकर्मरहितः सन् । **सर्वज्ञलक्ष्मीज्वलिता**मिति च क्वचित्पाठः । तत्र

सर्वज्ञलक्ष्म्या ज्वलिता उज्ज्वला दीप्ता। तज्ज्ञानवत्सर्वत्राप्रतिहता इत्यर्थः। तथाभूतां सरस्वतीं बभार। विमुक्तः सकलसंगविवर्जितः। परमयतिरित्यर्थः।

**मराठी अर्थः**—हे भगवन्! मोक्षप्राप्ति होण्याच्या पूर्वी आर्हंत्य अवस्थेत असतांना आपण अनंतज्ञानादि चतुष्टयरूपी ऐश्वर्य, व दिव्य ध्वनि हीं धारण केलीं. व यामुळेंच आपण केलेला हितोपदेश अप्रमाण मानतां येत नाहीं, तो प्रमाणच आहे. तो भव्यांचें कल्याण करणाराच आहे. याचप्रमाणें आर्हंत्य अवस्थेंत आपण वेदनीय कर्माच्या सद्भावामुळें क्षुधादिक परीषहांना धारण केलें नाहीं. कारण मोहनीय कर्माचा संपूर्णपणें आपण नाश केल्यामुळें वेदनीय कर्म निःशक्त झालें व तें आपला प्रभाव आपणांस दाखविण्यास असमर्थ झालें, यामुळें त्याच्या सद्भावानें जे अकरा परीषह उत्पन्न होतात त्यापासून आपण सर्वथा दूर आहात. अनंत ज्ञानादिक लक्ष्मीला व दिव्य ध्वनीलाच आपण धारण केलें आहे. आपला दिव्यध्वनि संपूर्ण पदार्थांचें हातांतील आवळ्याप्रमाणें स्पष्ट वर्णन करणारा आहे व समवसरणादि बाह्य ऐश्वर्यानें युक्त आहे. ज्यावेळेस आपण सर्व कर्मांचा निःशेष नाश करून मोक्षाची प्राप्ति करून घेतली—सिद्धावस्था प्राप्त करून घेतली; त्यावेळेस निर्मल अशी अनंत ज्ञानादि विभूति आपण धारण केली.

भवदीयदेहदीप्तिप्रतानश्च प्रतिमुक्तिलक्ष्म्याः पुरस्तात् किं कृतवानित्याह।

भगवन्ताच्या शरीरकान्तीनें आर्हन्त्य अवस्थेंत कोणतें कृत्य केलें हें स्तुतिकार सांगतात.

शरीररश्मिप्रसरः प्रभोस्ते,
बालार्करश्मिच्छविरालिलेप।

**नरामराकीर्णसभां प्रभाव-**

**च्छैलस्य पद्माभमणेः स्वसानुम् ॥ २८ ॥**

**शरीररश्मी**त्यादि । **आलिलेप** आलिप्तवान् । कोसौ ? **शरीररश्मि-प्रसरः** । शरीरस्य रश्मयो दीप्तयः तेषां प्रसरो विस्तारः । किंविशिष्टः ? **बालार्करश्मिच्छविः,** बालः प्रत्यग्रोदितः सचासावर्कश्चादित्यः तस्य रश्मयः किरणाः तस्य छविराकारः । बालार्करश्मिच्छविरिव छविर्यस्य स बालार्करश्मिच्छविः । सिंदूरारुणरश्मिप्रसर इत्यर्थः । कस्य ? **ते** तव । कथम्भूतस्य ? **प्रभोः** इन्द्रादिस्वामिनः । कामालिलेप ? **नरामराकीर्णसभां** नराश्च मनुष्याश्च अमराश्च देवास्तैराकीर्णा संकीर्णा निचिता सा चासौ सभा च परिषत् तां । का इव कमित्याह **प्रभावदि**त्यादि प्रभा इव प्रभा-वत् । **प्रभावा** इति च क्वचित्पाठः । तत्र वा- शब्द इवार्थे द्रष्टव्यः । कस्य ? **शैलस्य** पर्वतस्य । कथम्भूतस्य ? **पद्माभमणेः** पद्मरागमणेः सम्ब-न्धिनः **स्वसानुं** स्वकटनीं । अयमर्थो, यथा पद्माभमणेः शैलस्य प्रभा स्वसानुमालिलेप, तथा ते शरीररश्मिप्रसरस्तत्सभां इति ।

**मराठी अर्थः—जसें पद्मरागमण्याच्या पर्वताची कान्ति त्याच्या शिखरास व्यापून टाकिते तसें हे देवाधिदेवा ! प्रातः-काळीं उदय पावलेल्या सूर्याच्या कोवळ्या तांबूस रंगाच्या कि-रणाप्रमाणें सुंदर दिसणाऱ्या आपल्या शरीराच्या किरण समू-हानें मनुष्यें व देव यांनीं भरलेली सभा व्यापून टाकली.**

स इत्थम्भूतो भगवान्किमेकत्र स्थाने उपविश्य स्थितः किंवा विहृतवानित्यत्राह।

भगवन्तांनीं एकेठिकाणीं राहून भव्यांना उपदेश दिला अथवा सर्व आर्यखंडांत विहारकरून उपदेश दिला या प्रश्नाचें उत्तर आचार्य देतात.

**नभस्तलं पल्लवयन्निव त्वं,**

**सहस्रपत्राम्बुजगर्भचारैः ।**

पादाम्बुजैः पातितमारदर्पो,

भूमौ प्रजानां विजहर्ष भूत्यै ॥ २९ ॥

**नभस्तल**मित्यादि । त्वं **विजहर्ष** विहृतवान् । **भूमौ** भूतले । किमर्थम्? **भूत्यै** विभूतिनिमित्तं । कासां? **प्रजानां** । भगवतो हि विहृतः साक्षात्प्रजानां हेयोपादेयपदार्थविवेकविभूतिर्भवति, परम्परया तु पुण्यावाप्तिप्रभावात्स्वर्गादिविभूतिरपीति । ननु गौर्यादिना प्रेरित ईश्वर इवासौ किं रागाल्लोभादेर्वा भूमौ विजहर्ष? इत्यत्राह—**पातितमारदर्पः** । पातितो विपातितो निर्मूलितो मारस्य कामस्य दर्पो येन । वीतरागः सन्विजहर्ष इत्यर्थः । किं कुर्वन्निव? **पल्लवयन्निव** । इव उत्प्रेक्षणे पल्लववत् किसलयवत् कुर्वन्निव । तत्करोतीत्यादिनाणौ कृते विन्मतोर्लुबिति मतोरुप् । किं? **नभस्तल**माकाशोपरिभागं । कैः? **पादाम्बुजैः**, पादावेवाम्बुजानि सकललक्ष्मीनिवासत्वात्, तैः । किंविशिष्टैः? **सहस्रपत्राम्बुजगर्भचारैः** । हेमनिर्मितानि यानि सहस्रपत्राणि अम्बुजानि कमलानि तेषां गर्भेषु चारः प्रवर्त्तनं येषाम् ।

मराठी अर्थ—देवाधिदेवा, आपण मदनाचा गर्व समूळ नाहींसा केला व धर्मोपदेश करीत करीत विहार केला . व देवांनी रचलेल्या सोन्याच्या कमलपंक्तींतून कमलाप्रमाणें कोमल व तांबड्या , स्निग्ध अशा पायांनीं आपण चालत असतांना आकाशभागाला जणु काय कोमल चैत्री पालवी फुटली आहे असें केलें.

भावार्थ—या श्लोकांत भगवंतांनीं भव्य जीवांना धर्मोपदेश करीत करीत आर्य खंडामध्यें विहार केला. हें सांगितलें आहे. भगवंताच्या उपदेशापासून भव्यांना दोन फायदे झाले. एक फायदा हा कीं त्यांच्या उपदेशापासून हेय पदार्थ कोणते, ग्राह्य पदार्थ कोणते याचें परिज्ञान त्यांना उत्तम झालें.

हा साक्षात् फायदा झाला. व परम्परेनें त्यांच्या उपदेशानें पुण्याची प्राप्ति भव्यांना झाली. त्यायोगें ते स्वर्गादि ऐश्वर्यास पात्र झाले 'पातितमारदर्पो' हा शब्द या श्लोकांत ठेविला आहे. त्याचा अर्थही व्यक्त केला आहे. येथें विशेष सांगावयाचें तें हें कीं, महादेवानें कपाळावर असलेल्या आपल्या तिसऱ्या डोळ्यानें मदनास भस्म केले असे ह्मणतात. परंतु हे बिलकुल खोटें आहे. असें असतें तर तो श्री जिनेश्वरासारखा परम वीतरागी बनला असता. परंतु त्याच्या चरित्राचा आपण विचार केला तर तें अतिनिंद्य आहे. असेच आपणास आढळून येईल. तो ऋषीपत्नीशीं आसक्त झाला यामुळ त्याचे ऋषींनी लिंगच्छेदन केलें. त्याने पार्वतीला आपल्या अर्ध्या अंगामध्यें खिळून टाकिले होतें. तेव्हां अशा या फकडापासून मदनाचा पराजय होणें असंभवनीय आहे. यास्तव 'पातितमारदर्पो' हें विशेषण श्री जिनेश्वरासच शोभतें. व त्यानें पार्वतीबरोबर पुष्कळ विहार केला तो तिच्यांत अत्यंत विषयासक्त होऊन केला. व श्री जिनेश्वरांनीं भूमण्डलावर लोककल्याणासाठी आकाश मार्गाने अधर विहार केला. यावरून दोघांच्या विहारामध्ये किती अंतर आहे हें दिसून येतें. यावरून अशा कुदेवाचें भजनीं लागून आपले सम्यक्त्वरत्न गमाऊं नये हे या श्लोकावरून व्यक्त होते.

स्तोता आत्मन औद्धत्य परिहरन्नाह ।

स्तुतिकार आपली उद्धतता सोडून नम्रता दाखवितात.

गुणाम्बुधेर्विप्रुषमप्यजस्रं,

नाखण्डलः स्तोतुमलं तवर्षेः ।

प्रागेव माहक्किमुतातिभक्ति-
मां बालमालापयतीदमित्थम् ॥ ३० ॥

**गुणाम्बुधे**रित्यादि । गुणसमुद्रस्य तव पद्मप्रभाख्यस्य तीर्थकरस्य। **ऋषेः** सकलर्द्धिनिधानस्य । **विप्रुषमपि**, गुणलवमपि, न केवलं सकलगुणस्वरूपं । **अजस्र**मनवरतं । **अजस्ये**ति च क्वचित्पाठः । तत्र न जायते नोत्पद्यते संसारसमुद्रे न परिभ्रमति इत्यजस्तस्य । **आखण्डल** इंद्रोऽचिन्त्यशक्तिरवध्यादिविशिष्टज्ञानसंपन्नोऽपि । **स्तोतुमलं** समर्थो **न** । प्रागेव **मादृक्** मद्विधोऽसमर्थः । किमर्थं तर्हि तत्स्तोत्रं कर्तुं प्रवृत्तोऽसीत्याह किमुतेत्यादि । **किमुत** किंतु भगवद्विषये या **अतिभक्तिः** अत्यनुरागः सा । **मां बालं** भगवत्स्तुतिकरणेनभिज्ञं । **आलापयति** आभाषयति । **इद**मेतत्संस्तवनं । **इत्थ**मुक्तप्रकारेण । मां स्तुतिं कर्तुं प्रयोजयति इत्यर्थः ।

मराठी अर्थः— हे जिनेश ! आपण गुणसमुद्र आहात. नाना तऱ्हेच्या ऋद्धींनीं संपन्न आहात. अचिंत्य शक्तिशाली, अवधिज्ञान व श्रुतज्ञानाला धारण करणारा इंद्र देखील आपल्या अनंत गुणांपैकीं एका गुणाचें देखील वर्णन करण्यास समर्थ नाहीं. असें जर आहे तर तुच्छबुद्धि ज्याची आहे असा मी आपल्या गुणांचें वर्णन करण्यास कसा बरें समर्थ होईन ? तथापि आपल्यावर असलेलें माझें अनिवार प्रेम-अत्यंत भक्ति मला आपलें स्तोत्र गाण्यास बाध्य करीत आहे. मी आपली स्तुति भक्तिवश होऊन केली आहे. वास्तविक आपल्या एकाही गुणांचें वर्णन करण्याची मजमध्यें पात्रता नाहीं.

श्री पद्मप्रभ तीर्थकराचें स्तोत्र संपलें.



अथ सुपार्श्वजिनस्तुति .

सुपार्श्व भगवंतांनीं भव्य जनांना काय उपदेश केला हें स्तुतिकार सांगतात.

'उपजाति छन्द'

स्वास्थ्यं यदात्यन्तिकमेष पुंसां,
स्वार्थो न भोगः परिभंगुरात्मा।
तृषोऽनुषङ्गान्न च तापशान्ति-
रितीदमाख्यद्भगवान्सुपार्श्वः॥ ३१ ॥

स्वास्थ्यमित्यादि। स्वस्मिन् कर्मविमुक्ते आत्मस्वरूपे तिष्ठति इति स्वस्थमनन्तज्ञानादि। तस्य भाव स्वास्थ्य। कथम्भूत? यत आत्यन्तिकं अविनश्वरं। एष पुंसां स्वार्थः स्वस्याथ साध्य प्रयोजन। वैषयिकसुखानामनुभव कुतो न स्वर्थ इत्यत्राह–न भोग इत्यादि। एष प्रतीयमानो वैषयिकसुखानुभवरूपः भोगो न स्वार्थ पुंसां। कुत? परिभङ्गुरात्मा। यत शाश्वतस्वरूपमिद्धयर्थो हि प्रेक्षावता प्रयासो, नच भग शश्वत्‌स्वभावो, विषयसंनिधाने विद्युन्मेषमात्रभावित्वात्तस्य। अथ विषयोपभोगे प्रशान्तिहेतुत्वात्स्वार्थो भविष्यति इत्याह–तृषोनुषङ्गादि त्यादि। तृषः उत्तरोत्तर भोगकांक्षया अनुषङ्गात् अनुबन्धात्। नच नैव तापशान्तिः तापस्य शारीरमानसदुःखस्य शान्तिरुपशम इत्येव। इदमात्मीत्य वैषयिकसुखादीनां स्वरूपमाख्यदब्रवीत्। भगवान्विशिष्टज्ञानवान् इन्द्रादीनां पूज्यो वा सुपार्श्वः सप्तमतीर्थकर शोभनौ सर्वलक्षणोपेतौ पार्श्वौ शरीरोभयप्रदेशौ यस्य। पार्श्वावित्युपलक्षण सकलाङ्गवयवानाम्।

**मराठी अर्थः**– मनुष्यांना केव्हांही नाश न पावणाऱ्या ज्ञानादिक गुणांची प्राप्ति करून घेणें हें आवश्यक आहे. अनंत ज्ञानादिक गुणांची प्राप्ति झाली म्हणजे त्यांचा स्वार्थ पूर्ण झाला.

ज्ञानादिक गुणांच्या पूर्णतेलाच स्वास्थ्य ह्मणतात. या स्वास्थ्याची प्राप्ति आत्मा सर्व कर्मापासून विमुक्त झाला=सुटला ह्मणजे होतें. अशा स्वास्थ्याची प्राप्ति करून घेणें हें आत्म्याचें ध्येय आहे. हाच त्याचा स्वार्थ आहे. ज्ञानादिक हे आत्म्याचें गुण असल्यामुळें अविनाशी आहेत. व अविनाशी पदार्थांची प्राप्ति करून घेणें हाच स्वार्थ आहे. वैषयिक सुखादिकांचा जो अनुभव येतो तो स्वार्थ नव्हे. कारण, तो अनुभव चिरकाल टिकणारा नाहीं. बुद्धिमान मनुष्याचें सर्व प्रयत्न नित्य, टिकून राहणाऱ्या आत्मस्वरूपाच्या प्राप्त्यर्थच होत असतात. परंतु विषयानुभव तसा नाहीं तो वीज चमकून जशी नाहींशी होते तद्वत् नाहींसा होतो. हा विषयानुभव चंचल असूनही यापासून शांति मिळते ह्मणून याला स्वार्थ ह्मणणें अयोग्य आहे. कारण यापासून उत्तरोत्तर अभिलाषा वाढत गेल्यामुळें शारीरिक व मानसिक दुःखें शांत होत नाहींत.

याप्रमाणें सुपार्श्व तीर्थकरांनीं भव्यांना उपदेश केला सुपार्श्व ह्मणजे 'सुंदर आहेत शरीराच्या दोन बाजू ज्याच्या असा' एवढाच अर्थ घ्यावयाचे नाहीं. सुपार्श्व शब्द उपलक्षण समजून ज्यांच्या शरीराचे सर्व अवयव सुंदर आहेत' असा अर्थ घेतला पाहिजे. कारण, तीर्थकराच्या शरीराचे विशिष्ट भागच सुंदर असतात असें नाहीं. तीर्थकर सर्वांगसुंदर असतात यास्तव सातव्या तीर्थकरांना सुपार्श्व हें नांव सार्थक होतें.

न केवलं तत्सुखादीनां स्वरूपं कथितवानपितु शरीरस्य चेत्याह ।

भगवंतानीं केवल इंद्रियजन्य सुखाचेंच स्वरूप दाखऊन दिलें असें नाहीं, त्यांनीं शरीराचे स्वभाव देखील वर्णिले आहेत हें दाखवितात.

अजंगमं जंगमनेययंत्रं,

यथा तथा जीवधृतं शरीरम् ।
बीभत्सु पूति क्षयि तापकं च,
स्नेहो वृथात्रेति हितं त्वमाख्यः ॥३२॥

**अजंगममित्यादि । अजंगमं,** बुद्धिपूर्वकपरिस्पंदव्यापाररहितं । **जंगममेययंत्रं,** जंगममेयं च तद्यंत्रं च क्रीडार्थरचितं हस्त्यादिरूपं तदजंगमं **यथा** जंगमेन तन्मध्यस्थितपुरुषेण नेयं कार्येषु प्रवर्तनीयं । **तथा**जंगमं **शरीरं जीवधृतं** सकलकार्येषु 'गमनादिषु जीवायत्तप्रवृत्तिकं । **पूति,** दुर्गंधिसहितं । **क्षयि,** विनाशि । **तापकं च,** बहुदुःखकारि च । **अत्रा**स्मिन्नेवंविधे शरीरे । **स्नेहो**नुरागो **वृथा,** निष्फलः । मोक्षे तत्कारणे चानुरागः कर्तव्य इत्यर्थः । **इति,** एव । हितं त्वमाख्यः हितस्य मोक्षस्वरूपस्य तत्कारणस्य च वैराग्यादेः एतच्छिक्षारूपं वचः हितं त्वं सुपार्श्वो भगवानाख्य उपदिष्टवान् ।

मराठी अर्थः—अचेतन हत्ती, घोडा, मोर वगैरे पदार्थांपासून जाणें येणें वगैरे क्रिया होत नाहींत. कारण, या क्रिया करण्यासाठीं बुद्धिची जरूरत लागते. परंतु हे अचेतन पदार्थ बुद्धिपूर्वक क्रिया करीत नाहींत. ते जड आहेत. यास्तव त्यांच्याकडून जाणें येणें इत्यादि क्रिया करविण्याकरितां जशी पुरुषाची जरूरी लागते, त्याचप्रमाणे शरीर देखील अचेतन आहे. जीवानें हें शरीर धारण केलें आहे. हें शरीर जाणें बोलणें, जेवणे, हसणें, निजणें इत्यादि क्रिया जीवाच्या स्वाधीन होऊन करतें. ज्यावेळेस या शरीराला आत्मा सोडून देतो त्यावेळेस वर सांगितलेली एकही क्रिया या देहाकडून केली जात नाहीं. ह्मणून हा देह अचेतन आहे यांत संशय नाहीं. हा देह अचेतन आहे एवढेंच नव्हें तर हा कुरूप देखील आहे. कांहीं कालपर्यंत देह सुंदर दिसला तरी वृद्धावस्थेंत

हा कुरूप अवश्य होतो—त्याचें सौंदर्य नष्ट होतें हा देह घाणे-
रडा आहे, नाशवंत आहे व यापासून शारीरिक मानसिक व
वाचनिक दुःखें उत्पन्न होतात. अशा तुच्छ देहावर प्रेम क-
रणें व्यर्थ आहे. प्रेम हें मोक्षाविषयीं केलें पाहिजे व त्याचा
जीं कारणें तद्विषयक प्रेम दाखविलें पाहिजे व यायोगें सर्व
भव्यांस मोक्ष सौख्याची प्राप्ति होतें व त्या सौख्याचें कारण
जे वैराग्य त्याची प्राप्ति होते. याप्रमाणें भगवान् सुपार्श्व तीर्थ-
करांनीं सर्व भव्यांना हितकर उपदेश दिला.

यदि भगवान् हितमुपदिष्टवांस्तदा भवदीय वचः श्रुत्वा किमिति मनो-
जन. शरीरादिषु विरज्य हिते मार्गे न प्रवर्तते इत्याह ।

जर भगवंतांनी हिताचा उपदेश केला आहे तर त्याचा उपदेश
ऐकून सर्व लोक शरीरादिकापासून विरक्त होऊन कल्याण
मार्गात का प्रवृत्त होत नाहीत? या प्रश्नाचे उत्तर
आचार्य देतात.

अलंघ्यशक्तिर्भवितव्यतेयं,
हेतुद्वयाविष्कृतकार्यलिंगा ।
अनीश्वरोजंतुरहं क्रियार्त्तः
संहत्य कार्येष्विति साध्ववादीः ॥३३॥

अलंघ्यशक्तिरित्यादि । अलंघ्या अनतिक्रमणीया शक्तिः सामर्थ्यं
यस्याः सा अलंघ्यशक्तिः । कासौ ? भवितव्यता दैवं कर्म इत्यर्थः ।
कुतः सा तथाविधा प्रतिपन्ना, प्रत्यक्षादनुमानाद्वा ? न तावत्प्रत्यक्षतः अती-
न्द्रियतया तस्य अस्मदादिप्रत्यक्षागोचरत्वात् । अनुमानादसौ प्रतिपन्ना,
किमत्र लिंगमिति ? अत्राह—हेतुद्वयाविष्कृतकार्यलिंगा । हेत्वोः
शुभेतरकर्मलक्षणयोर्बाह्याभ्यंतरस्वरूपयोर्वा द्वयं तेनाविष्कृतं जनितं
यत्कार्यं इष्टानिष्टार्थलाभलक्षणं तल्लिंगमस्याः । ननु मन्त्रतन्त्रादिदृष्ट-

सामग्रीसव्यपेक्षो जीव एव सुखदुःखादिकार्यकर्ता भविष्यति । तत्कथं कार्यलिंगाद्भवितव्यता अनुमीयते? इत्याशंक्याह —अनीश्वर इत्यादि । न ईश्वरोऽनीश्वरोऽप्रभुरसमर्थः । कोसौ? जन्तुः प्राणी । कथंभूतो? अहं-क्रियार्तः अहंक्रियाभिः अहंकारैर्व्यामोहरूपैरार्तः पीडितः । संसारी जीवो भवितव्यतानिरपेक्षोऽसमर्थ इत्यर्थः । क्व? कार्येषु सुखादिषु । कथं? संहत्य सुखादिकार्येतादृश्येऽपि मंत्रतंत्रादिसहकारिकारणेषु मिलित्वा । यदि हि भवितव्यतानपेक्षस्तत्सहितस्तामात्रेणात्मा तत्र समर्थः स्यात् तदा सर्वेषां तत्सहितानां समानं फलं स्यात् । न चैवमस्ति । समानोपदेशानां समानमंत्रतंत्राद्यनुष्ठायिनां समानानां च कामानाम्पे केषांचित्तत्सफलं दृश्यते, केषांचित्तु निष्फलं । अतो येषामदृष्टं प्रांजलं तेषां तत्सफलं, अन्येषां तु निष्फलमिति सिद्धा तत्कार्यलिंगा भवितव्यता । अत एवोक्तं इयमिति । इयं सकललोकप्रसिद्धा कार्यलिंगतया भवितव्यता ॥

अथवा अलंघ्यशक्तिर्भवितव्यतैवेत्युक्तं, संसारमोक्षादिकार्याणामीश्वरकृतत्वादित्याशंक्याह —अहंक्रियार्तः संसारी जन्तुः । अनीश्वरो न विद्यते ईश्वरः कारणमस्येत्यनीश्वरः । क्व? संहत्य कार्येषु संहत्यानि संघातरूपाणि ( बहूनीत्यर्थः ) यानि कार्याणि तेषु । अयमर्थः ईश्वरस्य एकस्वभावस्य आप्तस्य च भिन्नभिन्नदेशकालाकारनरकादिकार्यकर्तृत्वमयुक्तं, एकस्वभावाभावानुषङ्गात् निर्घृणत्वप्रसंगाच्च । तददृष्टवशात्तथा कर्तृत्वे सिद्धे, ईश्वरस्यापि भवितव्यतावशात्प्रवृत्तिस्तस्मान्नासौ प्राणिनां दुःखादिकार्येषु कारणं, किन्तु भवितव्यतैव तत्कारणं । इत्येवं साधु यथा भवति तथा-वादीरुक्तवान् । ततः सिद्धं भवितव्यताया अलंघ्यशक्तित्वम् ।

**मराठी अर्थः—दैव हें अलंघ्यशक्तियुक्त आहे. या दैवालाच भवितव्यता, कर्म, भाग्य अशीं नांवें आहेत. पण हें दैव सामर्थ्यशाली आहे हें ओळखण्यास मार्ग काय अशी शंका साहजिक मनामध्यें उभी राहते. कारण, प्रत्यक्षप्रमाणानें दैव**

सामर्थ्ययुक्त आहे असें ह्मणावें तर तें योग्य दिसत नाहीं. प्रत्यक्षानें इंद्रियगोचर पदार्थांचें ज्ञान होतें. परंतु दैव हें अतीन्द्रिय असल्यामुळें त्याचें प्रत्यक्षानें ज्ञान होत नाहीं. आतां अनुमानानें दैवाचें स्वरूप समजून येतें काय याचा विचार करूं.

अनुमान ह्मणजे अविनाभाव संबंध आहे अशा पदार्थांपैकीं एका पदार्थाचें प्रत्यक्षज्ञान झाल्यानें दुसरा पदार्थ अप्रत्यक्ष असला तरी त्याचें काल्पनिक स्वरूप आपल्या लक्षांत येतें. व कदाचित् एखाद्या मनुष्यास तद्विषयक संशय उत्पन्न झाल्यास तो अप्रत्यक्ष पदार्थ जेथें आहे तेथें जाऊन त्याला त्या पदार्थाचें ज्ञान करून घेतां येतें. तेव्हां अशा तऱ्हेचें जें ज्ञान त्यास अनुमान ज्ञान ह्मणतात. जसें पर्वतावर आपण धूर पाहिला ह्मणजे तेथें अग्नि आहे असें जें ज्ञान होतें तें अनुमान आहे. अथवा नदीला पूर आलेला आहे हें आपण पाहिल्यावर नदीच्या वरच्या प्रदेशावर पाऊस पडला आहे असें चटकन् लक्षांत येतें. जरी वरच्या प्रदेशावर पाऊस पडलेला आपण पाहिला नाहीं तथापि पावसाचा व नदीच्या पूराचा अविनाभाव संबंध आहे हें लक्ष्यांत येतें व पूर पाहिला ह्मणजे पाऊस पडल्याची कल्पना होते. यासच अनुमान ज्ञान ह्मणतात. येथें दैव आहे याचा निश्चय आपणास अनुमानानें करून घेतला पाहिजे. तसेंच आपल्याला जें चांगलें पदार्थ एखाद्यावेळेस मिळतात व एखाद्या वेळेस त्या पदार्थांचा वियोग होतो ह्या गोष्टी नित्य आपणास प्रत्यक्ष अनुभवास येतात. या गोष्टीवरूनच दैवाचा निश्चय होतो. शुभाशुभ दैवानें आपणास इष्ट पदार्थ मिळतात किंवा अनिष्ट पदार्थांचा संयोग व वियोग होतो हें दैवाचें कार्य आहे. हें कार्य पाहून दै-

याची कल्पना आपल्या मनांत येते कार्य पाहून कारणाची कल्पना करणें हा अनुमानाचा विषय आहे. येथें शुभाशुभ कर्म हें अभ्यंतर कारण आहे व द्रव्य, क्षेत्र, काल व भाव हीं बाह्य कारणें आहेत. या दोन कारणापासून हानि किंवा लाभ हीं कार्यें उत्पन्न होतात. या कार्यापासून दैवाचें=भवितव्यतेचे ज्ञान होतें. ह्मणून भवितव्यता शक्तिशाली आहे हें सिद्ध झालें.

परंतु मंत्र तंत्र इत्यादि प्रत्यक्ष सामग्री जुळऊनच मनुष्य स्वतःला सुखाची प्राप्ति करून घेतो किंवा या सामग्रीपासून तो दुसऱ्याला दुःख उत्पन्न करतो; असें आपण प्रत्यक्ष पाहतो. असें असतां दैवापासूनच सुखदुःखाची प्राप्ति होते असें ह्मणणें योग्य नाहीं; अशीही शंका मनांत येते. यावरून दैव लाच कां प्रबल मानावें ? आह्मी तर प्रयत्नालाच प्रबल मानणार ? असें ह्मणणेंही योग्य दिसत नाहीं. कारण, संसारी जीव सगळे असमर्थ आहेत. ते सदा अहंकार व अज्ञानानें पीडित झाले आहेत. ह्मणून भवितव्यतच्या अभावीं केवळ मंत्रतंत्रादिकांच्या साहयाने त्यांना सुखदुःखाची प्राप्ति होत नाही.

जर भवितव्यतेच्या अभावी देखील मन्त्रतन्त्रादिक प्रत्यक्ष दिसणाऱ्या सामग्रीनेंच सुख दुःखादिक उत्पन्न करण्यास आत्मा समर्थ होतो असें ह्मणाल तर जितक्या प्राण्यांनी ही सामग्री जुळविली असेल त्यांना समानच फल मिळालें असतें. सुखदुःखादिक फलामध्यें जी तरतमता दिसून येते ती दिसून आली नसती. परन्तु फरक दिसून येतो.

ज्यांना समान उपदेश मिळाला आहे, मन्त्रतन्त्रादिक क्रिया देखील बिलकुल समान ज्यांच्या आहेत, आहार व रा-

ह्मणें हें देखील ज्याचें समानच आहे असा देखील. कित्येक मनुष्यांचे प्रयत्न सफल होतात व कित्येकांचे निष्फल होतात. यावरून दैव हेंच प्रबल आहे असें सिद्ध होतें. व याच्या योगानेंच सुखदुःखादि तज्जन्य फलामध्यें फरक दृष्टीस पडतो.

दैवाच्या योगे सुखदुःखाची प्राप्ति होतें हें ह्मणणें खोटें आहे. सुख किंवा दुःख हें ईश्वर देत असतो. मनुष्य असमर्थ आहे त्यामुळें तो सुखदुःखाचा कर्ता होऊ शकत नाहीं. संसारात ठेवणें किंवा प्राण्यांना मोक्षाची प्राप्ति करून देणें हें ईश्वराच्या स्वाधीन आहे. जगांतील सर्व घडामोड शक्तिशाली ईश्वरावांचून दुसऱ्या कोणास करतां यईल काय? ईश्वरच समर्थ आहे, दैव समर्थ नाहीं. हें ह्मणणेंही उचित नाहीं. संसारांतील जी काय दिसून येतात तीं सर्व ईश्वरनिमित्तकच आहेत हें सिद्ध होत नाहीं. त्याचप्रमाणें सुखदुःखाची प्राप्ति करून देणें हेंही ईश्वराच्या हातीं नाहीं. तसच ईश्वराचा स्वभाव एक मानला आहे. यास्तव भिन्न देशामध्यें, भिन्नकालामध्यें भिन्नकारण सामग्रीनीं उत्पन्न होणारीं कार्यें एकस्वभावी ईश्वराच्या हातून कशीं होतील? एका वळेस भिन्न देशामध्यें अनेक कार्यें उत्पन्न होणार नाहींत. भिन्न भिन्न कालांत अनेक कार्यें उत्पन्न होतात; तीं ईश्वराचा एकच स्वभाव मानल्यास कशी उत्पन्न होतील. यासाठीं ईश्वराचे ठिकाणीं अनेक स्वभाव मानावे लागतील. त्याचप्रमाणें कित्येक प्राण्यांस नरकामध्यें तो लोटतो. कित्येक प्राण्यास दरिद्री करतो. कित्येक प्राण्यांना अनिष्ट पदार्थांची प्राप्ति करून देतो. असें मानल्यास तो निर्दयी आहे असें मानावे लागेल.

कदाचित् प्रत्येक प्राण्याचें जसें अदृष्ट असेल त्यास अनुसरून ईश्वर त्यास सुख किंवा दुःख देतो, यामुळें तो निर्दयी नाहीं,

तो परमदयाळूच आहे, व त्याच्या जगत्कर्तृत्वाची देखील सिद्धि होते हें ह्मणणेंही योग्य नाहीं. ज्याअर्थी प्रत्येक प्राण्याचें अदृष्ट तुह्मी मानीत आहांत त्याअर्थी त्या अदृष्टानेंच सुख-दुःखादिक कार्यें उत्पन्न होतात असें कां मानीत नाहींत? यावरून असें सिद्ध झालें कीं, प्राण्यांना सुखदुःखादिक उत्पन्न करण्यांत ईश्वर कारण नाहीं; अदृष्टच—दैवच प्राण्यांना सुख व दुःख देतें. व तें सुख दुःख उत्पन्न करण्यामध्यें द्रव्य, क्षेत्र, काल, भाव या चार कारणांची अपेक्षा त्याला असते. ही भवितव्यता प्रतिकूल असली ह्मणजे हिताचा उपदेश ऐकून देखील शरीरादिकापासून जीवांना वैराग्य उत्पन्न होत नाहीं. हें सुपार्श्व तीर्थंकरांनीं उत्तम रीतीनें सांगितलें. यास्तव भवितव्यता किती प्रबल असते हें सिद्ध झालें.

एतदेव दर्शयन्नाह ।

पुनः भवितव्यतेचें सामर्थ्य वर्णिनात.

बिभेति मृत्योर्न ततोस्ति मोक्षो,
नित्यं शिवं वांछति नास्य लाभः ।
तथापि बालो भयकामवश्यो,
वृथा स्वयं तप्यत इत्यवादीः ॥३४॥

निभेतीत्यादि बिभेति त्रस्यति जन्तुः । कस्मात्? मृत्योः । नच ततो बिभ्यतोऽप्यसौ भवितव्यतासामर्थ्यादुद्भ्रियत इत्याह—नेत्यादि । ततो मृत्योर्मोक्षो मुक्तिर्न जन्तोरस्ति, विद्यते । तथा नित्यं सर्वदा । शिवं सुखं निर्वाणं वांछति जन्तुः । भवितव्यतायां तु प्रतिकूलायां नास्य शिवस्य लाभः प्राप्तिः । तथापि तत्प्रतिकूलताया तदलाभेपि बालो अज्ञो जंतुः । भयकामवश्यो भयं मरणादौ त्रासः, कामः सुखाद्यभिलाषस्तयोर्वश्य अधीनः । वृथा मुधा, स्व-

थमात्मना तप्यते, क्रियत इत्यवादीः अब्रवीत्त्वं । यो हि प्रेक्षापूर्वकारी स प्रतिकूलतायां भवितव्यतायां नेष्टकार्यं सिध्यति इति ज्ञात्वा तदनुकूलतासिद्ध्यर्थमेव यतते । तत्सिद्धौ च सर्व्वमिष्टं कार्यं सिध्यतीति ।

**मराठी अर्थः**-सर्व प्राण्यांना मरणापासून अतिशय भीति वाटते, पण त्याच्यापासून आपली कोणीही सुटका करून घेत नाहीं. याचें कारण हें आहे कीं, भवितव्यता प्रतिकूल असली ह्मणजे मृत्यु टाळावा ह्मणून केलेले सर्व प्रयत्न व्यर्थ जातात व तो प्राणी मृत्युमुखीं पडतो तसेंच हमेशा हा प्राणी सुखाची–मोक्षसुखाची इच्छा करीत असतो. तथापि भवितव्यतेचें साहाय्य त्याला नसल्यामुळें त्याला मोक्षसुखाचा लाभ होत नाहीं. तथापि मरणादिक अनिष्ट अवस्था प्राप्त झाल्यानंतर हा प्राणी भीतीच्या स्वाधीन होतो, व इष्ट पदार्थांच्या सुखाची हमेशा इच्छा होते; यामुळें तो इच्छच्या स्वाधीन होतो. ह्मणूनच त्याचें सर्व प्रयत्न व्यर्थ जातात व त्यास क्लेश होतात.

तात्पर्य हें आहे कीं--जो बुद्धिमान मनुष्य आहे तो भवितव्यता दैव प्रतिकूल असलें ह्मणजे आपलें इच्छिलेलें कार्य तडीस जात नाहींत असें जाणून ती अनुकूल करण्यासाठीं प्रयत्न करीत असतो. व ती भवितव्यता सिद्ध झाली ह्मणजे त्याची सगळी कार्यें सिद्ध होतात.

ननु हेयोपादेये च तत्वे यथावत्परिज्ञाते उपदेशः प्रमाणतां प्रतिपद्यते,
न च भगवतस्तत्परिज्ञानं संभवतीत्याशंक्याह ।

हेयोपादेय तत्वांचा यथार्थ निर्णय झाला ह्मणजेच उपदेशाला प्रमाणत्व प्राप्त होतें. परंतु भगवंतांना हेयोपादेय तत्वांचें परिज्ञान नसल्यामुळें त्यांचा उपदेश खरा आहे हें कसें मानावें ? या शंकेचें उत्तर आचार्य देतात.

सर्वस्य तत्वस्य भवान्प्रमाता,
मातेव बालस्य हितानुशास्ता ।
गुणावलोकस्य जनस्य नेता,
मयापि भक्त्या परिणूयसेद्य ॥ ३५ ॥

**सर्वस्येत्यादि । सर्वस्य** हेयोपादेयस्य तत्कारणभूतस्य **च तत्वस्य भवान्** सुपार्श्वजिनः । **प्रमाता** प्रकर्षेण संशयादिव्यवच्छेदलक्षणेन माता परिच्छेदकः । स इत्थम्भूतो भगवान् **बालस्य** हेयोपादेयविवेकविकलस्य **हितानुशास्ता**, हितं निःश्रेयसं तत्कारणं च सम्यग्दर्शनादि तस्य अनुशास्ता उपदेशकः । क इव कस्य ? **मातेव, बालस्य ।** इव शब्दो यथार्थे । यथा वा बालस्य अपत्यस्य वा माता जननी हितमुपकारकमनुशास्ति तथा भगवानपि अज्ञस्य जनस्येति तत्वमुपादिशत् । भगवान्किं सर्वस्य सन्मार्गे प्रवर्तको भवति किंवा कस्यचिदेवेत्याशंक्याह-- **गुणावलोकस्ये**त्यादि । गुणान्मोक्षहेतुभूतान्सम्यग्दर्शनादीनवलोकते अन्वेषते इति गुणावलोको जनो भव्यजन इत्यर्थः । तस्य **नेता** सन्मार्गप्रवर्तकः । यत इत्थम्भूतो भगवांस्ततो **मयापि**, न केवलं गणधरदेवादिभिः किन्तु मयापि समन्तभद्रस्वामिनापि स्तावकेन परिप्राप्तसन्मार्गस्वरूपेण । **परि** समंतान्मनोवाक्कायैः **नूयसे** स्तूयसे । **अद्य** इदानीं पद्मप्रभतीर्थकरप्रणामानन्तरम् ॥

**मराठी अर्थः—हे भगवन् सुपार्श्वनाथ ! ग्राह्य तत्वें कोणतीं व त्याज्य तत्वें कोणतीं, तसेंच ग्राह्य तत्वांचा लाभ करून देणारीं कारणें कोणतीं व त्याज्य तत्वांचा त्याग कसा करावा हें दाखऊन देणारीं कारणें कोणतीं; यांचें ज्ञान आपणास पूर्ण झालें आहे. व तें आपलें ज्ञान संशय, विपरीतपणा, व अनध्यवसाय यापासून बिलकुल दूर राहिलें आहे. आपण ग्राह्य अग्राह्य ज्यांना समजत नाहीं अशा अज्ञानी जीवांना हिताचा**

कल्याणाचा उपदेश केला. आत्म्याचें कल्याण मोक्षाची प्राप्ति झाल्यानें होतें. मोक्षाची प्राप्ति सम्यग्दर्शन, ज्ञान व चारित्र या तीन कारणापासून होतें. हें आपण अज्ञ जीवांस समजाऊन सांगितलें. माता जशी आपल्या मुलाला हितकर उपदेश करते, तसाच हिताचा उपदेश आपण भव्य जीवांना केला. मोक्षप्राप्ति करून देणाऱ्या सम्यग्दर्शनादि गुणांचें अन्वेषण करणाऱ्या भव्य जीवांना आपण सन्मार्गांत प्रवृत्त केलें—त्यांना सन्मार्ग दाखऊन दिला. यास्तव हे गुणसागरा ! गणधरादिकच आपली स्तुति करतात असें नाहीं. ज्याला सन्मार्गाची प्राप्ति झालेली आहे असा मी देखील [ समन्तभद्र ] मनानें, वाणीनें व शरीरानें आपली स्तुति अतिशय भक्तीमध्यें लीन होऊन करतो.

तात्पर्य—गणधरदेवांनीं आपली स्तुति केली हें योग्यच आहे. कारण, त्यांना चार ज्ञानें असतात, यामुळें त्यांनीं आपल्या पुष्कळ गुणांचें वर्णन केलें असेल—स्तुति केली असेल. परंतु मी तर [ समन्तभद्रस्वामी ] अज्ञानी आहे. यास्तव मी आपली स्तुति भक्तिवश होऊन दोन चार वेड्यावांकड्या शब्दांनीं केली आहे. आपल्या अनंत गुणांचें वर्णन करण्यास मी समर्थ नाहीं. या श्लोकांत ग्रंथकारानें आपली लघुता प्रकट केली आहे.

याप्रमाणें सुपार्श्व जिनाचें हें सातवें स्तोत्र संपलें



चन्द्रप्रभतीर्थंकरांची स्तुति.

[ उपजाति छंद ]

**चन्द्रप्रभं चन्द्रमरीचिगौरं,**
**चन्द्रं द्वितीयं जगतीव कांतम् ।**
**वंदेऽभिवन्द्यं महतामृषीन्द्रं,**
**जिनं जितस्वान्तकषायबन्धम् ॥ ३६ ॥**

**चन्द्रप्रभ**मित्यादि । चन्द्रस्येव प्रभा यस्यासौ चन्द्रप्रभोऽष्टमस्तीर्थंकरः तस्येय सञ्ज्ञा । अन्वर्था चेयं संज्ञा । एतदेव **चन्द्रे**त्यादिना दर्शयति । चन्द्रस्य मरीचयः किरणास्तद्वद्गौरं शुक्ल तथाभूतं भगवन्तं । **जगति द्वितीयमिव चन्द्रं** । कथम्भूतं ? **कान्तं** सकलार्थेद्यातिकेवलज्ञानप्रभाभाराधारतया चन्द्रादतिशयेन कान्तं कमनीयं दीप्त । तमित्थम्भूत चन्द्रप्रभं भगवन्तं **वन्दे** । पुनरपि कथम्भूतं ? **अभिवन्द्यं** अभि समन्तात् वन्द्यं पूज्य, **महतां** महद्भिरिन्द्रादिभिरित्यर्थः । **ऋषीन्द्रं** ऋषीणां गणधरदेवादीनां इन्द्रं स्वामिनं । **जिनं** अशेषकर्मोन्मूलकं । जितेत्यादि । अत्र, त्रिधा पाठः—केचित्वाऽऽजितस्वान्तकषायबन्धं, इति पठन्ति । अस्यायमर्थः । स्व इत्यनेन चन्द्रप्रभस्वामी गृह्यते । तस्यांतो धर्मो न प्रकृत्यादेः । स चासौ कषायबन्धश्च । स जितो येन तथोक्तस्तं । केचित्तु **जितास्वन्तकषायबन्ध**मिति पठन्ति । अस्यायमर्थः । सुखेनान्तो विनाशः स्वन्तो, न विद्यते स्वन्तो यस्य कषायबन्धस्यासौ अस्वन्तः । जितोऽस्वन्तः कषायबन्धो येनासौ तथोक्तस्तं । अन्ये तु **जितस्वान्तकषायबन्ध**मिति पठन्ति । अस्यायमर्थः । स्वान्तं मनः प्रकृतिविकाररूपं तस्य कषायैः क्रोधादिभिर्बन्धो नात्मन इति सांख्यमतं । तदत्र निषिध्यते न स्वान्तकषायबन्धः । आत्मनस्तद्बन्ध इत्यर्थः । जितः स्वान्तकषायबन्धो येन स तथोक्तमिति ।

मराठी अर्थः-चन्द्राच्या किरणाप्रमाणें गौरवर्णाला धारण करणारे व पृथ्वीतलावर जणू काय दुसरा मनोहर चन्द्रच अवतरला आहे, असें (आकाशस्थ चन्द्र आपल्या किरणांनीं सर्व दिशा प्रसन्न करीत असतो व सुंदर असतो. ) चन्द्रप्रभ तीर्थकर देखील सर्व पदार्थांना प्रकाशक अशा केवलज्ञानरूपी किरणांनीं अतिशय मनोहर दिसतात. शतेंद्राकडून वंदनीय, गणधर देवादि मुनींचें स्वामी व ज्यांनीं आपल्या मनामध्यें उत्पन्न होणाऱ्या क्रोधादि दुर्जय कषायांला जिंकले आहे, सर्व कर्मांचा ज्यांनीं पराजय केला आहे, अशा चन्द्रप्रभ तीर्थकरांस मी नमस्कार करतो.

भावार्थः—या तीर्थकरांचें चन्द्रप्रभ हें नांव सार्थक होतें, कारण, त्यांच्या शरीराचा वर्ण शरत्कालांतील चंद्राच्या सुंदर किरणाप्रमाणें नयनमनोहर होता. तसेंच या श्लोकांत 'जितस्वान्तकषायबन्ध' हें पद आचार्यांनीं योजिलें आहे. याचा अर्थ वर दर्शविलेला आहे. क्रोधादिक कषाय मनामध्यें उत्पन्न होतात त्यायोगें कर्मबन्ध होतो. मन व आत्मा यामध्यें कांहीं फरक नाहीं. जेवढ्या आत्मप्रदेशामध्यें नोइंद्रियावरण कर्माचा क्षयोपशम झाला आहे त्या आत्मप्रदेशांना मन, अंतः-करण ही संज्ञा आहे. यावरून कषायांनीं मन बद्ध होतें याचा अर्थ कषायांनीं आत्मा बद्ध होतो असा केल्यास कांहीं हरकत नाहीं.

परंतु सांख्य मन व आत्मा हे भिन्न आहेत असें मानतात व मन प्रकृतीपासून उत्पन्न होतें. क्रोधादिक कषायापासून मनाला बंधन प्राप्त होतें, तें त्यांनीं बद्ध होतें. आत्मा क्रोधादि कषायांनीं बद्ध होत नाहीं. तो निर्लेप आहे. कर्मबंधनरहित आहे, प्रकृतिच बद्ध होत असते व तीच मुक्त होत असते ते, आत्मा

हमेशाच मुक्त आहे, असें त्यांचें ह्मणणें आहे, परंतु हें त्यांचें ह्मणणें अयोग्य आहे. कारण, आत्मा जर सर्वथा अबद्ध मानला तर बंध मोक्षाची जी प्रक्रिया आहे ती सर्व व्यर्थ होईल. बंधाचीं कारणें आपण दूर सारतो. मोक्षाच्या प्राप्तीचीं कारणें जवळ करतो. हें सर्व वेडेपणाचें होईल. बंध व मोक्ष याचा व्यवहार आत्म्यामध्येंच होतो. कोणी-ही कर्म बद्ध झालें व तेंच मुक्त झालें असें ह्मणत नाहीं. तसेंच कर्म तर अचेतन आहे. त्यामध्यें बंध व मोक्ष यांची प्रवृत्ति कशी होईल ? यावरून चेतन पदार्थच अशुद्ध अवस्थेंत जोपर्यंत आहे तोपर्यंत बंध आहे, जेव्हां त्यास शुद्ध अवस्था प्राप्त होते तेव्हां तो मुक्त होतो. जरी कर्मा-मध्यें बंध व मोक्ष यांचा व्यवहार झाला तथापि तो आ-त्म्याच्या बंध व मोक्षावर अवलंबून आहे. आत्मा बद्ध झाला ह्मणजे कर्म बद्ध झालें असें आपण ह्मणतो. तो मुक्त झाला ह्मणजे कर्म मुक्त झालें असें आपण ह्मणतो. यावरून कर्मावि-षयीं बंधमोक्षाचा व्यवहार मुख्य नाहीं असें सिद्ध होतें. या-स्तव प्रकृति बद्ध होते व ती मुक्त होतें हें ह्मणणें योग्य नाहीं, मन व आत्मा हे दोन पदार्थ नाहींत. सांख्यांनीं मन प्राकृति-क मानलें आहे. आत्म्यास त्यापासून भिन्न मानतात. मनच बद्ध होतें व तेंच मुक्त होतें असें मानलें तर आत्मतत्व मा-नण्याची जरूरतच राहिली नाहीं. याविषयीं विद्यान्दस्वामींनीं आपल्या स्तोत्रामध्यें असें ह्मटलें आहे.

मनो विपरिणामकं यदिह संसृतिं चाश्नुतं ।
तदेवच विमुच्यते पुरुषकल्पना स्याद् वृथा ॥
नचास्य मनसो विकार उपपद्यते सर्वथा ।
ध्रुवं तदिति हीष्यते द्वितयवादिता कोपिनी ॥ १ ॥

अर्थः–मन हें नानारूपें धारण करून संसारामध्यें नटतें, व तेंच संसाराचा नाश करून मुक्त होतें असें मानल्यास आत्मतत्वाची कल्पना व्यर्थ होईल. परंतु मनामध्यें कोणताच विकार उत्पन्न होत नाहीं. वास्तव संसार व मोक्ष यांची प्राप्ति होणार कशी ? विकार जो उत्पन्न होतो–नाना अवस्था ज्या उत्पन्न होतात त्या अनित्य पदार्थामध्यें उत्पन्न होत असतात. मनांस त्यांनीं नित्य मानल्यामुळें संसार व मोक्ष इत्यादिक कल्पना सिद्ध होत नाहींत. व मन नित्यही मानलें आणि अनित्यही मानलें तर तरकत कोणती असें ह्मणणेंही योग्य नाहीं. कारण, सर्वथा नित्यत्व व सर्वथा अनित्यत्व मानणें हें परस्पर विरोधी आहे. वास्तव मनास प्राकृतिक मानून त्यापासून आत्मा भिन्न आहे असें मानूं नये. प्राकृतिक मन आत्म्यापासून भिन्न मानणें योग्य आहे. प्रकृति किंवा कर्म हे एकार्थक शब्द आहेत. आत्मा व मन हे एकार्थक शब्द आहेत. द्रव्य मन हें पौद्गलिक प्राकृतिक आहे. व तें अचेतन आहे, तें बद्ध व मुक्त होत नाहीं याविषयीं निराळें सांगणें नको. इतक्या विवेचनावरून आत्मा बद्ध व मुक्त होतो हें सिद्ध होतें.

पुनरपि कथम्भूतं चन्द्रप्रभमित्याह ।

पुनः कोणत्या गुणांनीं विशिष्ट असलेल्या चन्द्रप्रभास नमस्कार केला हें आचार्य दाखवितात.

यस्याङ्गलक्ष्मीपरिवेषभिन्नं,
तमस्तमोरेरिव रश्मिभिन्नम् ।
ननाश बाह्यं बहु मानसं च,
ध्यानप्रदीपातिशयेन भिन्नम् ॥ ३७ ॥

यस्येत्यादि । यस्य चन्द्रप्रभतीर्थकरदेवस्य । अङ्गलक्ष्मीपरिवेष-

भिन्नं, अङ्ग देह तस्य लक्ष्मी परमकान्तिं तस्याः परिवेषो मण्डलं तेन भिन्न विदारित । ननाश नष्टं । किं तत् ? तमः । कैरित्याह तमोरिरि-त्यादि । तमसाऽन्धकारस्यारिरनमोरिरारित्यस्तस्य रश्मय किरणास्तैरिव भिन्न ध्वस्त । न केवलं बाह्यमेव ननाश, बहु मानसं च । मनसि चिदा त्मन्यात्मस्वरूपे भवं मानस तमोऽज्ञान । कथम्भूत ? बहु प्रचुरं अनेकप्रकार ज्ञानावरणीदयनिबन्धनम् । चकार समुच्चये । कथम्भूत सत्तन्ननाशे त्याह—ध्यानेत्यादि । ध्यानमेव प्रदीपोऽज्ञानतमोपहन्तृत्वात् तस्यातिशय परमप्रकर्ष तेन भिन्न विदारितम् ॥

मराठी अर्थः—ज्याप्रमाणें अंधकाराचा शत्रु जो सूर्य त्याच्या किरणांनीं दाट अशा अंधकाराचा नाश होतो. तद्वत् श्रीचंद्रप्रभतीर्थंकरांच्या दिव्यशरीरकांतीनें बाहेरील सर्व अंधकार नाहींसा केला. व शुक्लध्यानरूपी दिव्याच्या उत्कृष्ट प्रकाशानें अंतःकरणांत चित्स्वरूपी अशा आत्म्यामध्यें ज्ञानावरण कर्मांच्या उदयानें उत्पन्न झालेला पुष्कळ अज्ञानरूपी अंधकार नाहींसा केला.

भावार्थः—दृष्टिप्रतिबंधक असा अंधकार जसा सूर्य नाहींसा करतो त्याचप्रमाणें पुष्कळ उज्ज्वल रत्नें, नक्षत्रें हींही करतात. परन्तु जीवांच्या आत्म्यांतील अज्ञानरूपी अन्धकाराचा नाश करवत नाहीं, अज्ञानांधकाराचा नाश करण्यास केवल जिनेन्द्र भगवान् समर्थ आहेत. जसा दिवा स्वतः उज्ज्वल असतो तो बाह्य अन्धकार नाहींसा करून पदार्थांचें ज्ञान करून देतो. तद्वत् श्री जिनेन्द्र चद्रप्रभ तीर्थंकर हे स्वतः केवलज्ञान रूपी प्रकाशानें संपन्न होते. त्यांनीं भव्यांना धर्मोपदेश देऊन त्यांचें देखील अज्ञान दूर केलें. भगवानांनीं शरीरकान्तीनें अंधकाराचा नाश केला. व केवलज्ञानानें आध्यात्मिक अंधाराचा नाश केला. यावरून सूर्यापेक्षां यांच्यामध्यें ही विशेषता होती.

इत्थम्भूतस्य च भगवतो वचः श्रुत्वात्मपक्षाहंकारच्युताः परवादिन. संपन्ना इति दर्शयन्नाह ।

अज्ञानास दूर करणारी भगवंताची वाणी ऐकून स्वतःचा पक्ष उत्तम आहे असें समजणाऱ्या वादि जनांचा गर्व नाहींसा झाला हें आचार्य दाखवितात.

स्वपक्षसौस्थित्यमदावलिप्ता,
वाक्सिंहनादैर्विमदा बभूवुः ।
प्रवादिनो यस्य मदार्द्रगण्डा,
गजा यथा केशरिणो निनादैः ॥ ३८ ॥

**स्वपक्षेत्यादि** । स्वस्य पक्षो मतं तस्य सौस्थित्यं सुस्थितित्वं तस्मिन्मदोऽस्मदीयमेव मतं शोभनं बाधविधुरं यथा भवत्येवं स्थितं नान्यदिति दर्पः तेन **अवलिप्ताः** समन्विताः । के ते? **प्रवादिनः** प्रगतं प्रमाणानुपपन्नं वदन्तीत्येवंशीलाः प्रवादिनोऽन्यतीर्थाः । **बभूवुः** संजाताः । कथम्भूताः? **विमदा** विगतदर्पाः । कैः ? **वाक्सिंहनादैः** वाच एव सिंहनादाः परपराजयहेतुत्वात् अजय्यत्वाच्च । कस्य ? **यस्य** चन्द्रप्रमस्वामिनः । दृष्टान्तमाह— मदार्द्रेत्यादि । यथा **केशरिणः** सिंहस्य **निनादैः** शब्दैर्**गजा** हस्तिनो **मदार्द्रगण्डा** मदार्द्रकपोला विमदा बभूवुः तथा भगवद्वचोभिः परवादिन इति ।

**मराठी अर्थः**—गळत असलेल्या मदाच्या योगें ज्यांचें गंडस्थळ भिजून चिंब झाले आहे असें मत्त हत्ती सिंहाच्या गर्जनेनें जसें मदरहित होतात. त्यांची सगळी मस्ती पार नाहींशी होते. त्याचप्रमाणें आपलेंच मत उत्कृष्ट आहे, त्यामध्यें कोणतेही दोष नाहींत. त्याची रचना उत्तम झाली आहे असा अभिमान बाळगणारे व प्रमाणविरुद्ध वस्तूचें स्वरूप प्रतिपादन करणारें असें इतर वादी चन्द्रप्रमतीर्थकराच्या दिव्यध्वनि-

रूपी सिंहगर्जेनेनें पराजित झाले त्यांचा सर्व गर्व नष्ट झाला. चन्द्रप्रभ तीर्थंकराचा दिव्यध्वनि सर्व वाद्यांचा पराभव करणारा व अजिंक्य असा होता.

पुनरपि किंविशिष्टो यो भगवान्संपन्न इत्याह ।

भगवान पुनः कोणत्या गुणांनीं संपन्न होते या प्रश्नाचें उत्तर आचार्य या श्लोकांत देतात.

यः सर्वलोके परमेष्ठितायाः,
पदं बभूवाद्भुतकर्मतेजाः ।
अनन्तधामाक्षरविश्वचक्षुः,
समन्तदुःखक्षयशासनश्च ॥ ३९ ॥

यः **सर्वलोके**त्यादि । **यः** चन्द्रप्रभतीर्थंकरदेवः । **सर्वलोके** त्रिभुवने । **परमेष्ठितायाः** परमे पदे तिष्ठतीति परमेष्ठी परमात्मा तस्य भावः परमता तस्य **पदं** स्थानं **बभूव** संजातः । कथम्भूतः ? **अद्भुतकर्मतेजाः** अद्भुतं अचिन्त्यं कर्मणि सकलप्राणिगणप्रबोधनव्यापारे निमित्तभूतं तेजः केवलज्ञानस्वरूपः पदार्थप्रकाशो यस्य स तथोक्तः । पुनरपि कथम्भूत इत्याह— **अनन्ते**त्यादि । अनन्तं च तद्धाम च केवलज्ञानं तदेव अक्षरं अविनश्वरं शाश्वतं विश्वस्मिन् लोकालोके चक्षुर्यस्य । न केवलं प्रागुक्तविशेषणविशिष्ट एव भगवानपि तु समन्तदुःखक्षयशासनः समन्तदुःखक्षयं मोक्षरूपं मोक्षप्रदमित्यर्थः तत्तथाविधं शासनं मतं यस्य ॥

**मराठी अर्थ—**श्रीचन्द्रप्रभतीर्थकरांना त्रिलोकामध्यें उत्कृष्ट असें परमेष्ठि पद मिळालें होतें. अर्थात् त्यांना उत्कृष्ट अशी अर्हन्तावस्था प्राप्त झाली होती. व संपूर्ण प्राण्यांना मोह निद्रेपासून जागृत करणाऱ्या दिव्य तेजानें ते भगवान् चकाकत असत. श्रीजिनेश्वराचें ज्ञान अनन्त आहे व तें शाश्वतिक आहे,

अनन्तानन्त पदार्थांना प्रतिक्षणीं युगपत् जाणणारें असें ज्ञान चन्द्रप्रभतीर्थंकराचें आहे: व तें नित्य आहे त्याचा केव्हांही विनाश होत नाहीं, त्याचप्रमाणें श्रीचन्द्रप्रभ जिनाचें मत मोक्षाची प्राप्ति करून देणारें आहे. अशा दिव्य गुणांनीं ते भूषित झाले आहेत.

पुनरपि कथम्भूत इत्याह ।

पुनः श्री चन्द्रप्रभ जिनेश कोणत्या दिव्य गुणाला धारण करतात हें आचार्य या श्लोकांत सांगतात.

स चन्द्रमा भव्यकुमुद्वतीनां,
विपन्नदोषाभ्रकलङ्कलेपः ।
व्याकोशवाङ्न्यायमयूखमालः,
पूयात्पवित्रो भगवान्मनो मे ॥ ४० ॥

**स चन्द्रमा** इत्यादि । स प्रागुक्तविशेषणविशिष्टो भगवांश्चन्द्रमाः विकाशक. । कासां? **भव्यकुमुद्वतीनां** कुमुदानि आसां सन्ति कुमुदादिभ्यः ' कुमुदनडवेतसाड्डिदिति, मतो डित अतिदेशाद्दकारलोपः । भव्या एव कुमुद्वत्यो भव्यकुमुद्वत्यस्तासां । पुनः कथम्भूत इत्याह—**विपन्ने**त्यादि । अभ्राणिच कलङ्काश्च अभ्रकलङ्काः दोषा एव अभ्रकलङ्काः तैरुपलेपः आत्मस्वरूपप्रच्छादनं, विपन्नो विनष्टो दोषाभ्रकलङ्कलेपो यस्य । पुनरपि कथम्भूत इत्याह—**व्याकोशे**त्यादि । व्याकोशो विकसिताः सुव्यक्ताः वाचः तासां न्यायो नीतिः प्रणयनं, स एव मयूखानां किरणानां माला यस्य स तथोक्तः । स इत्थम्भूतो **भगवान् पूयात्** पवित्रीकरोतु कर्ममलविशुद्धं करोतु इत्यर्थः । किं तत्? **मनः** । कस्य? **मे** समन्तभद्रस्वामिनः । किंविशिष्टो भगवांश्चन्द्रप्रभस्तीर्थंकरदेवः **पवित्रः** कर्ममलविशुद्धः ॥

**मराठी अर्थः**—भव्यजनरूपी कमलांना विकसित कर-

जारा, अज्ञानादिक दोष व ज्ञानावरणादिक कर्म हेच मेघ किंवा कलंक यांनीं रहित असा निर्दोष व क्रमपूर्वक जीवादि तत्वांना प्रतिपादन करणाऱ्या दिव्यध्वनी रचना रूप किरणांनीं युक्त असा पवित्र चन्द्रप्रभ भगवानरूपी चंद्र, माझें मन अज्ञानांधकारानें रहित असें करो.

भावार्थः—चन्द्रप्रभ तीर्थंकर हे जगांत अपूर्व चन्द्र आहेत. चन्द्र कधीं कधीं ढगांनीं झांकून जातो. हा चन्द्र कर्मरूपी ढगापासून कायमचा मुक्त झाला आहे. आकाशस्थ चन्द्र कलंकी असतो हा अपूर्व चंद्र सदैव अज्ञानादि कलंकापासून मुक्त आहे. आकाशस्थ चंद्राचे किरण ढगांनीं आच्छादिल्यामुळें पृथ्वीवर स्पष्ट पडत नाहींत. या अपूर्व चंद्राचे दिव्यध्वनिरूपी किरण हमेशाच स्पष्ट असतात. आकाशस्थ चन्द्र कलंकी असल्यामुळें पवित्र नाहीं व हा अपूर्व चन्द्र सदा कर्ममलांनीं रहित झाला आहे. आकाशस्थ चंद्रानें केवळ बाह्य अंधकार नाहींसा केला, परंतु या अपूर्व चंद्रानें आत्म्यांत दडून बसलेल्या अज्ञानांधकारास दूर केलें आहे. यामुळें आकाशस्थ चंद्रापेक्षां हा चंद्रप्रभ तीर्थंकररूपी चंद्र सर्वोत्कृष्ट आहे याची बरोबरी तो तुच्छ चंद्र काय करूं शकणार, अशा तऱ्हेचा हा अपूर्व चंद्र माझें मन पवित्र करो. कर्ममल रहित करो.

याप्रमाणें चन्द्रप्रभाची स्तुति संपली.



पुष्पदन्ततीर्थंकराची स्तुति.
[उपजाति छंदः]

एकांतदृष्टिप्रतिषेधि तत्त्वं,
प्रमाणसिद्धं तदतत्स्वभावम् ।
त्वया प्रणीतं सुविधे स्वधाम्ना,
नैतत्समालोढपदं त्वदन्यैः ॥ ४१ ॥

**एकांतदृष्टे**त्यादि । स्वरूपेणेव पररूपेणापि सत्त्वमित्याद्येकांतस्तस्य दृष्टिस्तत्प्रतिपादकं दर्शनं तां प्रतिषेद्धुं शीलमस्येत्येकांतदृष्टिप्रतिषेधि । किं तत् ? **तत्त्वं** जीवादिवस्तु । कथम्भूतं ? **प्रमाणसिद्धं** प्रत्यक्षादिप्रमाणप्रसिद्धस्वरूपं । कीदृशं तत्तत्त्वं यत्प्रमाणसिद्धं इत्याह तदित्यादि संश्च विवक्षितः, असंश्च अविवक्षितः तदतौ तौ स्वभावौ यस्य तत् **तदतत्स्वभावं** विवक्षिताविवक्षितस्वभावमित्यर्थः । यतस्तदीदृशं तत्वं तत **एकांतदृष्टिप्रतिषेधि** । केन तत्प्रतिपादितमित्याह त्वया प्रणीतमिति । **त्वया** भगवता **प्रणीतं** कथितं । हे **सुविधे** । शोभनो विधिर्विधानं, क्रिया , अनुष्ठानं यस्यासौ सुविधिः अन्वर्थसंज्ञेयं नवमतीर्थकरदेवस्य । केन कृत्वा तत्प्रणीतमित्याह— **स्वधाम्ना** स्वज्ञानतेजसा अनेन विशिष्टज्ञानपूर्वकत्वात्तद्वचनं प्रमाणं इत्युक्तम् । अन्येऽप्येवंविधं तत्त्वं जानंति ततस्तत्प्रणीतमित्यपि कस्मान्न भवति इत्याह नेत्यादि । **न एतत्तत्वं समालीढपदं** । समालीढमास्वादितं अनुभूतं पदं स्थानं स्वरूपं यस्य । कैः **त्वदन्यैः** त्वत्तः सुविधेरन्यैस्त्वदन्यैः त्वच्छासनबहिर्भूताः सुगतादयः तैः ।

**मराठी अर्थः**–हे पुष्पदंत जिनेश आपण ज्या जीवादि तत्त्वांचें वर्णन केलें आहे तीं तत्वें प्रत्यक्षादि प्रमाणांनीं सिद्ध होतात. प्रत्यक्षादि प्रमाणांनीं त्यांचें–स्वरूप निर्बाध सिद्ध होतें. व तीं तत्वें एकांतदृष्टीचा प्रतिषेध–निराकरण करतात. व तीं

तत्वें नित्य अनित्य एक व अनेक अशीं आहेत ह्मणजे जीवादि तत्वांमध्यें नित्यत्व, अनित्यत्व, एकत्व, अनेकत्व असे अनेक विरुद्ध धर्महीं आहेत. अशा तत्वांचें वर्णन, सुगत नैयायिकादि वाद्याकडून, जे आपल्या आज्ञेपासून विमुख आहेत, होऊं शकणार नाहीं. हे जिनेश आपणच आपल्या दिव्य ज्ञानानें या तत्वांचें वर्णन केलें आहे. यास्तव आपल्या वचनामध्यें प्रमाणता आहे.

भावार्थः—श्री पुष्पदन्ततीर्थकरांनीं आपल्या केवलज्ञानाच्या सामर्थ्यानें जीवादितत्वांचा उपदेश केला यामुळें त्यांचें वचन आह्मी प्रमाण मानतों. अज्ञ मनुष्याचें वचन आपण अप्रमाण कां मानतो याचें कारण हें आहे कीं त्याच्या भाषणामध्यें विसंगतपणा आढळून येतो. श्री पुष्पदंत तीर्थकर पूर्ण ज्ञानी व पूर्णवैराग्ययुक्त होते. त्यांचा कोणांशीं द्वेष नव्हता व ते कोणावर प्रीतीही पण करीत नसत. यामुळें बिलकुल पक्षपात सोडून वस्तूच्या खऱ्या स्वरूपाचा ते उपदेश करीत असत. पक्षपात व अपूर्णज्ञान हीं दोन ज्याच्या ठिकाणीं आहेत त्यांचें वचन खरें आहे असें मानतां येत नाहीं. आतां येथें अशी शंका येईल कीं हे स्तोत्रकार, किंवा अकलंक विद्यानंद वगैरे मोठे आचार्य देखील पूर्ण ज्ञानी नव्हते व ते पूर्ण निर्मोही पण नव्हते यामुळें त्यांचें वचन प्रमाण कसें मानतां येईल. ' परंतु ही शंका योग्य नाहीं, कारण, जरी हे आचार्य पूर्ण ज्ञानी नव्हते तथापि परम गुरु पूर्ण ज्ञानी अशा महावीर स्वामीच्या वचनांना अनुसरून त्यांनीं धर्मोपदेश केला आहे. व त्यांच्या वचनामध्यें विसंगतपणा बिलकूल आढळून येत नाहीं. तसेंच दर्शनमोहनीय कर्माचा त्यांच्या ठिकाणीं उदय नाहीं व चारित्रमोहनीय कर्माचा देखील एकदेश क्षय झाला असल्यामुळें ते कथं-

चित् मोहरहितही आहेत. यास्तव त्यांचें वचन अप्रमाण नाही. परंतु कपिल बौद्धादिकांनीं जें तत्वांचें स्वरूप सांगितलें तें अप्रमाण आहे. परस्पर विरुद्धता त्यामध्यें आढळून येतें. व सर्वज्ञपरंपरेचा त्यांनीं आश्रय केला नाहीं. तसेंच त्यांनीं सर्वथा एकांतवाद मानला आहे. वस्तूमध्यें एकच धर्म आहे असें मानणें यास एकांतवाद ह्मणतात. ह्मणजे वस्तु नित्यच आहे किंवा ती अनित्यच आहे, ती एकच आहे किंवा अनेकच आहे, वस्तु सर्वथा सदात्मकच आहे अथवा ती अभावात्मकच आहे, असें मानणें या सर्वांस एकांतवाद ह्मणतात. परंतु श्री पुष्पदंत तीर्थकरांनीं या सर्व एकांत वादांचें खण्डन करून अनेकांत वादाचें समर्थन केलें.

वस्तूमध्यें नित्यानित्यात्मकता, एकानेकात्मकता, व भावाभावात्मकता हीं अपेक्षेनें सिद्ध करतां येतात. यामुळें परस्पर विरुद्ध दिसणारे धर्म मोठ्या एकोप्यानें वस्तूमध्यें राहतात ह्मणून विसंगतपणा दिसून येत नाहीं. द्रव्यार्थिक नयाच्या अपेक्षेनें वस्तु नित्य आहे व पर्यायाच्या अपेक्षेनें ती अनित्य आहे. कारण पर्यायाचा नाश होतो ते अनित्य आहेत. व द्रव्य सर्व पर्यायामध्यें दिसून येतें पर्यायाबरोबर त्यांचा नाश होत नाहीं. जर तें पर्यायाबरोबरच नाश पावतें तर उत्तर पर्यायामध्यें द्रव्य आपणांस दिसून येतें ना. तसेंच आपणांस प्रत्यभिज्ञानही झालें नसतें. तें ज्ञान पूर्वोत्तर पर्यायांला धारण करणाऱ्या द्रव्यामध्यें होत असतें. यावरून द्रव्यत्वदृष्टीनें पदार्थ नित्य आहे व पर्यायदृष्टीनें पदार्थ अनित्य आहे. तसेंच द्रव्य दृष्टीनें पदार्थ अखण्ड पिंड असा एकच दिसतो व पर्यायदृष्टीनें त्यामध्यें अनेकपणा आढळून येतो. यास्तव आचार्यांनीं तत्वांचें वर्णन करितांना अनेकांत 'तदतत्स्वभावम्' असा शब्द ठेविला आहे.

आपण प्रत्यक्ष प्रमाणानें पदार्थांचा विचार केला तरी तो अनेकधर्मात्मक दिसून येतो. जसें शब्द कानाला ऐकू येतो, त्याचें श्रावण प्रत्यक्ष होतें, त्याचप्रमाणें त्याच्यांत डोळ्यानें न दिसणें, जिभेनें चाखतां न येणें हे जे धर्म आहेत त्याचेंही प्रत्यक्ष होतें. नाकाला शब्दाचा वास येत नाहीं तो देखील धर्म त्याचा प्रत्यक्षानें दिसून येतो. जसें आपणास खोलींत घागर आहे, ती आण, असें एकानें सांगितलें. व आपण खोलींत जाऊन पाहतो तों तेथें आपणास घागर दिसली नाहीं, येथील जमीन दिसली तेव्हां येथें डोळ्यानें आपण जमीन पाहिली व घागरीचा अभावही पाहिला. घागरीचा अभाव पाहण्यास डोळ्याशिवाय इतर इंद्रियांची जरूर लागत काय? नाहींना? तद्वत्च वस्तूचा भाव व अभाव हे दोन्ही धर्म देखील आपल्यास प्रत्यक्ष दिसतात. स्वद्रव्यचतुष्टयाच्या अपेक्षेनें वस्तु सदात्मक आहे व परद्रव्य चतुष्टयानें ती अभावात्मक आहे. घटामध्ये पटात्मकता नाहीं ह्मणून अभाव धर्म तेथें दिसून येतो; व घटामध्यें घटात्मकता आहे ह्मणून भाव धर्मही तेथें आहे. यावरून एका प्रत्यक्षप्रमाणानें देखील भावाभावात्मकता दिसून येते हें दाखविण्यासाठीं आचार्यांनीं 'प्रमाणसिद्धं' हें पद योजिलें आहे. तेव्हां श्री पुष्पदन्त जिनांनीं जो तत्वोपदेश केला तो प्रमाण मानला पाहिजे हें सिद्ध होतें. श्री पुष्पदन्त तीर्थकरांना सुविधि असें ही दुसरें नांव आहे. व हें त्यांचें नांव सार्थक आहे. कारण, सु ह्मणजे उत्तम निर्दोष, विधि ह्मणजे क्रिया—चारित्र. उत्तम चारित्राला यांनीं पाळलें होतें ह्मणून यांचें नांव सुविधि असें आहे. चारित्र मोहनीय कर्माचा पूर्ण क्षय झाल्यानें चारित्र निर्दोष व पूर्ण होतें. व त्याचा उपशम झाल्यानें देखील पूर्णता चारित्रामध्यें येतें. परन्तु ती अन्तर्मु-

तूतीय टिकून राहते पुनः तें चारित्र अपूर्ण होतें. यास्तव श्री सुविधि जिनांनीं चारित्र मोहनीय कर्माचा पूर्ण नाशच केला व शाश्वत चारित्राची प्राप्ति करून घेतली.

कथं तदेवंविधं तत्त्व युक्तमित्याह ।

श्री पुष्पदंततीर्थंकरांनीं भावाभावात्मकता तत्त्वांमध्यें दाखविली ती योग्य कशी आहे हें आचार्य दाखवितात.

तदेव च स्यान्न तदेव च स्या-
त्तथा प्रतीतेस्तव तत्कथञ्चित् ।
नात्यन्तमन्यत्वमनन्यता च,
विधेर्निषेधस्य च शून्यदोषात् ॥४२॥

तदेव चेत्यादि । तदेव जीवादि वस्तु । स्यात् कथंचित् स्वरूपादिचतुष्टयेन । चकारः उभयत्र परस्परसमुच्चयार्थः । कुतस्तत्तथेत्याह—तथाप्रतीतेः, तथा स्वरूपपररूपाभ्यां सदसद्रूपतया प्रतीतेः प्रमाणेनाविसंवादनात् । तत्र संबन्धि तज्जीवादि तत्त्व कथंचित् न सर्वात्मना सदसदात्मकम् । विपरीतं कुतो न भवतीत्याह—नेत्यादि । नात्यंतमन्यत्वं न सर्वथा भेदः । कस्य ? विधेः स्वरूपादिचतुष्टयेनास्तित्वस्य । निषेधस्य च पररूपादिचतुष्टयेन नास्तित्वस्य च । कुतः ? शून्यदोषात् । अस्तित्वस्य हि सर्वथा पदार्थेभ्यो भेदे तेषामसत्त्वप्रसंगात् निराश्रयस्य चास्तित्वस्याप्यसंभवात् शून्यतादोषः । नास्तित्वस्य च ततोऽत्यन्तभेदे तेषां संकरप्रसंगात् तद्दोष इति । तर्हि तयोः सर्वथाऽभेदोऽस्त्वित्यत्राह—अनन्यता च । विधेः निषेधस्य चेति पदघटना । कुतः ? शून्यदोषात् । भावप्रधानोऽयं निर्देशः, शून्यदोषादिति । तथाहि, विधिनिषेधयोरत्यन्तमनन्यतायां सर्वथाऽभेदोऽस्तित्वस्य नास्तित्वस्यानुषंगात् । सकलशून्यतादोषः । नास्तित्वस्य वास्तित्वस्यानुषंगाद्वा संकरव्यवस्थानिबन्ध-

त्मक भावरूपात्मकत्वात् ॥ सकलभावानामेकरूपतापत्तः । सकल-शून्यता दोष. ।

मराठी अर्थः—हे जिनेश आपल्या मतामध्यें तत्व कथञ्चिद्भावाभावात्मक आहे हें सिद्ध होतें. प्रत्येक पदार्थ सदात्मकही आहे असदात्मकही आहे. अर्थात् पदार्थ या दोन्ही स्वरूपाला धारण करीत आहे. असाच आमचा अनुभव येत आहे. कारण, वस्तुमध्यें जें आपल्यास अस्तित्व दिसतें तें स्वरूप आहे. हें स्वरूप तिला स्वद्रव्य चतुष्टयानें प्राप्त झालें आहे ( या स्वद्रव्य चतुष्टयाचें वर्णन पूर्वी केलें आहे ) व पर पदार्थांचा अभाव देखील वस्तुमध्यें आढळून येतो. अर्थात् नास्तित्व देखील वस्तूमध्यें दिसतें. यावरून वस्तु उभयात्मक आहे हें सिद्ध होते. वस्तूमध्यें जें अस्तित्व आहे तें हमेशा नास्तित्व धर्मांशी अविनाभाव सम्बन्धानें राहतें. कोणतीही वस्तु तुम्ही घ्या, तिच्यामध्ये हे दोन धर्म रहाणारच. जिच्यांत हे धर्म नाहींत अशी वस्तूच मिळणार नाहीं. जिच्यांत केवळ अस्तित्वच राहतें अशी वस्तु जगांत एकही नाहीं किंवा जिच्यांत केवळ नास्तित्वच धर्म आहे अशीही वस्तु आपणास सांपडणार नाहीं.

हें असें कां ? यांचें आपण उदाहरणद्वारें स्पष्टीकरण करूं जेथें आपण धूर पाहतो, त्या ठिकाणीं अग्नि असावा अशी मनामध्यें कल्पना येतें. कारण, धूर अग्निशिवाय उत्पन्न होत नाहीं. असें आपल्यास माहीत असतें. यास्तव धूर अग्निची सिद्धि करण्यासाठीं हेतु आहे. परंतु जेथें जेथें धूर असतो तेथें तेथें पाणी असतें असें आपणास कोठें आढळून येत नाहीं. म्हणून धूर हा पाण्याचा सद्भाव सिद्ध करण्यास हेतु नाहीं यास्तव तो हेतुही आहे व अहेतुही आहे. अर्थात् धुरामध्यें जों

हेतुत्व व अहेतुत्व हे दोन धर्म अपेक्षेने सिद्ध होतात. तसेंच वस्तूमध्यें देखील स्वद्रव्यचतुष्टयाच्या अपेक्षेने अस्तित्व व परद्रव्यचतुष्टयाच्या अपेक्षेने नास्तित्व हे दोन धर्म जरी विरुद्ध वाटतात तथापि अविनाभाव सम्बन्धाने राहतात. यांचा अविनाभाव संबंध असल्यामुळे यांच्या पैकीं एकाचा जर अभाव मानला तर दुसऱ्याचा देखील अभाव होणारच. व अशाने वस्तुहीं आकाशपुष्पाप्रमाणें अभावात्मक होईल. यावरून वस्तूमध्यें हे दोन धर्म हमेशा असतात हे सिद्ध झालें.

आतां अस्तित्व, नास्तित्व हे दोन धर्म वस्तूमध्यें आहेत खरें, परंतु हें धर्म वस्तूपासून सर्वथा भिन्न किंवा सर्वथा अभिन्न मानूं नयेत. तसें मानल्यास सर्वथा वस्तूचा अभाव होईल, हें कसें ? याचें वर्णन याप्रमाणें समजावें.

अस्तित्व धर्म पदार्थापासून सर्वथा भिन्न मानला तर पदार्थाचा बिलकुल अभाव होईल कारण, अमुक एक पदार्थ जगांत आहे हे आपण त्याच्या अस्तित्व धर्मावरूनच ओळखतो. यासाठीं अस्तित्व धर्म पदार्थापासून कथञ्चित् भिन्न मानला पाहिजे. तसेंच अस्तित्व हा पदार्थाचा धर्म आहे व तो धर्म पदार्थाच्या आश्रयाने राहतो. पदार्थाहून भिन्न मानल्यास तो निराश्रय निराधार होईल व त्या धर्माचाही अभाव होईल. म्हणजे पदार्थापासून धर्मास भिन्न मानल्यास धर्माचा व धर्मीचा-पदार्थाचाही अभाव होइल. व वस्तु शून्य होईल. हा दोष येतो.

याचप्रमाणें नास्तित्व धर्मही पदार्थापासून सर्वथा भिन्न मानल्यास त्या पदार्थामध्ये परस्पर संकर होईल. म्हणजे ज्या पदार्थामध्यें अस्तित्व आहे त्याचें व नास्तित्व धर्मापासून भिन्न असलेल्या पदार्थाचें स्वरूप भिन्न भिन्न आपणास ओ-

ळखतां येणार नाहीं. तसेंच नास्तित्व हा धर्म पदार्थामध्यें असतो तो पदार्थापासून वेगळा मानला तर धर्म व धर्मी या उभयतांचा नाश होईल. जसें अग्निपासून त्याची उष्णता वेगळी मानली तर अग्नि थंड होईल व उष्णता कधीं तरी निराधार आपण पाहिली आहे काय ? त्याचप्रमाणे नास्तित्व धर्मही निराधार राहूं शकत नाहीं. असें मानल्यास उभयतांचा अभाव झाल्यामुळें शून्यता दोष येतो.

तसेंच अस्तित्व नास्तित्वामध्यें सर्वथा अभेद मानला तर अस्तित्व नास्तित्वस्वरूपाचें होईल, नास्तित्वही अस्तित्वस्वरूपाचें होईल, यामुळें सर्वसंकर होईल. कारण, वस्तूमध्यें नास्तित्वधर्म असल्यामुळें प्रत्येक पदार्थ भिन्न स्वरूपाचा दिसत असे. परंतु आतां नास्तित्वाचा अस्तित्वाशीं बिलकुल अभेद मानला. यामुळें प्रत्येक पदार्थामध्यें एकरूपता आल्यामुळें, द्रव्य, गुण, सामान्य, विशेष इत्यादि पदार्थांचा अभाव होऊन सर्वांना एकता येईल. व त्याचे विशेष स्वरूप ज्ञानगोचर होईनासें होतील.

यासाठीं अस्तित्व नास्तित्व हे दोन धर्म वस्तूपासून कथंचित् भिन्न व अभिन्न मानले पाहिजेत. म्हणजे कोणताही दोष येत नाहीं. धर्मांना धर्मीपासून-पदार्थापासून कथंचिद्भिन्न मानतात तें असें, धर्म व धर्मी हे परस्परांपासून वेगळे करतां येत नाहीं. पदार्थाचा अमुक हिस्सा धर्माचा आहे व अमुक हिस्सा पदार्थाचा आहे हें बिलकुल दिसून येत नाहीं. परंतु धर्माचें लक्षण भिन्न आहे व धर्मीचे लक्षण भिन्न आहे धर्म अनेक असतात, धर्मी एक असतो. तसेंच द्रव्यास-पदार्थास धर्मी असें नांव आहे व स्वभावास धर्म असें नांव आहे. धर्मी हा आधार असतो व धर्म हे आधेय असतात. तसेंच धर्मांचे गुणांचें लक्षण भिन्न आहे. ते धर्म—गुण द्रव्याच्या आश्र-

मानें असतात त्यांच्यामध्यें पुनः भिन्न गुणांची कल्पना होत नाहीं इत्यादि लक्षणावरून ते द्रव्यापासून कथंचित भिन्न आहेत. द्रव्यापासून त्यांना वेगळें करतां येत नाहीं. यामुळें ते अभिन्न आहेत. तेव्हां पदार्थापासून धर्माला भिन्नाभिन्न मानलें म्हणजे कोणताही दोष येत नाहीं.

एवं भावाभावरूपतया तत्तत्स्वभावं तत्त्वं प्रदर्श्य नित्यानित्यरूपतया तदतत्स्वभावं तत्प्रदर्शयितुमाह ।

याप्रमाणें जीवादि तत्त्वें भाव व भावात्मक आहेत हे मागच्या श्लोकांत आचार्यांनी सांगितलें आहे. आतां तींच तत्त्वें नित्यानित्यरूपाला धारण करतात हे आचार्य सांगतात

नित्यं तदेवेदमिति प्रतीते-
र्न नित्यमन्यत्प्रतिपत्तिसिद्धेः ।
न तद्विरुद्धं बहिरंतरंग-
निमित्तनैमित्तिकयोगतस्ते ॥४३॥

नित्यमित्यादि । नित्यं जीवादि वस्तु । कुतः ? तदेवेदमिति प्रतीतेः । तदेव यद्बाल्याद्यवस्थायां प्रतिपन्नं देवदत्तादि वस्तु तदेवेदं युवाद्यवस्थायां इति प्रतीतेः प्रत्यभिज्ञानात् । तर्हि नित्यमेव तदास्त्वित्याह न नित्यं कथञ्चिद्विनाशि । कुतः ? अन्यत्प्रतिपत्तिसिद्धेः । बालाद्यवस्थातो युवाद्यवस्था अन्येति येन प्रतिपत्तिस्तस्याः सिद्धेः निर्बाधत्वेन निर्णीतेः । नन्वेकस्य वस्तुनो भावाभावात्मकत्वं नित्यानित्यात्मकत्वं विरुद्धमित्याह-न तद्विरुद्धम् । तदनन्तरोक्तं भावाभावाद्यात्मकत्वं विरुद्धं अनुपपन्नं न । कुत इत्याह-बहिरित्यादि । अंगशब्दः प्रत्येकं सम्बध्यते, बहिरंगमन्तरंगं च । तत्र तन्निमित्तं सहकारिकारणं, अन्तरंगं निमित्तं उपादानकारणं । निमित्तादुद्भवं नैमित्तिकं कार्यं बहिरन्तरंगनिमित्तं च नैमित्तिकं च ताभ्यां योगः सम्बन्धः तस्मात्ततः । ते तव जिनस्य न तद्विरुद्धम् । तथाहि-स्वद्रव्य-[illegible]निमित्तेन [illegible] बहिरन्तरंगनिमित्तेन च यो-

मादस्तित्वमेकत्वं, परद्रव्यादिलक्षणेन च बहिरंगनिमित्तेन नास्तित्वमनेकत्वं एकस्यापि न विरुद्धम्। तथा द्रव्यलक्षणान्तरंगनिमित्तयोगान्नित्यत्वं क्षणभङ्गादिलक्षणबहिरंगनिमित्तयोगात्कार्यलक्षणनिमित्तयोगाद्वानित्यत्वमेकस्यापि वस्तुनो न विरुद्धम् ।

**मराठी अर्थः**—जीवादिक तत्वें हीं नित्यही आहेत व अनित्यही पण आहेत. तथापि अशा विरुद्ध धर्मांला धारण करीत असतांही यांच्यामध्यें कोणताही विरोध दिसून येत नाहीं. या तत्वामध्यें हे विरुद्ध धर्म हमेशा मत्या खुषीनें राहतात. यामुळें हे बिलकुल विरोधी नाहींत एवढेंच नव्हें तर परस्परांना हे साहाय करीत असल्यामुळेंच द्रव्यांचें-तत्वांचें या जगांत अस्तित्व आहे. नाहीं तर आकाश पुष्पाप्रमाणें यांची केव्हांच उचलबांगडी जगांतून झाली असती. एवढेंच होऊन राहिलें असतें, असें समजूं नका. तर सर्व जगाचा देखील लय झाला असतां कारण, जगत् ह्मणजे जीवादिक पदार्थांचा समूह-समुदाय व जीवादिक एक एक पदार्थ समुदायी आहेत. समुदायींचा हळू हळू नाश होऊं लागला तर समुदायही नाश पावणारच. अवयवांचा नाश होऊं लागला ह्मणजे अवयवीचा नाश होणें अशक्य आहे काय ? यावरून नित्य व अनित्य धर्म परस्परांची उपेक्षा न करितां गुणमोविन्दानें द्रव्यामध्यें राहतात ह्मणूनच त्यांचें अस्तित्व आहे. पदार्थांतील नित्य धर्म जर विरोध करून निघून गेला तर अनित्य धर्मही तेथें एक क्षणभरही राहूं शकणार नाहीं व अनित्य धर्म पदार्थांतून जर निघून गेला तर नित्यधर्म देखील राहूं शकणार नाहीं. इतका यांचा दृढ अविनाभाव संबंध आहे. असो.

आतां नित्य ह्मणजे काय ' याचा विचार करूं ' नित्य पदार्थ कोणता हें ओळखण्याचें चिन्ह ह्मणजे ' सोच हा ' असें

ज्ञान ज्या पदार्थाला पाहिलें असतां होतें तो पदार्थ नित्य समजावा. जसें ज्या देवदत्ताला मी लहानपणीं जाणलें होतें त्याच देवदत्ताला मी आतां मोठा तरुण झालेला पहात आहे. असें ज्ञान झालें म्हणजे त्या पदार्थातील नित्यत्व धर्माचें ज्ञान होतें. तेव्हां पदार्थ नित्य आहे हें प्रत्यभिज्ञान नांवाच्या ज्ञानानें आपणांस कळतें. प्रत्यभिज्ञान म्हणजे पदार्थाच्या पूर्व अवस्थेचें स्मरण व उत्तर अवस्थेचे प्रत्यक्ष या दोन ज्ञानापासून या दोन अवस्थांना धारण करणारा पदार्थ एकच आहे असें जोड ज्ञान होतें त्यास प्रत्यभिज्ञान म्हणतात. केवळ स्मरण हें पूर्वावस्थेचें होतें. व प्रत्यक्ष हें उत्तरावस्थेचें होतें. परंतु या दोन अवस्थांना जुळविणारा आपल्यामध्ये धारण करणारा असा एक पदार्थ या ज्ञानाचा विषय होतो यावरून हें ज्ञान स्मरण व प्रत्यक्ष याहून वेगळे होते. स्मरण व प्रत्यक्ष या दोन ज्ञानांचा विषय केवळ पदार्थाच्या पूर्वोत्तर अवस्था होत. परंतु प्रत्यभिज्ञानाचा विषय याहून वेगळा आहे पूर्वोत्तर अवस्थामध्ये एकत्वाने विराजमान होणारा पदार्थ या ज्ञानाचा विषय आहे एवढ्या विवेचनावरून प्रत्यभिज्ञानाचे स्वरूप लक्षांत आले असेलच.

पदार्थ सर्वथा नित्य नाहीं तो अनित्य देखील आहे याचा विचार करूं. पदार्थाची पहिल्या समयीं जी अवस्था आहे तीच अवस्था दुसऱ्या समयीं नसतें प्रतिसमयीं अवस्था बदलत असतात—रूपांतरें होत असतात. असे जर आपण मानलें नाहीं तर पुष्कळ काळ लोटला तरीही पदार्थामध्ये एकच अवस्था दिसून आली असती. व ज्ञानही तेच झालें असतें ज्ञानामध्ये आपल्यास फरक दिसून आला नसता. कारण विषयामध्यें फरक झाला म्हणजे ज्ञानामध्यें फरक दिसून येतो. विषय जर एकरूपच आहे तर ज्ञान देखील तसेच होणार. वास्तव प्रत्येक

समयांत पदार्थामध्यें स्थित्यंतर होतें हें मानलें पाहिजे. याचें उदाहरण असें समजावें कीं, एक मूल आहे, तें कांहीं वर्षांनीं तरुण अवस्थेला धारण करतें त्याला ही तरुण अवस्था एकदम प्राप्त झाली काय ? नाहीं. त्याच्या बाल्यावस्थेचा नाश प्रतिसमयीं होत गेला व नवीनता प्रतिसमयीं प्राप्त होत गेली. या क्रमानें त्याला तारुण्य प्राप्त झालें. कोणताही पदार्थ आपण पहा; त्याची अवस्था क्रमानें प्रत्येक समयीं बदललीच पाहिजे. तेव्हां अवस्थांकडे आपण लक्ष्य दिलें ह्मणजे पूर्वींच्या अवस्थेहून पुढची अवस्था निराळी आहे असें समजून येतें व त्यामुळें पदार्थ अनित्य आहे असें वाटतें; जेव्हां अवस्थांकडे लक्ष न देतां आपलें लक्ष केवळ पदार्थांकडेच जातें त्यावेळेस तोच हा पदार्थ आहे असें चटकन् आपल्या लक्ष्यांत येतें ह्मणून आपण पदार्थ नित्यही आहे, असें ह्मणतो. पदार्थामध्यें नित्यत्व व अनित्यत्व हे दोन धर्म आहेत; त्यामुळें आपणांस दोन तऱ्हेचें ज्ञान होतें. यावरून पदार्थ नित्यानित्यात्मक आहे हें सिद्ध झालें.

परन्तु एक पदार्थामध्यें भावाभावात्मकता व नित्यानित्यात्मकता हे धर्म रहाणें विरुद्ध वाटतें हें ह्मणणें योग्य नाहीं. याचें उत्तर आह्मीपूर्वींच दिलें आहे; व तें हें कीं, या दोन विरुद्ध धर्मांचा परस्पर दृढ अविनाभाव सम्बन्ध आहे. यामुळें यांच्यांत विरोधाचें नांव ही घेणें नको. यांच्यामध्यें अविरोध कसा आहे याचें थोडेसें आपण विवेचन करूं या.

कार्य उत्पन्न होण्यास दोन कारणांची जरूरत लागते. एक अन्तरङ्ग कारण, ज्याला आपण उपादान कारण या नांवानें ओळखतो. दुसरें बहिरंग कारण, ज्यास सहकारिकारण असें ह्मणतात. हें कारण उपादान कारणास कार्य करतेवेळेस मदत करते ह्मणून यास सहायक असेंही ह्मणतात. उपादान कारणा-

मध्यें कार्य करण्याची शक्ति असते, व सहायक कारणामध्यें त्याची शक्ति व्यक्त करण्याचें सामर्थ्य असतें. या उभय कारणांच्या मिलापानें उपादान कारण कार्य-स्वरूपाला धारण करतें.

जसें, पदार्थ स्वद्रव्यलक्षण अंतरंग निमित्तानें व स्वक्षेत्रादि अंतरंग बहिरंग निमित्तानें अस्तित्वात्मक आहे; व परद्रव्यादि लक्षण बहिरंग निमित्तानें नास्तित्वात्मक आहे; तथापि या विरुद्ध धर्माला धारण करून देखील पदार्थाचें स्वरूप कायम राहतें; तसेंच वस्तूमध्यें नित्यत्व व अनित्यत्व हें देखील विरुद्ध नाहीं. द्रव्यलक्षण अंतरंग निमित्तानें वस्तु नित्य आहे क्षेत्र, काल, भाव इत्यादि बहिरंग निमित्तांच्या सम्बन्धानें वस्तु अनित्यधर्मात्मक आहे. हे सिद्ध होतें. ह्मणून 'तदतत्स्वभावं' असें वस्तूचें वर्णन करतांना जें आचार्यांनीं ह्मटलें आहे तें एवढ्या विवेचनानें सिद्ध झालें. याचप्रमाणें चेतनाचेतनात्मक धर्महीं सिद्ध होतो. जसें जीवद्रव्य, प्रमेयत्व अमूर्तिकत्व इत्यादि गुणाकडे दृष्टि दिल्यास, अचेतन आहे, व ज्ञानदर्शनादि गुणाकडे दृष्टि दिल्यास चेतनही आहे; तसें सिद्ध जीवामध्येही मुक्तामुक्तता आहे. ती अशीः—कर्मरहित आहेत ह्मणून सिद्ध जीव मुक्त आहेत व ज्ञानदर्शनादि गुणांचा त्यांनीं त्याग केला नाहीं यास्तव ते अमुक्त आहेत. याप्रमाणें परस्पर विरुद्ध स्वभाव द्रव्यामध्यें राहतात. परन्तु द्रव्याची त्यायोगें कोणतीही हानि होत नाहीं.

ननु यद्यप्यनेकान्तात्मक वस्तु प्रत्यक्षादिप्रमाणतः प्रसिद्धस्वरूप तथाप्यागमा देकान्तस्वरूप तत्सेत्स्यतीत्याशङ्क्याह ।

जरी प्रत्यक्षादि प्रमाणांनीं अनेकान्तात्मक वस्तूचें स्वरूप आहे असें सिद्ध होतें तथापि आगमानुसार वस्तु एकान्तात्मकच सिद्ध होत असेल ? या शंकेचें आचार्य निरसन करतात.

अनेकमेकं च पदस्य वाच्यं,
वृक्षा इति प्रत्ययवत्प्रकृत्या ।
आकांक्षिणः स्यादिति वै निपातो,
गुणानपेक्षेऽनियमेऽपवादः ॥ ४४ ॥

**अनेक**मित्यादि । पदवाक्यात्मको ह्यागमः, पदात्मकं च वाक्यं । तत्र पदमेव तावच्चिन्त्यते । **पदस्य वाच्यमभिधेयमनेक**मनेकपर्यायात्मकं वस्तु, **एकं च** विवक्षितैकसामान्यात्मकं च । सामान्यविशेषात्मकं वस्तु वाच्यमित्यर्थः । यद्यनेकमेव तदभिधेयं स्यात्तदा तत्र संकेतासम्भवादनभिधेयमेव तत्स्यात् । यत्र हि संकेतः कृतस्तदन्यत्, यत्र च शब्दे व्यवहारः क्रियते तदन्यत् । न चासंकेतितमभिधातुं शक्यमतिप्रसंगात् । यदि पुनरेकमेव सामान्यमभिधेयं स्यात्तदा एकस्मिन्विशेषे प्रवृत्तिर्न स्यात् । कथं पुनरेकमनेकं च पदस्य वाच्यमित्यत्राह–**प्रकृत्येति** स्वभावेनेति । दृष्टांतमाह–**वृक्षा इति प्रत्ययव**दिति । एते वृक्षा इति योयं प्रत्ययस्तस्येव तद्वत् । अत्र हि प्रत्यये वृक्षत्वसामान्यं धवखदिरादयश्च विशेषाः प्रतिभान्तीति सामान्यविशेषविषयत्वं यथा तथा पदेऽपीति । यदि वा, पदस्येति कोर्थः ? **प्रत्ययवत्प्रकृत्याः** प्रत्ययवती प्रकृतिः पदं इत्यभिधानात् । एतदेव व्यक्तिनिष्ठतया दर्शयति वृक्षा इति ।

ननु यद्यनेकमेकं च पदस्य वाच्यं स्यात्तर्ह्यस्तीत्युक्ते नास्तित्वस्यापि प्रतिपत्तिप्रसंगात् पदान्तरप्रयोगोऽनर्थकः स्यात् । यदि वा स्वरूपेणेव पररूपेणापि अस्तित्वं स्यात् । नास्तीत्युक्ते चास्तित्वस्यापि प्रतिपत्तिः स्यात्पररूपेणेव स्वरूपेण च नास्तित्वं स्यात् ? इत्याशंक्याह–आकांक्षिण इत्यादि । अस्तित्वादौ प्रतिपादितेऽपि नास्तित्वादौ या आकांक्षा सा विद्यते यस्य पुरुषस्य तस्य **आकांक्षिणः । स्यादिति** योयं **निपातः** सोपवादो बाधको, **वै** स्फुटं । कापवादो भवति ? **अनियमे** यथा स्वरूपेण तथा पररूपेणाप्यस्तित्वं, यथा वा पररूपेण तथा स्वरूपेणापि ना-

स्तित्वमिति योयमनियमस्तस्मिन् । कथम्भूते ? गुणानपेक्षे अस्तीत्युक्ते अस्तित्वं प्रधानभूतं नास्तित्वं गुणभूतं । नास्तीत्युक्ते तु नास्तित्वं प्रधानभूतं अस्तित्वं गुणभूतं । तस्मिन्गुणे न विद्यतेऽपेक्षा यस्यासौ **गुणान-पेक्षस्तस्मिन्** ।

**मराठी अर्थः**—अनेक शब्द मिळून एक वाक्य बनतें व अनेक वाक्यें मिळून आगम–शास्त्र बनतें. एकावाक्यामध्यें अनेक शब्द असतात, व अनेक वाक्यांनीं शास्त्राची रचना होते. शब्दासच पद असें ह्मणतात. अनेकवर्ण मिळून एकशब्द बनतो. एका शब्दांतील जितकीं अक्षरें असतात ती परस्परांची अपेक्षा ठेवितात परंतु दुसऱ्या शब्दांतील वर्णांशीं तीं अपेक्षा ठेवीत नाहींत. जसें ' शीतल ' हा शब्द आहे, याच्यांत तीन अक्षरें आहेत व हीं परस्परांची अपेक्षा ठेवतात. ह्मणूनच या शब्दाचा कांहीं तरी अर्थ आपणास करतां येतो. तसें नसतें तर या शब्दाचा अर्थ आपणास करता आला नसता ' शीतल ' ह्या शब्दांतील अक्षरें दुसऱ्या शब्दांतील अक्षरांची अपेक्षा ठेवीत नाहींत यावरून शब्दाचें लक्षण आपणास असें करता येईल कीं, ' परस्परांची अपेक्षा ठेवणारे व दुसऱ्या शब्दांतील वर्णांशीं निरपेक्ष असणारे अशा वर्णांचा जो समुदाय त्यास पद ह्मणतात. यासच शब्दही ह्मणतात. व वाक्य ह्मणजे परस्पर अनेक शब्दांशीं सापेक्ष असणारे व वाक्यान्तरगत शब्दांशीं संबंध न ठेवणारे अशा शब्दांचा जो समुदाय त्यास वाक्य ह्मणात, व या अनेक वाक्यांच्या रचनेला आगम असें ह्मणतात.

आतां वर शब्दाचें लक्षण सांगितलें आहेच. येथें एका-शब्दाचे अर्थ एक व अनेक असतात असें आचार्यांचें मत आहे, ह्मणजे सामान्य विशेषात्मक जी वस्तु ती शब्दानें प्रति-

पादिली जाते. सामान्य ह्मणजे द्रव्य व विशेष ह्मणजे पर्याय, या दोहोंचें वर्णन शब्दानें करतां येतें. सामान्य हें एक असतें व विशेष पर्याय अनेक असतात. तेव्हां या उभय धर्माला धारण करणारा पदार्थ शब्दाचा वाच्य असतो. यावरून त्याचें वाच्य एक व अनेक असतात हें सिद्ध झालें.

जर शब्दाचे वाच्य पुष्कळ असतात असें मानलें तर त्या सर्व वाच्यामध्यें-पदार्थामध्यें संकेत आपल्यास करतां येणार नाहीं; कारण, पदार्थ अनंत आहेत त्या सर्व पदार्थामध्यें संकेत आपणांस करतां येणें शक्य नाहीं. व यामुळें शब्दाचेद्वारें कोणताही पदार्थ प्रतिपादिला जाणारा नाहीं. यास्तव शब्द अनेक अर्थाचेंच प्रतिपादन करतो असें मानणें उचित नाहीं. तसेंच शब्दाचे द्वारें सामान्यच प्रतिपादन केलें जातें असें ह्मणाल तर विशेषाचें=पर्यायाचें ग्रहणच शब्दानें होणार नाहीं. यास्तव शब्दाचेद्वारें एक व अनेक पदार्थाचें ग्रहण होणार कसें? या शंकेचें निरसन पुढें दिलेल्या उदाहरणानें होतें; तें उदाहरण असें—

वृक्ष असा आपण शब्द उच्चारला किंवा ऐकला, लागलीच मनामध्यें वृक्ष या शब्दाचा अर्थ काय असावा याविषयाचें ज्ञान उत्पन्न होतें व त्या ज्ञानामध्यें वृक्षत्वसामान्याचें ज्ञान होतें. व त्याचवेळेस धव किंवा खदिर, बाभूळ वगैरे त्याचें विशेष प्रकाराचें ज्ञान होतें. कोणताही शब्द ऐकला कीं त्याच्यापासून सामान्य व विशेष या दोन धर्माला धारण करणाऱ्या पदार्थाचें ज्ञान होतें. त्या शब्दामध्यें सामान्य विशेषात्मक पदार्थाचें प्रतिपादक स्वरूप झळकतें. तेव्हां शब्द व ज्ञान हे दोघे सामान्यविशेषात्मक पदार्थाला ग्रहण करतात हें सिद्ध झालें.

जर शब्दद्वारें एक व अनेक पदार्थाचें ग्रहण होऊं लागेल

वर 'अस्ति' या शब्दानें अस्तित्वाचें ग्रहण होऊन नास्तित्व धर्माचेंही ग्रहण होईल. 'घागर' असा शब्द उच्चारल्यावरोवर घागरीचें ज्ञान तर होईलच परन्तु तो शब्द इतर पदार्थाचें ज्ञान देखील करून देईल. यामुळें इतर शब्द उच्चारणें व्यर्थ होईल. 'नास्ति' शब्द उच्चारल्यावरोबर अस्तित्व धर्माचेंही ज्ञान होईल. व या योगानें परद्रव्यचतुष्टयानें पदार्थ जसा नास्तित्व धर्माला धारण करतो तसें स्वरूपानें देखील तो नास्तिस्वरूपाचा होईल. या शंकेचा परिहार पुढील विवेचनानें होण्यासारखा आहे. तो असा —

अस्ति शब्दाची प्रवृत्ति व प्रतीति अस्तित्व धर्मामध्यें होऊन ती नास्तित्व धर्मामध्येंही होतें परन्तु या अस्ति-शब्दाची प्रवृत्ति नास्तित्व धर्मामध्यें जी मुख्यतेनें होत होती तिला आळा घालणारा 'स्यात्' असा शब्द आहे अथवा 'कथञ्चित्' हा आहे. त्यामुळें अस्ति हा शब्द अस्तित्व धर्माला मुख्यत्वेंकरून दाखवितो परन्तु नास्तित्व धर्माला मुख्यत्वानें दाखवित नाहीं. तो शब्द नास्तित्व धर्माला गौण रीतीनें दाखवितो. यामुळें पूर्वी जो बिलकुल शब्दाची सर्व अर्थामध्यें प्रवृत्ति झाल्यामुळें घोटाळा माजला होता त्याचा नाश या 'स्यात्' शब्दानें केला, व शब्दाला त्यानें व्यवस्थित स्वरूप देऊन त्या शब्दाची मुख्यतेनें प्रवृत्ति कोणत्या अर्थामध्यें होते व गौण रीतीनें कोणत्या अर्थामध्यें कशी होते याचा योग्य निर्णय केला. तसेंच प्रत्येक शब्दामध्यें मुख्य रीतीनें स्वार्थ व गौण रीतीनें अन्यार्थ दाखविण्याची शक्ति असते व ती 'स्यात्' या शब्दानें [ हा शब्द मागें जोडल्यानें ] प्रगट होऊन आपलें काम करूं लागते.

'स्यात्' शब्द आपण हमेशा बोलतांना कोठें योजीत

**असतो व तो न योजल्यामुळें शब्दांतील गौण व मुख्य अर्थ कसा प्रकट होईल ? याचें उत्तर हें आहे कीं, आपणास श-ब्दामध्यें गौण व मुख्य अर्थ दाखविण्याची शक्ति आहे असें माहीत असतें यामुळें आपण ' स्यात् ' या शब्दाचा प्रयोग करीत नाहींत. परन्तु शिष्यास शब्द--शक्तीची ओळख पटावी यासाठीं त्या शब्दास स्यात् हा द्योतक शब्द जोडून त्याचा प्रयोग कर-तो. व जेव्हां तो शब्दाची गौण व मुख्य शक्ती उत्तम रीतीनें समजूं लागतो त्यावेळेस ' स्यात् ' या शब्दाचा प्रयोग नाहीं केला तरी कोणती बाधा उपस्थित होत नाहीं. यावरून शब्द एक व अनेक अर्थ कसे दाखवितो हें सिद्ध झालें.**

एवं पदाभिधेयस्वरूपं निरूप्येदानीं वाक्याभिधेयस्वरूपं निरूपयन्नाह ।

भागच्या श्लोकांत शब्दाचा अर्थ कसा मानावा याचें वर्णन केलें आतां वाक्याचा अर्थ एक होतो किंवा अनेक होतात हें आचार्य या श्लोकांत दाखवितात.

गुणप्रधानार्थमिदं हि वाक्यं,
जिनस्य ते तद् द्विषतामपथ्यम् ।
ततोऽभिवन्द्यं जगदीश्वराणां,
ममापि साधोस्तव पादपद्मम् ॥ ४५ ॥

**गुणे**त्यादि । गुणोऽविवक्षितो धर्मः । प्रधानो विवक्षितो धर्मस्ता-वर्थौ अभिधेयौ यस्य तत्तथोक्तं । **इदं** पदात्मकतया प्रतीयमानं **वाक्यं** । **हि** स्फुटं । पदानां हि गुणप्रधानार्थभावाविरोधे वाक्यानामपि तन्मयानां तद्भावाविरोधो भवत्येव । कस्य तद्वाक्यं ? **जिनस्य ते** तव **द्विषतां** प्रति-कूलानां सुगतादीनां **तद्वाक्यमपथ्यम**निष्टं । यत ईदृशं सकलैकांत-वादिवाक्यातिशायि भवदीयं वाक्यं **ततोऽभिवन्द्यम**भिवन्दनीयम् । किं तत् ? **पादपद्मं** पादावेव पद्मं पादपद्मं । कस्य ? **तव** भगवतः **साधोः**

सकलकर्मापायसावनशीलस्य । केषाममिवन्द्यं ? जगदीश्वराणां जगतामीश्वरा इन्द्रचक्रवर्तिधरणेन्द्रादयस्तेषां । न केवलं तेषां, किंतु ममापि समन्तभद्रस्वामिनोऽपि ।

मराठी अर्थः-जसें शब्दामध्यें मुख्य व गौण अर्थ प्रतिपादन करण्याची शक्ति आहे. याचप्रमाणें वाक्यामध्यें देखील मुख्य व गौण अर्थ प्रतिपादन करण्याची शक्ति आहे. कारण, अनेक शब्द मिळून एक वाक्य बनतें. तेव्हां शब्दामध्यें जी शक्ति आहे ती वाक्यामध्यें देखील येणारच. जसें ' स्यादस्ति घटः ' ह्या वाक्यांत स्वरूपचतुष्टयाच्या अपेक्षेनें घागर आहे-मुख्यतः घागर आपल्या स्वरूपानें आहे हें प्रतिपादिलें आहे. व हा या वाक्याचा मुख्य अर्थ आहे. व परद्रव्यचतुष्टयाच्या अपेक्षेनें घागर नाहीं असा गौण अर्थ देखील ह्मणजे विधिचा निषेधपरक अर्थही या वाक्यापासून निघतो. परंतु त्यामध्यें दोन्ही मुख्य मानतां येत नाहींत तसें मानलें असतां स्वद्रव्यचतुष्टयाच्या अपेक्षेनें जसें वस्तूमध्यें अस्तित्व धर्माचें वर्णन करतां येतें, तसा परद्रव्यचतुष्टयाच्या अपेक्षेनें देखील तिच्यांत अस्तित्व धर्म राहील. व त्यामुळें घट जसा स्वस्वरूपानें आहे तसा परस्वरूपाचा देखील होईल. यामुळें कोणत्याच पदार्थाचें वास्तविक स्वरूप समजणार नाहीं. यास्तव वाक्याचा अर्थ मुख्य व गौण असा मानलाच पाहिजे. याचप्रमाणें ' घटो नास्ति ' या वाक्याचा निषेधपरक अर्थ मुख्य आहे व विधिपरक अर्थ गौण आहे. असें हें जिनेश ! आपण सांगितलें आहे. बौद्ध नैयायिक इत्यादिकांना हा वाक्याचा गौण व मुख्य अर्थ अनिष्ट आहे. व हे जिनेश, इंद्र चक्रवर्ति व धरणेन्द्र जे जगाचें मालक आहेत त्यांच्याकडून आपलें पदकमल वंदनीय आहेत. यास्तव मी [ समन्तभद्रस्वामी ] देखील आपल्या

चरणकमलांना भक्तीनें नमस्कार करतो.

नवव्या तीर्थकरांना पुष्पदन्त व सुविधि अशीं दोन नांवें आहेत. सुविधि या नांवाचा उल्लेख स्वतः आचार्यांनीं ' त्वया प्रणीतं सुविधे स्वधाम्ना ' या श्लोकचरणानें केला आहे. टीकाकारानें सुविधि शब्दाचें स्पष्टीकरण टीकेमध्यें केलें आहे. आतां पुष्पदन्त या शब्दाचा अर्थ काय आहे हें पाहू. पुष्पदन्त ह्मणजे कुन्दफुलाप्रमाणें दन्तपंक्ति ज्याची आहे तो पुष्पदन्त. अर्थात् यांची दन्तपंक्ति कुंदपुष्पाप्रमाणें मनोहर असल्यामुळें यांचें पुष्पदन्त हें नांव सार्थक होतें.

श्री वाग्भटकवींनीं या तीर्थकराच्या पुष्पदन्त या नांवाची सार्थकता सुंदर रीतीनें व्यक्त केली आहे ती अशीः—

भूरिप्रभानिर्जितपुष्पदन्तः करायतिन्यक्कृतपुष्पदन्तः ।
त्रिकालसेवागतपुष्पदन्तः श्रेयांसि नो यच्छतु पुष्पदन्तः ॥

अर्थ—चंद्र व सूर्य यांना पुष्पदंत असें म्हणतात. पुष्पदंत तीर्थकरांनीं स्वतःच्या शरीरकान्तीनें चंद्र व सूर्य यांना पराजित केलें होतें म्हणून यांनाच पुष्पदन्त ह्मटलें पाहिजे. यांचे हात गुडघ्यापर्यंत लांब होते व पुष्ट होते. यामुळें यांनीं आपल्या हातांनीं पुष्पदन्त या नांवाच्या दिग्गजाला जिंकले होते. ह्मणजे या दिग्गजाच्या सोंडेपेक्षां अधिक सुंदर यांचे हात होते. पुष्पदन्त नांवाचे देव यांची पूजा करण्यासाठीं हमेशा येत असत यास्तव यांचेंच नांव सार्थक होय. देव केवळ नामधारी होते. याप्रमाणें पुष्पदन्त या नांवाला सार्थक करणारे हे पुष्पदन्त तीर्थकर आमचें मंगल करोत.

याप्रमाणें पुष्पदन्त जिनाचें स्तोत्र संपलें.

अथ श्रीशीतलनाथ स्तुतिः ॥

※ ( वंशस्थ छन्द )

**न शीतलाश्चन्दनचन्द्ररश्मयो,**
**न गांगमम्भो न च हारयष्टयः ।**
**यथा मुनेस्तेऽनघवाक्यरश्मयः,**
**शमाम्बुगर्भाः शिशिरा विपश्चिताम् ॥४६॥**

**न शीतला** इत्यादि । न शीतला न संसारतापदुःखापहारकाः । के ते इत्याह चन्दनेत्यादि । चन्दनं च चन्द्ररश्मयश्च । **न गांगमम्भः** शीतलं गंगाया इदं गांगमम्भः पानीयं । **न च** नैव **हारयष्टयः** मुक्ताफलमालाः शीतलाः । अत्र वैधर्म्योदाहरणमाह—यथेत्यादि । **यथा** येन संसारसन्तापदुःखापनोदप्रकारेण । **शिशिराः** शीतलाः प्रल्हादकराः । केषां ? **विपश्चितां** हेयोपादेयतत्त्वविदाम् । के ? **अनघवाक्यरश्मयः** वाक्यान्येव रश्मयो यथावदर्थस्वरूपप्रकाशकत्वात् । अनघा अनवद्याश्च ते वाक्यरश्मयश्च । कस्य ? **मुनेः** प्रत्यक्षविदः **ते** तव । यदि वा ते इति सम्बोधनं, तस्य अनघ इति विशेषणं । हे **मुने** शीतल भगवन् । शम उपशमो रागद्वेषयोरभावः स एवाम्बु जलं तद्गर्भे येषां ते तथोक्ताः ।

**मराठी अर्थः**—हे शीतलनाथ जिनेश ! रागद्वेषांच्या अभावरूपी पाण्यानें ओथंबलेल्या व संसार सन्तापास दूर पळविणाऱ्या हितोपदेशरूपी वचनकिरणांनीं सर्व विद्वज्जनांचें अन्तःकरण जसें शान्त होतें, तसें चन्दनाच्या लेपानें, चन्द्रकिरणांच्या सेवनानें, गंगेच्या शीतल पाण्यानें अथवा मोत्यांच्या हारांनीं देखील त्याचें अन्तःकरण शान्त होत नाहीं.

तात्पर्य—शीतलनाथ जिनेश्वरांनीं केलेल्या उपदेशाच्या श्रवणानें विद्वान् लोकांनीं आपला संसारताप नाहींसा केला.

---

※ अस्य लक्षणं यथा ' जतौ तु वंशस्थमुदीरितं जरौ ' इति ।

संसारताप नाहींसा करून जीवांना कायमचे सुखी करण्याचें सामर्थ्य जिनेश्वराच्या उपदेशाशिवाय इतर ठिकाणीं आढळून येणार नाहीं. जरी जगांत पुष्कळसे पदार्थ सन्ताप मिटविणारे आहेत; तथापि त्यांच्या अंगीं संसारदुःख दूर करण्याची शक्ति बिलकुल नाहीं. चन्दनाच्या लेपानें किंवा चन्द्रकिरणांनीं, आपल्या अंगीं वाढलेला दाह नाहींसा होईल. परन्तु संसारदुःखाचा नाश करण्यास उपरोक्त पदार्थ समर्थ होतील काय? यास्तव संसारदुःखाचा नाश करण्याच्या इच्छेनें प्रेरित होऊन भव्य विद्वज्जन, हे शीतल जिनेश, आपल्या शीतल वचनकिरणांचा आश्रय करतात.

यस्य भगवत ईदृशा वाक्यरश्मयः स किं कृतवानित्याह ।

ज्या जिनेश्वराचे वचनकिरण असें अद्भुत सामर्थ्य ठेवतात त्या भगवन्तानें कोणतीं कृत्यें केलीं याचें स्तुतिकार वर्णन करतात.

सुखाभिलाषानलदाहमूर्च्छितं,
मनो निजं ज्ञानमयामृताम्बुभिः ।
व्यदिध्यपस्त्वं विषदाहमोहितं,
यथा भिषग्मन्त्रगुणैः स्वविग्रहम् ॥४७॥

**सुखाभिलाषे**त्यादि । **व्यदिध्यपस्त्वं** विध्यापितवान् भवान् । किं तत् ? **मनः** । कथम्भूतमित्याह—**सुखे**त्यादि । इन्द्रादिसुखं ममास्त्विति वाञ्छा सुखाभिलाषः । स एवानलः सन्तापहेतुत्वात्तेन दाहश्चातुर्गतिकं दुःखं सन्तापश्च, तेन मूर्च्छितं मोहितं हेयोपादेयविवेकविमुखीकृतं मन आत्मस्वरूपं । **निज**मात्मीयं । कैस्तद्व्यदिध्यप इत्याह—**ज्ञाने**त्यादि । ज्ञानेन निर्वृत्तानि ज्ञानमयानि ज्ञानस्वभावानि । ज्ञानमित्युपलक्षणं दर्शनचारित्रयोः । तानि च तान्यमृतानि च तान्येवाम्बूनि तैः । कैरिव कः कमित्याह—**विषे**त्यादि । विषेण दाहः सन्तापस्तेन मोहितं मूर्छितं । **स्ववि-**

**ग्रहं** स्वशरीरं **यथा** यद्वत् व्यदिव्यपत् । कोसौ ? भिषग्वैद्यः **मन्त्रगुणैः** मंत्रस्य गुणाः अनुस्मरणोच्चारणमात्रेण विषापहरणे वीर्यविशेषास्तैः ॥

मराठी अर्थः—वैद्य ज्याप्रमाणें विषाच्या संतापानें पीडित झालेलें आपलें शरीर, विषहरण करण्यास समर्थ असलेल्या मंत्रांनीं निर्विष करतो-आरोग्ययुक्त करतो. त्याचप्रमाणें नानाप्रकारच्या सांसारिक सुखाच्या इच्छारूपी अग्नीच्या दाहानें दुःखित झालेल्या आपल्या मनास हे जिनेश आपण सम्यग्दर्शन, ज्ञान व चारित्ररूपी अमृतजलानें शांत केलें.

भावार्थ—जसें अग्नीच्या ज्वालांनीं मूर्च्छित झालेल्या मनुष्याच्या अंगावर थंड पाणी टाकून आपण त्याची मूर्च्छा दूर करतो, तद्वत् भगवान शीतल जिनांनीं सांसारिक सुखाभिलाषारूपी अग्नीच्या सन्तापानें मूर्च्छित झालेलें आपलें मन-आत्मा रत्नत्रयरूपी अमृताच्या वर्षावानें शांत केलें. हें योग्यच झालें. कारण, त्यांनीं आपला आत्मा सांसारिक दुःखापासून मुक्त केला ह्मणून सर्व जीवांना दुःखापासून मुक्त करण्यास ते समर्थ झाले. जसें, एखादा मनुष्य अनेक रोगांनीं ग्रस्त झाला असून तो, मी वाटेल तो रोग दूर करण्यास समर्थ आहे, असें ह्मणूं लागला तर त्याच्या वचनावर कोणाचा तरी विश्वास बसेल काय ? तद्वत् शीतलनाथ भगवानांनीं आपल्या आत्म्याचा सांसारिक दुःखापासून उद्धार न करतां इतर जनांना तें दूर करण्याचा उपाय त्यांनीं सांगितला असतां तर त्यांच्या वचनावर कोणाचाच विश्वास बसला नसता. कारण, एका कवीनें असें ह्मटलें आहे कीं:—

रागादिदोषसंयुक्तः प्राणिनां नैव तारकः ।
पतन्तः स्वयमन्येषां नहि हस्तावलंबनम् ॥

रागद्वेषांनीं ज्याचें मन घेरलें आहे असा गुरु प्राण्यांचें त्या

विकारापासून रक्षण करूं शकणार नाहीं. जीं माणसें स्वतः पडलीं आहेत तीं दुसऱ्याला आपल्या हाताच्या आधारानें उचलूं शकतील हें सम्भवनीय वाटतें का ? यास्तव श्री जिनेशांनीं स्वतःला रागद्वेष व सांसारिक दुःखापासून दूर केलें व दूर होण्याचा उपाय–उपदेश केला, म्हणून त्यांचा उपदेश ग्राह्य आहे.

ननु यथा भगवता सन्मार्गानुष्ठानेनात्मीयं मनः उपशमितसकलसंतापतया परमशान्तिं नीतं तथा सकलप्रजा अपि तत्तां नेष्यतीत्याशंक्याह ।

भगवान शीतल जिनांनीं सन्मार्गाचें–रत्नत्रयाचें आचरण करून, संसारदुःखाचा नाश केला, व आपल्या आत्म्यास त्यांनीं परम शांतीचा लाभ जसा करून दिला तसाच सर्व लोकही आपल्या आत्म्यास शांतीचा लाभ करून घेतील. या शंकेचें उत्तर आचार्य देतात.

स्वजीविते कामसुखे च तृष्णया,
दिवा श्रमार्ता निशि शेरते प्रजाः ।
त्वमार्य नक्तंदिवमप्रमत्तवा-
नजागरेवात्मविशुद्धवर्त्मनि ॥४८॥

**स्वजीवि**तेत्यादि । स्वस्यात्मनो जीवितं वर्षशतादिपरिमितं । तत्र या तृष्णा अभिलाषः । **कामसुखे च** स्त्र्यादिषु अभिलाषः काम: तस्मात्सुखं विषयप्रीतिरित्यर्थः । तत्र च या तृष्णा तया **तृष्णया** । **दिवा** दिवसे । ( **श्रमार्ताः** ) यः श्रमः सेवादिक्लेशः तेनार्ताः पीडिताः खिन्नाः । अतो दिवसे तासां सन्मार्गानुष्ठानं नास्ति, रात्रौ तर्हि भविष्यतीत्याह-निशीत्यादि **निशि** रात्रौ । **शेरते** स्वपन्ति **प्रजाः** । कस्य तर्हि निराकुलं सन्मार्गानुष्ठानं इत्याह–त्वमित्यादि । **त्वमार्य** शीतल भगवन् **नक्तंदिवं** अहोरात्रम् । **अप्रमत्तवान्** प्रमादरहितः । **अजागरेव**

जागरितवानेव । नष्टनिद्र एव । क ? आत्मविशुद्धवर्त्मनि आत्मा विशेषेण शुद्धो निखिलकर्मरहितो यस्माद्भवति तदात्मविशुद्धं । आत्मन्येव सम्बन्धि विशुद्धं आवरणमोहविगमेन शुद्धं । तच्च तद्वर्त्म च सम्यग्दर्शनादिलक्षणो मोक्षमार्गस्तस्मिन् ।

मराठी अर्थः—सर्व लोक आपण पुष्कळ वर्षें वाचावें या इच्छेनें व इंद्रियांना मोहित करणाऱ्या कामसुखाच्या इच्छेनें पीडित होऊन, नोकरी, व्यापार इत्यादिक कामें करतात. व या सर्व दिवस कृत्यांनीं ते थकून जाऊन रात्रीं श्रमपरिहार करण्यासाठीं झोंप घेतात. परंतु हे पूज्य शीतल भगवान्, आपण प्रमादरहित होऊन निद्रेचा पराजय केला, व घातिकर्मांचा नाश करून शुद्ध आत्मतत्वाची प्राप्ति करून देणाऱ्या रत्नत्रयरूपी मोक्षमार्गामध्यें रात्रंदिवस जागृत राहिलात.

तात्पर्यः—इतर जनामध्यें व शीतल तीर्थंकरामध्यें जमीन अस्मानाचें अंतर आहे. इतर जन जीवनकलह निर्विघ्न पार पडावा ह्मणून, व विषय सुखांची प्राप्ति व्हावी ह्मणून नाना तऱ्हेचे व्यवसाय करतात. याप्रमाणें हीं दिवसकृत्यें करून आलेल्या थकव्याचा परिहार करण्यासाठीं रात्रीं झोंप घेतात. यामुळें रत्नत्रयाची आराधना करण्यास त्यांना फुरसतच मिळत नाहीं. अर्थपुरुषार्थ व काम पुरुषार्थ या दोन पुरुषार्थांची प्राप्ति करून घेण्यांत त्यांचा सर्वकाल निघून जातो. धर्म पुरुषार्थाचें साधन त्यांच्या हातून होत नाहीं. परंतु शीतल जिनांनीं रात्रंदिवस रत्नत्रयाराधन केलें, निद्रेचा पराजय त्यांनीं केला. घातिकर्मांचा नाश करून शुद्ध आत्मतत्वाची प्राप्ति करून घेतली. हा प्राकृत जनांत व शीतलनाथ यांच्यामध्यें फरक आहे.

तथा तृष्णाभिभूताः प्राणिनोन्यदपि कुर्वन्तीत्याह —

तसेंच विषयतृष्णेला बळी पडलेले संसारी जीव आण-

र्श। कोणतीं कामें करतात हें स्तुतिकार दाखवितात.

अपत्यवित्तोत्तरलोकतृष्णया ,
तपस्विनः केचन कर्म कुर्वते ।
भवान् पुनर्जन्मजराजिहासया ,
त्रयीं प्रवृत्तिं शमधीरवारुणत् ॥ ४९ ॥

**अपत्ये**त्यादि ।अपत्यानि च पुत्रादीनि , वित्तानि सुव-र्णादीनि , उत्तरलोकश्च ( उत्तर उत्कृष्टो लोकः ) अन्यजन्म प-रलोक इत्यर्थः । तेषु तृष्णा आकांक्षा , तया । **तपस्विनो**ऽ-ग्निहोत्र्यादयः कर्मवराकाः प्राणिनो व्रतिनो वा **केचन** मीमांस-काः शैवादयः । **कर्म** अग्निहोत्रादिकं । **कुर्वते** । **भवान्** **पुनः** शीतलतीर्थकरदेवः । **जन्मजराजिहासया** जन्म च जरा च , तयोर्जिहासा त्यक्तुमिच्छा , तया । **त्रयीं प्रवृत्तिं** सम्य-ग्दर्शनज्ञानचारित्रलक्षणामप्रशस्तमनोवाक्कायलक्षणां वा **अवारुणद्** निरुद्धवान् । कथम्भूतः ? **समधीः** सर्वप्राणिषु तुल्योपकारकत्वेन प्रवृत्ता धीर्बुद्धिर्यस्य सः ।

**मराठी अर्थः—कित्येक मीमांसक व शैवादिक लोक मुलगा, बायको, द्रव्य, इत्यादि या लोकीं मिळणाऱ्या पदार्थांच्या इच्छेनें व स्वर्ग मिळावा या इच्छेनें यज्ञ वगैरे निंद्य कर्में करतात. परंतु हे जिनेश शीतलनाथ ! आपण ऐहलौकिक व पारलौकिक पदार्थांच्या अभिलाषेचा बिलकुल त्याग करून, संसारास कारण अशा जन्म व जरा—ह्मातारपण यांचा नाश करण्याच्या इच्छेनें मन, शरीर व वाणी यांची अशुभ प्रवृत्ति रोकली. व रत्नत्रयास धारण केलें. तसेंच रागद्वेषांचा बीमोड करून आपण सर्वदा सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं समताबुद्धिउपेक्षाबुद्धि धारण केली. यास्तव आपणच श्रेष्ठ आहात.**

भावार्थः—मीमांसकांनीं, यज्ञ केल्यानें सर्व तऱ्हेचें ऐश्वर्य मिळतें, असा उपदेश केला आहे.

यज्ञार्थं पशवः सृष्टाः स्वयमेव स्वयम्भुवा ।
यज्ञो हि भूत्यै सर्वेषां तस्माद्यज्ञे वधोऽवधः ॥

असेंही त्यांनीं ह्मटलें आहे. ब्रह्मदेवानें, मनुष्यांनीं यज्ञ करावा ह्मणून, स्वतः पशु उत्पन्न केले आहेत. यज्ञ केल्यानें मनुष्याचें कल्याण होतें. यास्तव यज्ञामध्यें पशूंना मारलें असतां त्यापासून हिंसा होत नाहीं. परंतु हें त्यांचें ह्मणणें योग्य नाहीं. हिंसेपासून केव्हांही धर्म साधन होत नाहीं. हिंसा करण्यानें जर धर्मसाधन होईल तर पारधी मासे पकडणारे, व शिकार करणाऱ्या लोकांना धर्म साधन चांगल्या प्रकारें घडत असेल. व 'अहिंसा लक्षणोधर्मः' 'दया प्राण्यनु कम्पनम्' इत्यादि वचनें असत्य समजावीं लागतील.

आतां यज्ञामध्यें पशु हिंसा केल्यास तिच्यापासून पातक लागत नाहीं परंतु ती अन्य ठिकाणीं केली ह्मणजे पातक लागतें व यज्ञामध्यें केली असतां पुण्य मिळतें असेंही ह्मणणें योग्य नाहीं. तुह्मी कोठेंही पशु वध करा त्यापासून पातक हें लागणारच. जर यज्ञाकरितांच पशूंना विधात्यानें निर्माण केलें आहे तर ते विकत घेणें किंवा विकणें यापासून पातक लागेल. जसें लेप करण्यासाठीं जें औषध दिलें आहे तें आपण खाल्लें असतां भलताच परिणाम घडतो. यासाठीं ज्या वस्तूचा ज्या कार्यांत उपयोग करावयाचा आहे तेथें तिचा उपयोग न करतां अन्यत्र केल्यास तें दोषावह होतें. यासाठीं पशु विक्रय करणें पापास कारण होईल.

आतां जसें विष मंत्रसंस्कारानें निर्विष केल्यास त्यापासून अपाय घडत नाहीं तसेंच मंत्रसंस्कारपूर्वक पशुवध केल्यास

पातक लागत नाहीं हें ह्मणणेंही अनुचित आहे. केवळ मंत्रांनींच यज्ञामध्यें पशु मारले जात असतील तर मंत्रांचें असें सामर्थ्य आहे असें मानावें लागेल. परंतु दोरखंडानें तुह्मीं त्यांना बांधता व त्यांना बुक्कयाचा मार देऊन प्राण घेतां हें प्रत्यक्ष दिसतें. यामुळें हेंही तुमचें ह्मणणें असत्य आहे. जसें शस्त्रादिकांनीं पशूंना मारणाऱ्या मनुष्यांना अशुभ परिणामामुळें पातक लागतें; तसेंच मंत्रांनीं जरी पशूंना मारलें तरी देखील दुष्कर्माचा बन्ध होणारच, ह्मणून हिंसा ही धर्मसाधन नाहीं. हें सिद्ध झालें. यासाठीं अशा कृत्यापासून इह परलोकीं इष्ट पदार्थांची प्राप्ति न होतां नरकादि दुःखें भोगावीं लागतात. ह्मणूनच शीतल तीर्थकरांनीं रत्नत्रयाची प्राप्ति करून घेतली. अशुभ परिणामाचा त्याग केला. त्यांनीं संसारिक सुखाच्या अभिलाषानें तपश्चरण केलें नाहीं. यावरून मीमांसकादिकांमध्यें व श्री जिनेश्वरामध्यें किती अन्तर आहे हें दिसून येतें.

ननु भगवता तुल्या हरिहरादयोऽपि भविष्यंतीत्याशंक्याह ।

श्रीजिनेश्वरासारखेच हरिहरादिक आहेत त्यांचेमध्यें कांहीं फरक नाहीं या शंकेचें निरसन आचार्य करतात.

त्वमुत्तमज्योतिरजः क निर्वृतः,
क ते परे बुद्धिलवोद्धवक्षताः ।
ततः स्वनिःश्रेयसभावनापरै-
र्बुधप्रवेकैर्जिन शीतलेड्यसे ॥५०॥

त्वमित्यादि । त्वं भगवान् उत्तमज्योतिरुत्तमं उत्कृष्टं परमातिशयप्राप्तं ज्योतिर्ज्ञानं यस्य । पुनरपि कथम्भूतः ? अजः न जायते इत्यजः अपुनर्भवः संसारातीतः निर्वृतः सुखीभूतः क ते प्रसिद्धा

हरिहरहिरण्यगर्भादयः । परे भवतोऽन्ये क्व ? उभयत्र क इत्यनेन महदंतरं सूच्यते । किंविशिष्टास्ते ? बुद्धिलवोद्धवक्षताः, बुद्धेः सकलविषयग्राह्या लवो लेशः तेन उद्धवो गर्वो दर्पस्तेन क्षता नाशिताः संसारसरित्क्लेशपातिताः । यत एवं ततस्तस्मात्कारणात्त्वनिःश्रेयसभावनापरैः स्वस्यात्मनो निःश्रेयसं निर्वाणं तस्य भावना रत्नत्रयाभ्यासः तस्याः परास्तन्निष्ठास्तैः । इत्थम्भूतैः बुधप्रवेकैः बुधानां प्रवेकाः श्रेष्ठाः प्रधाना गणधरदेवादयस्तैः । हे जिन कर्मारिविनाशक । शीतल शीतलाभिधान ईड्यसे ।

मराठी अर्थः--हे जिनेश शीतलनाथ ! आपलें ज्ञान परम सीमेला जाऊन पोहोचलें आहे, व पुनर्जन्म घ्यावा लागणार नाहीं अशा स्थितीस आपण जाऊन पोहचला आहात अर्थात् आपण संसारातीत झालात तसेंच आपण पूर्ण सुखी झाला आहात. तेव्हां परमज्ञानी संसारातीत व सुखसागर असे आपण कोणीकडे व थोड्याशा ज्ञानानें फुरंगटलेले व ह्मणूनच भवनदींत गटंकळ्या खाणारे असे ब्रह्मा विष्णु व महेश हे कोणीकडे ! हे जिनेश ! आपल्यामध्यें व या अहंमन्य कुदेवामध्यें जमीन अस्मानाचें अंतर आहे. यास्तव आत्म्यास मोक्षप्राप्ति करून देणाऱ्या रत्नत्रयाचा अभ्यास करण्यांत तयार असलेल्या विद्वच्छ्रेष्ठ गणधरांनीं आपण नेहमीं स्तविलें जाता.

तात्पर्य—या श्लोकांत हरिहरादिकांना 'बुद्धिलवोद्धवक्षताः' हें विशेषण दिलें आहे याचा अर्थही व्यक्त केला आहे. परंतु येथें हें विशेष समजावयाचें कीं, ज्यास ज्ञान नाहीं अशा व्यक्तीस परिश्रमानें कोणताही विषय समजाऊन सांगितला तर त्याला तो पटतो. व ज्याला थोडें ज्यास्ती ज्ञान झालें आहे अशा मनुष्यास तर फारच लौकर समजाऊन सांगतां येतें. परंतु थोड्याशा ज्ञानानें गर्विष्ठ बनलेल्या मनुष्यास आपण

मोठे ज्ञानी आहोंत असें समजणाऱ्या मनुष्यास केवली देखील समजावण्यास समर्थ नाहींत. याचें कारण हें कीं, एकदा दुराग्रहानें अंतःकरणामध्यें ठाणें बसविलें ह्मणजे मग तो तेथून हलणें फार मुष्किलीचें होऊन बसतें व या दुराग्रहामुळेंच आपल्याला या संसारांत भटकत फिरावें लागतें. दुराग्रही अशा ब्रह्मा, विष्णु, महेशांनीं स्थापिलेल्या मतास हें कल्याण करणारें मत आहे असें समजून त्याच्या भजनीं लागणारीं माणसें देखील ब्रह्मा, विष्णु, महेशाप्रमाणेंच दीर्घ संसारी बनतात. यास्तव भव्य असे विद्वज्जन, हेजिनेश! शीतलनाथ आपल्या मताचा अंगीकार करून मोक्षाला फार जवळ करतात. व मोक्षप्राप्ती होईपर्यंत ते आपलीच आराधना करतात.

याप्रमाणें श्री शीतलनाथ जिनाचें स्तोत्र संपलें.

---

अथ श्री श्रेयोजिनस्तोत्रम् ।

श्रेयान् जिनः श्रेयसि वर्त्मनीमाः,
श्रेयः प्रजाः शासदजेयवाक्यः ।
भवाँश्चकाशे भुवनत्रयेस्मि-
न्नेको यथा वीतघनो विवस्वान् ॥५१॥

**श्रेयानित्यादि** । **श्रेयानिति** संज्ञेयमेकादशतीर्थकरदेवस्य । कथम्भूतोऽसौ ? **जिनः** सकलकषायेन्द्रियजयनाज्जिनः । स किं कृतवान् ? **चकासे** दीप्तवान् । क्व ? **भुवनत्रयेऽस्मिन्** अस्मिन्नागमादिप्रमाणप्रसिद्धे भुवनत्रये त्रैलोक्ये । किं कुर्वन् ? **शासदनु**शासन्नियोजयन् । किं तत् ? **श्रेयः** धर्मं । काः ? **इमाः प्रजाः** । अथवा काः शासत् ? इमाः श्रेयःप्रजाः इमाः प्रतीयमानाः श्रेयःप्रजाः भव्यज-

नान् ! क ? **वर्त्मनि** मार्गे । किंविशिष्टे ? **श्रेयसि** निःश्रेयसनिमित्त अतिशयेन प्रशस्ते मोक्षमार्गे इत्यर्थः । कथम्भूतः ? **भवान् अजेयवाक्यः** अजेये अबाध्यं वाक्यं यस्य । अत्र दृष्टांतमाह--एक इत्यादि । **एकोऽ**सहायो । **यथा** यद्वत् । वीतघनो विशेषण इता गता नष्टा मेवा यस्य । **विवस्वान**।दित्यः अयमत्र तात्पर्यः । यथा विगतमेघपटलावरण आदित्यः प्रतिहततमोनिकरोऽनुपहतचक्षुष्मतीनां श्रेयःप्रजानां एकोभिप्रेतस्थानप्राप्तिनिमित्तसन्मार्गमुपदिशन् राजते जगति तथा भगवानप्रतिहतवाक्यविशेषो मोक्षमार्गमिति ॥

**मराठी अर्थः**—जसें सूर्य सर्व मेघांना दूर सारून व अंधकाराचा नाश करून सर्व डोळस प्राण्यांना इष्टस्थळीं नेऊन पोंहोंचवितो सन्मार्ग दाखवितो त्यामुळें तो फारच शोभू लागतो. तद्वत् संपूर्ण कषाय व इंद्रियें यांचें पूर्ण दमन करणाऱ्या श्री श्रेयांसतीर्थंकरांनीं त्रिकालाबाधित सत्य अशा वचनांनीं त्रैलोक्यांतील सर्व भव्य जीवांना सत्य जिनधर्माचा उपदेश करून मोक्षामार्गामध्यें रत्नत्रयांत दृढ केलें. अर्थात् मोक्षमार्ग दाखऊन दिला यामुळें त्यांना फारच शोभा प्राप्त झाली.

कथमसौ तं शासदित्याह ।

श्री श्रेयान् जिनेश्वरांनीं प्रजेला कसा उपदेश केला हें सांगतात.

विधिर्विषक्तप्रतिषेधरूपः,
प्रमाणमत्रान्यतरत्प्रधानम् ।
गुणोऽपरो मुख्यनियामहेतु-
र्नयः स दृष्टान्तसमर्थनस्ते ॥५२॥

**विधिरि**त्यादि । विधिः स्वरूपादिचतुष्टयेनास्तित्वं । कथम्भूतः ? **विषक्तप्रतिषेधरूपः** विषक्तं कथंचित्तादात्म्येन संबद्धं, प्रतिषेधस्य पर-

रूपेण नास्तित्वस्य रूपं यत्र तथाभूतः। **प्रमाण** प्रमाणविषयत्वात्, सकलादेशः प्रमाणाधीन इत्यभिधानात्। इदानीं नयस्वरूपं प्रदर्शयन्नन्वयाद्याह। **अत्र** अनयोर्विधिप्रतिषेधयोर्मध्ये**ऽन्यतरत्** विधिरूपं प्रतिषेधरूपं वा **प्रधानं** वक्त्रभिप्रायवशात् न पुनः स्वरूपतः सर्वदा तद्भावप्रसंगात्। **गुणोऽ**प्रधानभूतो**ऽपरो**ऽन्यः। स कथम्भूतः? **मुख्यनियामहेतुः**, मुख्यस्य प्रधानस्य विधेः प्रतिषेधस्य वा नियामः स्वरूपादिचतुष्टयेनैव विधिः, पररूपादिचतुष्टयेनैव च प्रतिषेधः, ' इति योऽयं नियमस्तस्य हेतुर्निमित्तं **नयो** नयविषयत्वात्, विकलादेशो नय वीन इति वचनात्। कथम्भूतो साविल्याह--स दृष्टान्त समर्थन इति। **स** नयो नयविषयः स्वरूपचतुष्टयादिना अस्तित्वादि-**दृष्टान्तसमर्थनो** दृष्टान्ते समर्थनं परंप्रति स्वरूपनिरूपणं यस्य, दृष्टान्तस्य वा समर्थनमसाधारणस्वरूपनिरूपणंयेनासौ दृष्टान्तसमर्थनः ॥

**मराठी अर्थः—स्वरूप चतुष्टयाच्या अपेक्षेनें पदार्थाचें**

---

**टीपः**—नास्तित्व विशिष्ट अस्तित्वास प्रमाण ज्ञान ह्मटलें आहे तें विषयामध्यें विषयींचा उपचार केल्यामुळें आचार्यांनीं तसें ह्मटलें आहे. विषय ह्मणजे पदार्थ किंवा त्यांतील धर्म व विषयी ह्मणजे पदार्थास किंवा त्यांतील धर्मास जाणणारें ज्ञान. परन्तु या ठिकाणीं विषयासच विषयी असें ह्मटलें आहे. हें आचार्यांचें ह्मणणें अयोग्य नाहीं. अशा तऱ्हेचे प्रयोग पुष्कळ ठिकाणीं पूर्वाचार्यांनीं केलेले आढळतात. कार्यामध्यें कारणोपचाराचें उदाहरण ' घृतमायुः ' ' अन्नंवै प्राणाः ' या वाक्यांत कारणामध्यें कार्योपचार केला आहे. तूप हें आयुष्य व.दविण्यास कारण आहे परंतु तूप आयुष्यच आहे असें ह्मणणें. अन्न जगण्यास कारण आहे. त्याच्या योगें आपले प्राण वाचतात परंतु अन्नासच प्राण असें ह्मणणें. पलंगावर बसलेला मनुष्य गात असेल तर पलंग गात आहे असें ह्मणणें येथें तात्स्थ्यात्तच्छब्दोपचार आहे, साहचर्योपचाराचें उदाहरण ज्याच्या हातांत काठी आहे अशा मनुष्यास काठी असें ह्मणणें. टांगेवाल्यास टांगा ह्मणणें इत्यादि )

जें अस्तित्व असतें तें हमेशा पररूपचतुष्टयाच्या अपेक्षेनें नास्तित्व धर्माशीं कथंचित्तादात्म्य सम्बन्धानें जोडलेलें असतें. यास्तव नास्तित्वानें जोडलेल्या अस्तित्वास प्रमाण म्हणतात। प्रमाण नास्तित्व व अस्तित्व या उभयतांस जाणतें.

पदार्थांतील सर्व धर्मांचें वर्णन प्रमाणज्ञान करतें; कारण 'सकलादेशः प्रमाणाधीनः' असें म्हटलें आहे. अस्तित्व व नास्तित्व या दोहोंपैकीं कोणतें तरी मुख्य व गौण होतें त्यास नय असें म्हणतात.

वस्तूमध्यें अस्तित्व व नास्तित्व हे दोन धर्म आहेत त्यापैकीं एक धर्म मुख्य व दुसरा गौण असतो असें समजू नये. तसें असतें तर जो धर्म मुख्य मानला जातो तो हमेशाच तसाच मानला जाईल व गौण धर्म हमेशा गौणच मानला जाईल. परंतु असें मानलें नाहीं. धर्मामध्यें अमुक गौण व अमुक मुख्य अशी जी कल्पना होते ती वक्त्याच्या अभिप्रायानें असते. वक्ता ज्या धर्माचें वर्णन करतो त्यास मुख्यता प्राप्त होते व इतर धर्म गौण होतात. परंतु गौण धर्म मुख्य धर्मांचें निग्रमन करण्यास कारण आहे. याप्रमाणें हें नयाचें स्वरूप समजावें. हें नय घटादि दृष्टांताचें समर्थन करीत असतात. दृष्टांतातील असाधारण स्वरूपाचें वर्णन नयानें करता येतें. याप्रमाणें नय व प्रमाण यांचें या श्लोकांत स्वरूप वर्णन आचार्यांनीं केलें आहे.

१ विशेष विवरण—वस्तूंतील सर्व अंशांना जाणणारें जें ज्ञान त्यास प्रमाण ज्ञान म्हणतात. व वस्तूंतील एका अंशाचें–धर्माचें जें ज्ञान होतें त्यास नय असें म्हटलें आहे. ज्ञानामध्यें

---

टीपः-येथेंही विषयामध्यें विषयीचा उपचार केला आहे. कारण नय हा ज्ञानस्वरूपी आहे व अस्तित्व व नास्तित्व हे पदार्थ धर्म अर्थात् विषय आहेत.

पदार्थांना हीनाधिक रीतीनें जाणण्याच्या शक्तिमुळेंच नय व प्रमाण असे भेद झाले आहेत. नय ज्ञानामध्यें कमी विशुद्धि असते म्हणून पदार्थांच्या सर्व अंशांना तें जाणीत नाहीं. परंतु प्रमाण ज्ञानामध्यें विशुद्धि जास्ती असते यामुळें तें ज्ञान पदार्थांच्या सर्व अंशांना जाणतें. २ नय ज्ञानानें जाणलेला जो पदार्थाचा अंश त्यास वस्तुही म्हणता येत नाहीं व अवस्तुही म्हणता येत नाहीं परंतु त्यास वस्त्वंश असें आपण म्हणू शकतो. जसें समुद्राच्या एका हिश्याला समुद्र म्हणतां येत नाहीं. जर त्यास आपण समुद्र म्हणूं तर जितके समुद्राचे हिस्से होतील त्या सर्वांस समुद्र म्हणावें लागेल. व अशा रीतीनें पुष्कळ समुद्र होतील. व तेवढ्याच भागाला समुद्र म्हटलें तर बाकीच्या सर्व भागांना असमुद्र म्हणावें लागेल. वास्तव समुद्राचा एक भाग समुद्रही नाहीं व असमुद्रही नाहीं परंतु तो समुद्राचा अंश आहे असें आपण म्हणूं शकतो.

प्रमाणाहून नय भिन्न असल्यामुळें त्यास अप्रमाण म्हटल्यास काय हरकत आहे? असें म्हणणें ही योग्य नाहीं. तसें मानल्यास मिथ्या ज्ञानास जसें अप्रमाण आपण म्हणतो व त्यामुळें त्यास खरेपणा असत नाहीं. याचप्रमाणें नयज्ञानासही खरेपणा येणार नाहीं. परन्तु नयज्ञान हें खरें आहे. नयज्ञान हें प्रमाणही नाहीं व अप्रमाणही नाहीं. परन्तु प्रमाणज्ञानाचा एक हिस्सा आहे. येथेंही समुद्रांशाचें उदाहरण योजिलें म्हणजे नयाचें स्वरूप चांगलें ध्यानांत येतें. तें नयज्ञान प्रमाणज्ञानाचा एकदेश आहे असें सांगितलें. परन्तु तो एकदेश प्रमाणज्ञानापासून सर्वथा भिन्न मानला असतां तर त्यास अप्रमाणता आली असती. किंवा प्रमाणज्ञानापासून त्यास सर्वथा अभिन्न मानलें असतें तर त्यास प्रमाण मानावें लागलें असते.

प्रमाणापासून नय कथंचित् भिन्न असल्यामुळें त्यास आपण कथंचित् अप्रमाण ह्मणूं शकूं व कथंचित् अभिन्न असल्यामुळें त्यास प्रमाणही ह्मणूं शकूं. परन्तु त्यांस सर्वथा प्रमाण किंवा सर्वथा अप्रमाण ह्मणता येत नाहीं. येथेंही समुद्रैकदेशाचें उदाहरण लागूं पडतें.

आतां आपण प्रमाणज्ञानाविषयीं थोडासा विचार करूं. प्रमाणज्ञानामध्यें वस्तूचें सर्व स्वरूप जाणण्याची शक्ति आहे. परन्तु प्रमाणात्मक किंवा नयात्मक ज्ञान उत्पन्न होण्यास शब्दच साधन आहे. कारण शब्दामध्यें पदार्थाच्या स्वरूपाचें ज्ञान करून देण्याची शक्ति आहे. परन्तु शब्दामध्यें पदार्थाचें सर्व स्वरूप वर्णन करण्याची शक्ति नाहीं. एक शब्द एकाच पदार्थाचा वाचक असतो. एकाशब्दाचे अनेक वाच्य नसतात. सत् हा शब्द सत्पदार्थाचा वाचक आहे. असत्पदार्थ त्याचा विषय होणार नाहीं. असत् हा शब्द सत्पदार्थाचा वाचक होत नाहीं. जर सत् हा शब्द असत् पदार्थाचा वाचक व असत् हा शब्द सत्पदार्थाचा वाचक मानला जाईल तर प्रत्येक शब्दाचे नियत वाच्य होणार नाहींत कोणत्याही शब्दानें कोणत्याही पदार्थाचा बोध होऊं लागेल व संशय उत्पन्न होऊन घोटाळा माजेल. कित्येक शब्दांचे पुष्कळ अर्थ असतात. जसे गो या शब्दाचे दिशा वाणी, पृथ्वी, गाय वगैरे. तेव्हां एका शब्दाचा एकच अर्थ असतो हें कसें ? असा मनामध्यें संशय उत्पन्न होतो. परन्तु वास्तविक कोणत्याच शब्दाचे अनेक अर्थ नसतात. गो या शब्दाचे देखील अनेक अर्थ नाहींत. ज्या गो शब्दाचा अर्थ दिशा असा होतो व ज्या गो शब्दाचा अर्थ वाणी, पृथ्वी, गाय असा होतो ते सर्व गोशब्द निरानिराळेच आहेत. आपणांस सादृश्यामुळें एकाच गोशब्दाचे हे सर्व अर्थ आहेत असें वाटतें.

यावरून शब्दाचे अनेक अर्थ होत नसतात हें सिद्ध झालें. जर शब्दाचे अनेक अर्थ झाले असते तर भिन्न भिन्न पदार्थांस ओळखण्यास भिन्न भिन्न शब्दांचा व्यवहार करण्यास आम्हांस जरूर पडली नसती. एका शब्दानें जगांतील सर्व पदार्थांचें स्वरूप लक्ष्यांत आलें असते. शब्दामध्यें भिन्नता असल्यामुळें अर्थामध्यें भिन्नता मानली पाहिजे. जसें एका इंद्राला शक्र, पुरंदर अशा भिन्न शब्दांनें आपण जाणतो त्या अर्थी शक्र शब्दाचा वाच्यार्थ दुसराच आहे; व पुरंदर शब्दाचाही वाच्यार्थ दुसराच आहे. इंद्राच्या भिन्नभिन्न शक्तींचे वाचक हे शब्द आहेत. तसेंच अर्थभिन्नता दिसून आल्यामुळें शब्दभिन्नता देखील जरूर मानली पाहिजे. अन्यथा वाच्यवाचकनियमाचा लोप होण्याचा प्रसंग येईल. शब्दांचे अनेक अर्थ नसल्यामुळें शब्द समूहापासून बनलेल्या वाक्याचेही अनेक अर्थ होत नाहींत. एवढ्या विवेचनावरून शब्दामध्यें एकावेळेस एकाच पदार्थाचें प्रतिपादन करण्याची शक्ति आहे अनेक पदार्थांचें वर्णन करण्याची शक्ति नाहीं हें सिद्ध होतें.

सेना, वन, गांव इत्यादि शब्दांचे देखील अनेक अर्थ होत नाहीं. हत्ती घोडा, रथ पायदळ यांचा जो एक समूह यासच सेना असें ह्मणतात. वन ह्मणजे नानातऱ्हेच्या झाडांचा जो एक समूह यासच वन ह्मणतात. पुष्कळ घरांचा जो एक समूह यासच गांव असें ह्मणतात. याचप्रमाणें पंक्ति माला कळप इत्यादि शब्दांचे अनेक अनेक अर्थ नाहीं हें सिद्ध होतें. (१)

**टीपः**—(१) ' अनेकमेकंच पदस्य वाच्यं वृक्षा इति प्रत्ययवत्प्रकृत्याः ' या श्लोकाच्या दोन चरणामध्यें शब्दाचे एक व अनेक देखील वाच्य असतात असें याच ग्रन्थकारानें पुष्पदन्त जिनाच्या स्तोत्रामध्यें ह्मटलें आहे. वरें तर प्रत्येक शब्दांचा वाच्य एकच असतो

अनेक नसतो असें ह्मटलें आहे. यामुळें येथें संशय व विरोधही उत्पन्न होतो. वास्तव शब्दांचा एकच वाच्यार्थ मानूं नये असे शंकाकार ह्मणतो. त्यास आपण असें विचारूं या. ' शब्दाचे एक व अनेक वाच्यार्थ असतात असें जें आपलें ह्मणणें आहे ' त्यांत शब्दांचे एक व अनेक वाच्यार्थ एकदम प्रधानपणानें असतात किंवा गौण व मुख्यपणानें असतात. ? मुख्यपणानेंच शब्दांचे एक व अनेक वाच्यार्थ असतात हें ह्मणणें अयोग्य आहे. कारण, तशी प्रतीति–तसा अनुभव बिलकुल येत नाहीं. वृक्ष हा शब्द प्रथमतः वृक्षत्व जातीच्या द्वारें वृक्षपदार्थाचा वाचक आहे तदनन्तर तो लिङ्ग व संख्या यांचा बोधक आहे. यावरून प्रधानपणानें वृक्षपदार्थाचा वाचक वृक्ष हा शब्द आहे. व बहुत्व संख्येचा बोध गौण रीतीनें होतो. संपूर्ण शब्दांचा मुख्य गौण अर्थ अवश्य असतो. व पदार्थामध्येंही वक्त्याच्या इच्छेला अनुसरून गौणप्रधानभाव होत असलेला आपल्या दृष्टीस प्रत्यहीं पडत असतो.

शब्दामध्यें प्रधान रीतीनें व गौणपणानें वाच्यार्थाचा बोध करण्याचा स्वभाव आपण मानला हें एवढ्या विवेचनावरून ठरतें. परन्तु या शब्दांच्या योगें संपूर्णपणें वस्तूंतील सर्व धर्मांचें ज्ञान मुख्यपणें होणार नाहीं, गौणपणें व मुख्यपणानेंच सर्व धर्मात्मक वस्तूस ते शब्द द्योतित करतील. यामुळें शब्दानें प्रमाणात्मक ज्ञान अह्मास केव्हांच होणार नाहीं. हमेशा नयात्मकच ज्ञान होईल. प्रमाणज्ञान होण्यास मार्गच उरला नाहीं. असें कित्येक ह्मणतील, परन्तु त्यांचें ह्मणणें कां अयोग्य आहे व प्रमाणज्ञान कसें होतें याचें स्वरूप याप्रमाणें समजावें.

" **एकगुणमुखेनाशेषवस्तुरूपसंग्रहात्सकलादेशः** ' पदार्थांतील एका कोणत्या तरी गुणाला मुख्य समजून त्याचें द्वारें संपूर्ण वस्तुधर्मांचा संग्रह करणें यास सकलादेश ह्मणतात व हा सकलादेश प्रमाणज्ञानाच्या अधीन आहे. द्रव्यार्थिक दृष्टीनें गुण हे गुणिपासून–द्रव्यापासून अभिन्न आहेत. वास्तव अभेद समजून एक गुणाच्याद्वारें संपूर्ण

धर्मात्मक वस्तूचें वर्णन शब्दद्वारें होऊं शकतें. पर्यायदृष्टीनें पाहिल्यास वस्तूंतील सगळे गुण परस्परापासून भिन्न आहेत तथापि त्यांच्यामध्यें एकत्वाचा आरोप करून अभेदोपचारानें आल्यास शब्दद्वारें वस्तूचें संपूर्ण स्वरूप वर्णन करतां येते. द्रव्यार्थिकनयानें अनंत पर्यायांना धारण करणारें द्रव्य हें एकच आहे असें वर्णन करणारें प्रमाणवाक्य एकच द्रव्यपदार्थास त्यानें विषय केल्यामुळें अनेक अर्थाचें तें वाचक होऊं शकत नाहीं. पर्यायनयाच्या अपेक्षेनें संपूर्ण पर्याय भिन्न असतांही त्यांच्यांत अभेदकल्पना केल्यानें एकत्व आलें. यामुळें, एकच वस्तु पर्यायार्थिक नयाच्या दृष्टीनें देखील प्रमाणवाक्याचा विषय झाली. यावरून शब्द जसें अनेक अर्थाचे वाचक प्रधानपणें नसतात तसेंच वाक्य देखील मुख्यत्वें करून अनेक अर्थाचे वाचक होत नाहीं हें सिद्ध झालें. व प्रमाण वाक्यानें प्रमाण ज्ञान होतें हेंही सिद्ध झालें.

वर प्रमाणाचें लक्षण सांगितलें आहे. त्यांत अभेदोपचार व अभेदवृत्ति यांच्या आश्रयानें शब्द वस्तूचें सर्व स्वरूप वर्णन करतो असें म्हटलें आहे. परंतु ही अभेदकल्पना ज्याच्या आश्रयानें होते त्याचें थोडक्यांत स्वरूप वर्णन केल्यानें प्रमाणाचें स्वरूप चांगलें लक्षांत येईल.

काल, आत्मरूप, अर्थ, संबंध, उपकार, गुणिदेश, संसर्ग, व शब्द यांच्या योगें प्रमाणाचें स्वरूप ध्यानांत येतें तें असें—

कथंचित् जीवादि वस्तु आहेतच. या वाक्यांत, ज्यावेळेस अस्तित्व धर्म जीवादि पदार्थामध्यें आहे त्याचवेळेस बाकीचे अनंत धर्म देखील त्या जीवादि पदार्थांत आहेत, म्हणून एका कालाच्या आश्रयानें त्या अनंत धर्मांची अभिन्नता आहे ही कालाच्या आश्रयानें अभिन्नता झाली. २ अस्तित्व गुण जसा जीवाचें आत्मस्वरूप आहे तसेंच अन्य अनंत गुण देखील जीवाचेंच स्वरूप आहे. तेव्हां या आत्मस्वरूपाच्या दृष्टीनें सर्व गुणामध्यें अभेद सिद्ध होतो ३ जीवद्रव्यरूप अर्थ जसा अस्तित्व

गुणाचा आधार आहे तसाच तो पदार्थ अन्य अनंत गुणांचा देखील आधार आहे. यास्तव अर्थ—पदार्थ हा सर्व गुणांचा आधार असल्यामुळें अर्थाच्या दृष्टीनें देखील सर्व गुणामध्यें अभेदवृत्ति होऊं शकते. ४ जो अस्तित्व गुणाचा तादात्म्य संबंध जीवद्रव्याशीं आहे तोच तादात्म्य संबंध अनंत गुणांचा जीवद्रव्याशीं आहे यास्तव तादात्म्य सम्बन्धानें सर्व गुणांची जीव द्रव्याबरोबर अभेदवृत्ति होऊं शकते. ५ अस्तित्वगुण जसा जीवद्रव्यावर उपकार करितो तसा इतर अनन्तगुण देखील जीव द्रव्यावर उपकार करतात. यामुळें उपकाराच्या दृष्टीनें पाहिल्यास सर्व गुणामध्ये अभेद असलेला दिसून येईल. अस्तित्व गुण जीवद्रव्यावर उपकार करितो; याचा अर्थ काय, असा प्रश्न उपस्थित होणें साहाजिक आहे. याचें उत्तर असें समजावें कीं उपकार ह्मणजे आपल्या सत्तेच द्रव्यामध्यें ज्ञान करून देणें. जसें गाडगें तांबडें आहे. येथें गाडग्याला तांबडेपणानें तन्मय करून सोडलें व स्वतःचें ज्ञान त्यानें जाणणाऱ्याच्या मनामध्यें उत्पन्न केलें. हाच त्यानें गाडग्यावर उपकार केला. याचप्रमाणें अस्तित्वगुणानें जीवादि द्रव्याला आपल्या अस्तित्वानें जसें तन्मय करून सोडलें तसेंच नास्तित्वादि गुण देखील आपल्या सत्तेनें जीवादि द्रव्यांस तन्मय करून सोडतात अशा तऱ्हेच्या उपकाराचे दृष्टीनें सर्व गुणामध्यें आपणांस अभेदवृत्ति दाखविता येते.

६ द्रव्याच्या ज्या देशामध्यें—ज्या ठिकाणीं अस्तित्वगुण आहे त्याच ठिकाणीं नास्तित्वादिक धर्मही आहेत. द्रव्याच्या अमुक भागांत अस्तित्वधर्म व अमुक भागांत नास्तित्वधर्म राहतो असें नाहीं तर द्रव्याच्या सम्पूर्ण अवयवामध्यें संपूर्ण गुण आहेत व सर्व ठिकाणीं पूर्ण रीतीनें भरलेले आहेत. जसें एका वैद्यानें एकलक्ष वनस्पति आणून त्या कुटून सर्वांचें मिश्रण करून एक जीव केला व त्या मिश्रणाच्या गोळ्या बनविल्या. येथें प्रत्येक गोळीमध्यें एक लक्ष वनस्पतींचें मिश्रण जसें दिसून येईल याचप्रमाणें द्रव्याच्या प्रत्येक प्रदेशामध्यें संपूर्ण गुण पूर्ण

रीतीनें भरलेले आहेत. अमुक प्रदेशांत कांहीं गुण कमी किंवा अमुक प्रदेशामध्यें जास्ती गुण आहेत असा प्रकार मुळींच दिसून येणार नाहीं. द्रव्याच्या सर्व प्रदेशामध्यें सारख्या प्रमाणांत गुण भरलेले आहेत' ह्मणून गुणीच्या ज्या देशामध्यें एक गुण आहे त्याच देशामध्यें सर्व गुण आहेत. या दृष्टीनें अमेद येथें दिसून येतो ह्मणून यास गुणिदेशाभेद ह्मणतात.

७ अस्तित्वधर्माचा जीवद्रव्याशीं जसा संसर्ग आहे तसाच इतर धर्मांचा देखील जीवद्रव्याशीं संसर्ग आहे. ह्मणून एक संसर्गानें येथें अभेदवृत्ति दाखविली आहे. येथें सम्बन्ध व संसर्ग यामध्यें काय फरक आहे अशी योग्य शंका येणें साहजिक आहे. त्याचें उत्तर असें समजावें.

धर्म व धर्मि, गुण व गुणी यांचा जो संबंध त्यास कथंचित्तादात्म्य ह्मणतात. कथंचित् भेद व कथंचित् अभेद यास कथंचित्तादात्म्य ह्मणतात. ज्यावेळेसआपण कथंचित् भेदपक्षाचा आश्रय करतो त्यावेळेस 'धर्म व धर्मी, गुण व गुणी यांचा हा तादात्म्यसंबंध आहे असा भेद दाखविणाऱ्या विभक्तीचा–षष्ठीविभक्तीचा प्रयोग करतो. यामुळें आपणास गुण व गुणी यामध्यें भेदव्यवहार दाखवितां येतो. व ज्यावेळेस कथंचित् अभेदपक्षाचा आश्रय आपण करतो त्यावेळेस धर्म व धर्मी यांनाच आपण कथंचित्तादात्म्य असें ह्मणतो कथंचिद्भेदकल्पनेमध्यें आपणांस सर्वत्र धर्मच दिसून येतात. त्या सर्व धर्मांचा आधारभूत असा पदार्थ भेददृष्टीनें आपल्यास पाहतां येत नाहीं. सर्व गुणच आपल्याला दिसतील. परंतु त्या गुणांस धारण करणारें जीवादि द्रव्य आपणांस दिसणार नाहीं त्यावेळेस तें गौण राहील. व कथंचित् अभेदाची कल्पना मनांत उद्भवली ह्मणजे द्रव्य, धर्मी किंवा गुणी हींच दिसतील. त्यानांच प्रधानता प्राप्त होते. जीवादिद्रव्यांचे ज्ञानादिक गुण त्यावेळेस दिसणार नाहींत. धर्म व धर्मी या उभयतांस कथंचित् भे-

द्राभेद असें नांव आहे. कथंचितादात्म्य हें वस्तूचें स्वरूप आहे. तादात्म्य या शब्दाचा अर्थ असा करतात—तत् या शब्दाचा अर्थ 'वस्तु' असा होतो. व आत्मा ह्मणजे वस्तूचा स्वभाव, अर्थात् वस्तु भेदाभेदात्मक आहे असें 'तादात्म्य' हा शब्द आह्मांस सांगत असतो या तादात्म्याच्यामागें कथंचित् हा शब्द योजण्याचें कारण हें आहे कीं सर्वथा भेद किंवा सर्वथा अभेद हा परस्पर निरपेक्ष असतो त्यामुळें वस्तूंची सिद्धि होत नाहीं. भेद हा अभेदाची अपेक्षा करतो व अभेद हा भेदाची अपेक्षा करतो. हे हमेशा सापेक्ष असतात. केव्हांही अभेद आपणास भेदविरहित—भेदाची परवा न करणारा असा आढळून येणार नाहीं. तसेच भेद देखील अभेदाशिवाय आढळणार नाहीं. यावरून सर्वथा भेद किंवा अभेद मानल्यानें वस्तुसिद्धि होत नाहीं हें सिद्ध होतें. कथंचितादात्म्य किंवा कथंचिद्भेदाभेद हें वस्तूचें स्वरूप आहे, यावरून कथंचितादात्म्याचें स्वरूप ध्यानांत येतें. कथंचित्तादात्म्य संबंधामध्यें अभेद मुख्य असतो व भेद गौण असतो. संसर्गसंबंधामध्यें भेद मुख्य असतो व अभेद गौण असतो. हा दोहोंत फरक आहे. कथंचितादात्म्य ह्मणजे कथंचिद्भेदाभेद असणें. अभेदास मुख्य मानून भेदाची गौणता जेथें असतें त्यास संबंध ह्मणतात. व जेथें भेद मुख्य असून अभेदास गौणता असतें त्यास संसर्ग ह्मणतात.

८ जो अस्ति असा शब्द अस्तित्व धर्माला धारण करणाऱ्या वस्तूचा वाचक आहे तोच अस्ति हा शब्द अनंत धर्मांना धारण करणाऱ्या वस्तूचा देखील वाचक आहे. एक शब्दानें संपूर्ण धर्मांचें वर्णन करतां येतें ह्मणून शब्दानें देखील अभेदवृत्ति कशी दाखवितां येते हें सिद्ध झालें. पर्यायार्थिक नयास गौण करून व द्रव्यार्थिक नयाला मुख्यता देऊन वर वर्णिलेल्या आठ प्रकारांनीं अभेदवृत्तीचें वर्णन करतां येतें.

आतां याच वर वर्णिलेल्या आठ प्रकारांनीं वस्तूंतील भिन्न भिन्न गुणामध्यें अभेदोपचार कसा करतां येतो याचें वर्णन खालीं लिहिल्या-प्रमाणें समजावें—

द्रव्यार्थिक नयाला गौण करून आपण पर्यायार्थिक नयास प्रधान ना देतो त्यावेळेस ही अभेदवृत्ति गुणामध्यें संभवत नाहीं.

१ प्रथमतः कालानें अभेदवृत्ति गुणाची होत नाहीं हें पाहूं. वस्तू-मध्यें एकेकालीं परस्पर विरुद्ध नाना गुण राहूं शकत नाहींत. कारण प्रतिक्षणीं वस्तूमध्यें फरक होत असतो. जर परस्पर विरुद्ध गुण दे-खील एकेकालीं वस्तूमध्यें राहूं लागले तर गुण अनेक असल्यामुळें जसा त्यांच्यांत परस्पर भेद आहे तसाच त्या गुणांस आश्रय देणा-ऱ्यावस्तूचे देखील तेवढेच भेद–प्रकार होतील. येथें गुणाचा आश्रय असणाऱ्या वस्तूचें अनेक भेद कसें होतात असा प्रश्न उपस्थित होईल. परंतु याचें उत्तर असें आहे कीं या ठिकाणीं पर्यायनयासच प्राधान्य दिलें आहे व गुणांस पर्याय असेंही नांव आहे. कारण द्र-व्यार्थिक पर्यायार्थिक असें नयाचे दोनच भेद केले आहेत, तिसरा गुणार्थिक नय पूर्वाचार्यांनीं मानला नाहीं. यावरून गुणांस पर्याय असेंही ह्मणावयास कांहीं हरकत नाहीं. व गुणांसच मुख्यता दि-ल्यानें त्यांचा आधार ह्मणून द्रव्य आपणांस दिसत नाहीं व आधार मानल्यास गुणाएवढेंच त्या आधाराचे देखील भेद होतील. यास्तव का-लाच्या आश्रयानें नानागुणामध्यें अभेदवृत्ति होऊं शकत नाहीं.

२ आतां आत्मरूपानें ही अभेदवृत्ति होत नाहीं. प्रत्येक गुणाचें स्वरूप वेगळें आहे जें स्वरूप एका गुणाचें आहे तेंच स्वरूप दुसऱ्या गुणाचें नसतें. सर्व गुणाच्या स्वरूपामध्यें फरक नसतां तर गुणामध्यें नानापणा–भिन्नपणा दिसून आला असता काय ?

३ गुणांस आधारभूत पदार्थाचें देखील भिन्नत्व, व त्याचे अने-कत्व मानलें पाहिजे. कारण नाना गुणांचा आधार तो आधार असल्या-

मुळें एकटा पदार्थ त्या सर्व गुणाला कसा आधार देऊ शकेल? प्रत्येक गुणांची परिणति भिन्न भिन्न होत असल्यामुळे त्या आधारामध्ये त्या वस्तूमध्यें वैचित्र्य उत्पन्न झालेले असतें हें वैचित्र्य एक नसते. कारण वैचित्र्य व एक हे शब्द परस्पर विरुद्ध नाहींत काय ? यास्तव अर्थानें देखील अभेद वृत्ति संभवत नाहीं.

४ संबंधानें देखील अभेदवृत्ति संभवत नाहीं कारण संबंधी अनेक असल्यामुळें संबंधाचे देखील अनेक भेद होतात. जसें काठी व देवदत्त यांच्या संबंधाहून छत्र व देवदत्त यांचा संबंध वेगळा आहे. आपल्या शरीराचा हाताशीं जो संबंध आहे तो पायाचा शरीराशीं जो संबंध आहे त्याहून भिन्न आहे यावरून जितके संबंधी असतात, तेवढे संबंधाचे भेद होतात हें सिद्ध होतें.

५ अनेक गुणांनीं वस्तूवर केलेला उपकार एकच असत नाहीं. कारण प्रत्येक गुण वस्तूवर भिन्न भिन्न उपकार करीत असतो. उपकार करणारे अनेक असल्यामुळें उपकार एक कसा असूं शकेल ?

६ गुणिदेशानेंही अभेदवृत्ति सिद्ध होत नाहीं. गुणिदेशामध्यें देखील प्रत्येक गुणामुळें भेद मानला पाहिजे. गुणिदेशामध्यें तथापि अभेद मानला तर भिन्न पदार्थांतील गुणांच्या योगें देखील गुणिदेशामध्यें भेद होणार नाहीं. इतर गुणांनीं देखील गुणिदेशामध्यें अभिन्नता दिसूं लागेल हा दोष उत्पन्न होईल.

७ संसर्गामध्येंही अनेक संसर्गांच्या भेदानें भेद मानला पाहिजे. संसर्गामध्यें भेद न मानल्यास संसर्गिमध्यें अनेकपणा येणार नाहीं.

८ शब्दानें देखील अभेद वृत्ति सिद्ध होत नाहीं. पदार्थ भिन्न भिन्न असल्यामुळें शब्द देखील भिन्न भिन्न मानले पाहिजेत. पदार्थांत जितके गुण आहेत ते सर्व एका शब्दानें सांगितले जात नाहीं. जर सर्व गुणांचा प्रतिपादक एकच शब्द मानला तर संपूर्ण पदार्थ एकाच शब्दानें वर्णिले गेल्यामुळें जगांतून इतर शब्दांचा व्यवहार बिलकुल नाहींसा होईल.

याप्रमाणें या कालादिक आठ प्रकारांनीं अस्तित्वादिक गुणांची अभेदवृत्ति पर्यायार्थिक नयाच्या आश्रयानें संभवत नाहीं, ह्मणून भिन्न अशा या गुणांमध्यें अभेदोपचार केला ह्मणजे एका शब्दानेंही सर्व गुणांचें वर्णन होऊं शकतें. व यामुळें आपणास प्रभाण ज्ञान उत्पन्न होतें.

---

**याप्रमाणें प्रमाणज्ञान व नय ज्ञान यांचें स्वरूप थोडक्यांत वर्णन केलें आहे व या प्रमाण व नयामध्यें सप्तभंग होत असतात परंतु त्या सप्तभंगांचें वर्णन पुढें करूं.**

कस्य मते एवंविधो नय इत्याह ।

दृष्टान्ताचें समर्थन करणारा असा नय कोणाच्या मतामध्यें आहे असें विचारल्यावरून ग्रंथकार सांगतात.

विवक्षितो मुख्य इतीष्यतेऽन्यो,
गुणोविवक्षो न निरात्मकस्ते ।
तथारिमित्रानुभयादिशक्ति–
र्द्वयावधेः कार्यकरं हि वस्तु ॥५३॥

**विवक्षित** इत्यादि । वक्तुमिष्टो **विवक्षितो मुख्य इत्येवमिष्यते** । **अन्यो**ऽविवक्षितो वक्तुमनभिप्रेतो **गुणो**ऽप्रधानः अविवक्षाविषयतया ( अत्रनत्रसमासः ) युक्तः पदार्थः । **ते तव मते** । अनुदरा कन्येत्यादिवत्। ननु मुख्यगुणप्रकोरण किं क्वाप्यनेकधर्मसद्भावो दृष्टो येन नयविषयेषु तथा कल्प्यते इत्याह–तथेत्यादि । **तथा** तेन मुख्यगुणप्रकारेण एकमपि वस्तु । **अरिमित्रानुभयादिशक्ति** । अरिश्च मित्रं अनुभयं च तानि आदिर्यस्याः सा शक्तिर्यस्य तत् अरिमित्रानुभयादिशक्ति । तथा ह्येकोपि देवदत्तः कस्यचिदरिरनुपकारित्वात् । कस्यचिन्मित्रमुपकारित्वात् । अपरस्योभयमुपकारानुपकारकारित्वात् । अन्यस्य अनुभयं तं प्रत्युदासीनत्वात् इति । किं पुनर्मुख्यगुणरूपधर्मद्वयकल्पनया प्रयोजनमित्यत्राह–द्वये-

त्यादि । भावाभावरूपं द्रव्यपर्यायरूपं वा द्वयमवधिर्मर्यादा सर्वार्थानां, तस्मात्तदा धर्मद्वयमाश्रित्य कार्यकरं हि स्फुटं वस्तु घटादि ।

अर्थः—वक्ता ज्या धर्माचें वर्णन करण्याची इच्छा करतो तो धर्म वक्त्याकडून मुख्य मानला जातो. व वक्त्याला इष्ट नसलेला धर्म गौण होतो. तसेंच वस्तूमध्यें अनेक धर्म असतात ह्मणूनच वक्ता एकास मुख्यता व अन्य धर्मास गौण करीत असतो. वस्तूमध्यें अनेक धर्म कसे असतात हें सिद्ध करण्यासाठीं आपण एक उदाहरण घेऊं. देवदत्त हा एका मनुष्याचा शत्रु आहे. कारण, तो त्यास हमेशा त्रास देत असतो. तसेंच देवदत्त हा एका मनुष्याचा मित्र आहे. कारण, तो त्याच्यावर उपकार करीत असतो. तोच देवदत्त एका मनुष्याचा मित्र व शत्रु देखील आहे. व एका मनुष्याचा तो मित्रही नाहीं व शत्रुही नाहीं. तो त्या मनुष्याविषयीं हमेशा उदासीन असतो. आतां या उदाहरणांतील देवदत्तामध्यें जसें आपणांस अनेक स्वभाव दृष्टीस पडले, तद्वत्च वस्तूमध्येंही अनेक धर्म असतात. वस्तु भावाभावरूप असते, द्रव्यपर्यायरूप असते. ह्या दोन धर्मांच्या योगें वस्तु कार्यें करण्यास समर्थ होते. केवळ द्रव्य, पर्याय रहित कोणतें ही कार्य करूं शकत नाहीं, व केवळ पर्यायदेखील कोणतेंही कार्य करूं शकत नाहींत. कारण, केवळ द्रव्य ह्मणजे वस्तु नव्हे किंवा केवळ पर्याय ह्मणजेही वस्तु नव्हे. द्रव्य व पर्याय ही दोन अंगें वस्तुची आहेत. या दोन अंगांनीं वस्तु बनलेली आहे. व या दोन अंगांनीं युक्त असल्यामुळेंच वस्तूला वस्तुपणा आला आहे. वस्तु भावाभावस्वरूपी आहे. हे श्रेयांसनाथ जिनेश आपल्या मतामध्यें निःस्वभावी वस्तूच नाहीं. भाव व अभाव यांचें वर्णन मागें केलें आहे.

ननु दृष्टान्तसमर्थनं इत्ययुक्तं दृष्टान्तेन प्रयोजनाभावादित्याशंक्याह ।
नय हा दृष्टांताचें समर्थन करणारा असतो हें ह्मणणें अयोग्य आहे कारण, दृष्टांतानें प्रयोजनाची सिद्धि होत नाहीं असें ह्मणणाऱ्यास आचार्य उत्तर देतात.

दृष्टान्तसिद्धावुभयोर्विवादे,
साध्यं प्रसिद्ध्येन्न तु तादृगस्ति ।
यत्सर्वथैकान्तनियामदृष्टं,
त्वदीयदृष्टिर्विभवत्यशेषे ॥५४॥

**दृष्टान्तसिद्धा**वित्यादि । दृष्टान्तो निदर्शनमुदाहरणं, तस्य सिद्धौ निर्णीतौ **साध्यं** साधयितुमिष्टं. **प्रसिद्ध्येत्** । कयोः ? **उभयोः** वादिप्रतिवादिनोः। कस्मिन् ? **विवादे** विप्रतिपत्तौ । तर्ह्येकान्त एव दृष्टान्तो भविष्यतीत्यत्राह नेत्यादि । **नतु** नैव **तादृक्** तथाविधं दृष्टांतभूतं । **अस्ति** विद्यते वस्तु । यदुदाहरणं भूत्वा **सर्वथैकान्तनियामदृष्टं** सर्वथैकान्त एवास्तीति नियामकं दृष्टं प्रतीतं । कुतो न दृष्टमित्याह त्वदीयेत्यादि । त्वदीया चासौ दृष्टिश्च **त्वदीयदृष्टि**रनेकान्तात्मकं तव मतं । सा **विभवति** प्रभवति । क ? **अशेषे** साध्ये हेतौ दृष्टान्ते च । अनेकांतात्मकत्वेनाशेषं वस्तु व्याप्तमित्यर्थः ॥

**मराठी अर्थः**—नय दृष्टांताचें समर्थन करणारा असतो असें मागें सांगितलें आहे. दृष्टांत म्हणजे साध्य व साधन धर्म हे दोन्हीं जेथें सिद्ध झालेले आहेत तो होय. हा वादी व प्रतिवादी या उभयतांना मान्य असतो. वादी आपले साध्य सिद्ध करण्याकरितां दृष्टांताचा प्रयोग करीत असतो. जसें पर्वतावर अग्नि आहे हें सिद्ध करण्याकरितां प्रतिवाद्यास मान्य असलेला दृष्टांत देऊन वादी ह्या पर्वतावर अग्नि आहे असें सिद्ध करतो. स्वैपाकघरांत अग्नि आहे व तो तेथें धुरासहित दृष्टीस पडतो; याचप्रमाणें पर्वतावरही अग्नि व धूर अर्थात् साध्य व

साधन हीं आहेत यांची सिद्धि करण्याकरितां तो स्वैपाकघराचें उदाहरण देतो. कारण, तेथें पूर्वींच साध्य व साधन हीं सिद्ध होऊन चुकलेलीं आहेत. अशा तऱ्हेचें दृष्टान्त उभयतांना मान्य असलें ह्मणजे साध्याची सिद्धि होते. परंतु एकान्त वाद्याच्या मतामध्यें एकान्तात्मक वस्तूची सिद्धि करणारा दृष्टान्तच नाहीं. कारण, जितक्या वस्तु आपल्या दृष्टीस पडतात, त्या सर्व अनेकांत मताचेंच पोषण करीत असतात. अनेकांत ह्मणजे अनेक धर्म ज्यामध्यें आहेत असा पदार्थ. ' अनेके अन्ता यस्मिन्नसौ अनेकांतः ' अशी अनेकांत शब्दाची निरुक्ति आहे. पदार्थ जर एकधर्मात्मकच असतां तर एकांत दृष्टांत मिळाला असतां व त्यायोगें एकांत वादाची सिद्धि झाली असती. पदार्थामध्यें अनेक धर्म आहेत हें देवदत्ताचा दृष्टांत देऊन मागें सिद्ध केलें आहे. यास्तव हे जिनेश, तुझें अनेकांतात्मक मत सर्व वस्तूमध्ये व्याप्त झालें आहे. साध्य, साधन व दृष्टांत हीं अनेकांत मताची पुष्टी करतात. जसें–धूर अग्निची सिद्धि करण्यास साधन आहे परंतु सरोवरामध्यें पाणी आहे हें सिद्ध करण्यास धुरामध्यें साधनपणा नाही. यावरून धुरामध्ये साधनत्व व साधनत्वाभाव हे दोन धर्म आहेत हें सिद्ध होतें. पर्वतावर अग्नि सि[illegible] करावयाचा आहे अर्थात् पर्वतीय अग्निमध्यें साध्यत्व आहे परंतु ज्यावेळेस पर्वतावर अग्नि असला तरी आमची तेथें अग्नि आहे किंवा नाहीं हें सिद्ध करण्याची इच्छा नसते. त्यावेळेस तो अग्नि साध्यत्व धर्मास धारण करीत नाहीं. त्यावेळेस त्याच्या ठिकाणीं साध्यत्वाभाव नांवाचा धर्म आहे; असें आह्मी ह्मणूं शकतो. साध्याचें लक्षण माणिक्यनंदि आचार्यांनीं ' इष्टमबाधितमसिद्धं साध्यम् ' असे केलें आहे. सूत्रांत त्यांनीं ' इष्ट ' शब्द ठेवला आहे. त्याचा अर्थ वादीला जें इष्ट असतें तें तो साध्य

करीत असतो. ज्यावेळेस वादी उदासीन असेल त्यावेळेस तो अग्नि साध्य समजला जात नाहीं.

तसेंच दृष्टांत हा ज्या साध्यसिद्धिसाठीं देतात त्याच साध्याला त्या दृष्टांतापासून पुष्टि मिळतें व तोच दृष्टांत तेथें योग्य दिसतो. परंतु अन्यत्र देखील त्याच दृष्टांताची आपण योजना केल्यास दृष्टांतास विषमता येते व तो दृष्टांत त्या साध्यास पुष्टि आणूं शकत नाहीं. यावरून दृष्टान्तामध्यें देखील दृष्टांत व दृष्टांताभाव हे दोन धर्म आहेत हें सिध्द होतें. यावरून जगांतील सर्व पदार्थ अनेक धर्मांला धारण करतात हें सिद्ध होतें.

नन्वेकान्तप्रतिषेधे सिद्धे अनेकान्तात्मकत्वेनाशेषस्य वस्तुनो व्याप्तिः सिद्ध्येत्तत्प्रतिषेधश्च कैरित्याह ।

एकान्ताचा निषेध झाला असतां अनेकान्ताची सिद्धि होते. व त्यानें सर्व वस्तु व्याप्त झाल्या आहेत हें सिद्ध होईल. परन्तु एकान्ताचा निषेध कोणत्या साधनांनीं होईल हें विचारल्या वरून ग्रंथकार सांगतात.

एकांतदृष्टिप्रतिषेधसिद्धि—
न्यायेषुभिर्मोहरिपुं निरस्य ।
असि स्म कैवल्यविभूतिसम्राट्,
ततस्त्वमर्हन्नसि मे स्तवार्हः ॥५५॥

**एकान्तदृष्टी**त्यादि । सर्वं सदेवासदेव नित्यमेवेत्याद्यभिनिवेश एकान्तदृष्टिः तस्याः प्रतिषेधस्तस्य सिद्धिः । कैः? **न्यायेषुभिः** न्यायाः प्रमाणानि त एव इषवो बाणाः तैः प्रवचनादिप्रमाणबाणैः एकान्ताभिनिवेशनिवारणसिद्धिरित्यर्थः । अनेन परार्थसम्पत्तिः सूचिता तत्संपत्तिश्च स्वार्थसम्पत्तौ सत्यां स्यादिति तत्सूचनार्थं **मोहे**त्याद्याह । मोहोऽज्ञानं स एव रिपुः शत्रुस्तं । अथवा मोहो मोहनीयं कर्म रिपुर्ज्ञानावरणादिकर्मत्रयं

मोहेन समन्वितो रिपुः मोहरिपुस्तं, निरस्य निराकृत्य। इत्ययं स्वार्थसम्पत्त्युपायः। असि स्म कैवल्यविभूतिसम्राडिति स्वार्थसम्पत्तिः। असि स्म भूतवान्। केवलं असहायं क्षायिक ज्ञानं केवलमेव कैवल्यं तस्मिन्सति विभूतिः समवसरणादिलक्ष्मीस्तस्याः सम्राट् चक्रवर्ती। यत एवं ततः कारणात्। त्वमर्हन् असि भवसि मे मम स्तवार्हः स्तुतियोग्यः॥

**मराठी अर्थः**—सर्व वस्तु सद्रूपच आहेत, सर्व वस्तु असद्रूपच आहेत किंवा सर्व वस्तु नित्यच आहेत; अशा एकांत दाचें खंडन, अनेकान्तसमर्थक आगम, प्रत्यक्ष व अनुमान इत्यादि प्रमाणरूपी बाणांनीं होतें. आगमामध्यें ' सर्वमनेकान्तात्मकं वस्तु एकांतस्वरूपानुपलब्धेः '-वस्तुमध्यें अनेक धर्म आहेत, कारण, ती एका धर्माला धारण करते असें आढळून येत नाहीं ह्मणून हें अनुमान अनेकान्तात्मक वस्तूची सिद्धि करतें. तसेंच एकान्त वादाचा निषेध करणारें हें अनुमान आहे. ' नास्ति सर्वथैकांतः सर्वदानेकांतोपलब्धेः, सर्वथा एकांत वाद नाहीं; हमेशा अनेकांत वादच सर्वत्र दिसून येतो ' येथें असा प्रश्न उत्पन्न होतो कीं एकांतवादाची उपलब्धि होतें किंवा नाहीं ? जर तो आढळून येत असेल तर त्याचें खंडन होणें शक्यच नाहीं ? आणि एकांतवाद जर जगांत नसेल तर अनेकांतांशीं तो विरोध तरी कसा करील? कारण, एकांतवादाचें अस्तित्व असेल तरच तो विरोध करूं शकला असतां ? यास्तव एकांतवादाचा निषेध आपण करूं शकत नाहीं. असें ह्मणणें देखील योग्य नाहीं.

जरी वस्तु अनेकधर्मात्मक आहे तथापि ती एकधर्मात्मकच आहे असा तिच्यावर मिथ्यादृष्टी आरोप करतात. ह्मणून त्या एकांत वादाचा आह्मी निषेध करू शकतो. जर असा निषेध आह्मीं करणार नाहीं तर एकान्तात्मकच वस्तूचें स्वरूप आहे

असें सिद्ध होईल व अनेकांत वादाची जो वस्तूचा प्राण आहे त्याची सिद्धि झाली नसती. यास्तव वस्तूवर हा जो एकांतात्मकतेचा मिथ्या आरोप नैयायिक वगैरे वाद्यांनीं केला होता तो दूर करून अनेकांत वादाची सिद्धि करणें सर्वथैव योग्य आहे.

हे जिनेश आपण एकांतवादाचें खंडन करून अनेकांताची सिद्धि केली. व ज्ञानावरणादि चार घातिकर्मांचा नाश करून असहाय केवलज्ञानाची प्राप्ति करून घेतली. आपणांस कैवल्याचा लाभ झाल्यामुळें समवसरणादि लक्ष्मीची प्राप्ति झाली व आपणांस धर्मचक्रवर्तित्व प्राप्त झालें. यामुळें हे जिनेश, मजकडून आपण स्तुतीस पात्र आहांत.

यापमाणें श्रेयान् जिनाचें स्तोत्र संपलें.

---

या श्रेयांस भगवंताचें शरीरवर्ण सुवर्णासारखे होतें यथा

द्वौ कुंदेन्दुतुषारहारधवलौ द्वाविन्द्रनीलप्रभौ,
द्वौ बंधूकसमप्रभौ जिनवृषौ द्वौ च प्रियंगुप्रभौ।
शेषाः षोडश जन्ममृत्युरहिताः संतप्तहेमप्रभा-
स्ते सज्ज्ञानदिवाकराः सुरनुताः सिद्धिं प्रयच्छंतु नः॥

अर्थात् दोन तीर्थकर पांढरे, दोन श्यामवर्ण, दोन तांबडे, दोन हिरवे व बाकी १६ सुवर्णासारखे झाले.

श्री वासुपूज्यस्तुति ।

शिवासु पूज्योऽभ्युदयक्रियासु
त्वं वासुपूज्यस्त्रिदशेन्द्रपूज्यः ।
मयापि पूज्योऽल्पधिया मुनीन्द्र,
दीपार्चिषा किं तपनो न पूज्यः ॥५६॥

**शिवासु पूज्य** इत्यादि । **शिवासु** शोभनासु **अभ्युदयक्रियासु** स्वर्गावतरणादिकल्याणेषु । **पूज्यः** । त्वं भगवान् । किंनामेत्याह **वासुपूज्य** इति वसुपूज्यस्यापत्य वासुपूज्यो नामेदं द्वादशतमतीर्थकरदेवस्य । पुनरपि कथम्भूतस्त्वं ? **त्रिदशेन्द्रपूज्यः**, उपलक्षणमेतत्तेन नराधिपादिपूज्य इति लभ्यते । य इत्थम्भूतस्त्वं भगवान् स **मयापि** समन्तभद्रस्वामिनापि **पूज्यः** स्तुत्य । कथम्भूतेन ? **अल्पधिया** मन्दधिया । हे **मुनीन्द्र** गणधरदेवादिमुनिस्वामिन् । यदि त्वमल्पधी, किमर्थं भगवन्त पूजयसीत्याह—**दीपे**त्यादि । दीपस्य आर्चि शिखा दीपार्चि तेन स्वल्पतेजसा । किं वितर्के । **किं न तपन** आदित्यस्तेजोनिधि **पूज्योऽपि** नु पूज्य एव ।

**मराठी अर्थ**—हे वासुपूज्य जिनेश, आपण कल्याणकारक आपल्या गर्भावतरणादि पंच कल्याणिकामध्यें वंद्य झाला आहात. तसेंच हे जिनेश, आपली देवेंद्र पूजा करतात. व चक्रवर्ति, आणि इतर मनुष्यें आपली पूजा करतात. हे जिनेश, मंदबुद्धि अशा मजकडून देखील [ समन्तभद्रस्वामीकडून ] आपण पूजनीय आहांत.

हे जिनेश ! ‘ हा अगदीं मंदबुद्धीचा आहे, माझी हा पूजा कशी करणार अशी ’ कोणांस शंका आली असल्यास ती व्यर्थ आहे. कारण, तुच्छ अशा दिव्याच्या जोतीनें प्रकाशाचा साठा असा सूर्य पूजिला जात नाहीं काय ?

**तात्पर्य:**—इंद्र आपल्या बुद्धिवैभवाला अनुसरून आपली पूजा करतात. ज्यांचें ज्ञान विशाल आहे त्यांनींच आपली पूजा करावी असें नाहीं. मी देखील माझ्या अल्पबुद्धीस अनुसरून आपली पूजा करणार. यांत ग्रंथकारानें आपला विनय व्यक्त केला. व पूजा करण्यास मी पात्र आहे असें दर्शविलें आहे.

भवदीयया पूजया भगवतः किं प्रयोजनमित्याह ।

तुम्ही केलेल्या पूजेपासून भगवन्तास काय फायदा होणार अशा शंकेचें उत्तर आचार्य देतात.

न पूजयार्थस्त्वयि वीतरागे,
न निन्दया नाथ विवान्तवैरे।
तथापि ते पुण्यगुणस्मृतिर्नः,
पुनातु चित्तं दुरिताञ्जनेभ्यः ॥५७॥

नेत्यादि । **नार्थो** न प्रयोजनं । कया? **पूजया** स्तुतिगंधमालाद्यर्चनलक्षणया । क? **त्वयि** । कथम्भूते? **वीतरागे** । वीतरागत्वात्पूजया तव न किञ्चित्प्रयोजनमित्यर्थः । निन्दा तत्र कर्तव्येत्यत्राह न निन्दयेत्यादि । **निन्दया** असद्भूतदोषोद्भावनक्रोधादिलक्षणया । त्वयि, **नाथ** स्वामिन्, **न**। अर्थ इति सम्बन्धः । कथम्भूते त्वयि? **विवान्तवैरे**। विवान्तं विनिर्गतं वैरं यस्मादसौ, विवान्तवैरः परित्यक्तकोप इत्यर्थः, तस्मिन् । यदि भगवतः पूजया न किञ्चित्प्रयोजनं तर्हि किमर्थं भवाँस्तत्र पूजां करोतीत्याह तथापीति । यद्यपि भगवतः पूजया न किञ्चित्प्रयोजनं **तथापि** । **ते** तव **पुण्यगुणस्मृतिः** पुण्याः प्रशस्ताः पवित्रा वा ये गुणा अनन्तज्ञानादयस्तेषां स्मृतिः निर्मलमनसा स्वरूपानुचिन्तनं स्तवनं च नोऽस्माकं **चित्तं** चिद्रूपमात्मस्वरूपं **पुनातु** निर्मलीकरोतु । केभ्यः? **दुरिता**-

अनेभ्यः । दुरितान्येव पापान्येवाञ्जनानि जीवस्य दुःखकालुष्यहेतुत्वात्तेभ्यः ।

मराठी अर्थः - हे जिनेश, आपण रागद्वेषांचा पूर्ण नाश केला आहे, यास्तव आपली आह्मी स्तुति केली किंवा अष्टद्रव्यांनीं आपली पूजा केली तरी देखील त्या स्तुतीपासून अथवा त्या पूजेपासून आपलें कोणतें कार्य सिद्ध होणार आहे ? व आपण क्रोधाचा बिलकुल त्याग केला, आपलें कोणाशीं वैर नाहीं; यामुळें आपली निंदा केल्यानें देखील आपलें कोणतें नुकसान होणार आहे ? तथापि आह्मी आपल्या पवित्र अनंत ज्ञानादि गुणांची स्तुति करतो व आपल्या गुणांचें निर्मळ अंतःकरणानें चिंतन करतो याचें कारण हें कीं, आमचा आत्मा दुःख देणाऱ्या रागद्वेषादि विकारापासून दूर राहो व त्यास पवित्रता येवो.

तात्पर्यः—श्री जिनेश वीतराग व पूर्ण समता धारण करणारे असल्यामुळें कोणीं त्यांची स्तुति केली किंवा कोणी त्यांची निंदा केली तरी त्यांना आनंद किंवा क्रोध उत्पन्न होत नाहीं. रागद्वेषयुक्त मनुष्याची आपण स्तुति केली किंवा त्यांची आपण निंदा केली तर ते खुष होतात किंवा रागावतात. अर्हंताची पूजा केल्यानें-स्तुति केल्यानें देखील ते प्रसन्न होत नाहींत व आह्मांस इष्ट फल देत नाहींत तर आम्ही त्यांची पूजा तरी कशाला करावी ? असें ह्मणूं नये त्यांची पूजा केल्यानें-स्तुति केल्यानें आमचे रागादि कर्मजन्य विकार दूर होतात; व आमचा आत्मा पवित्र होत जातो यास्तव श्री जिनाची पूजा केल्यानें इष्टफलप्राप्ति होते, हें सिद्ध होतें. तसेंच त्यांची निंदा केल्यानें दुःखही अवश्य भोगावें लागतें ह्मणून निंदा करणें अगदीं अयोग्य आहे हें सिद्ध होतें.

ननु दधिदुग्धगंधमाल्यादिना भगवतः पूजाभिधाने पापमप्युपार्ज्यते लेशतः सावद्यसद्भावात् इत्याशंक्याह ।

श्री जिनाची दही, दूध, गंध, फुलें इत्यादि द्रव्यांनीं पूजा केली असतां पातक उत्पन्न होतें कारण तें पूजेचें कार्य करतांना थोडेसें पातक लागतें. या शंकेचें आचार्य उत्तर देतात.

पूज्यं जिनं त्वार्चयतो जनस्य,
सावद्यलेशो बहुपुण्यराशौ ।
दोषाय नालं कणिका विषस्य,
न दूषिका शीतशिवाम्बुराशौ ॥५८॥

**पूज्य**मित्यादि । **पूज्य**माराध्यं । **जिनं** अर्हन्तं त्वा त्वां वासुपूज्यं **अर्चयतः** पूजयतः **जनस्य** भव्यप्राणिगणस्य । **सावद्यलेशः** अवद्यं पाप, सह अवद्येन वर्तते इति सावद्यं कर्म, तस्य लेशो लवः पूजां कुर्वतो यः संपन्नः स **दोषाय** पुण्योपार्जने प्रवृत्तस्य दोषः पापोपार्जनं तस्मै, **न अलं** न समर्थो भवति । कस्मिन्? **बहुपुण्यराशौ** प्रचुरपुण्यपुंजे तेनोपहतशक्तित्वात्तस्य । केनेत्याह-कणिकेत्यादि । **कणिका** मात्रा लवो **विषस्य** । **न दूषिका** न मारणात्मकविषधर्मसंपादिका । **क**? **शीतशिवाम्बुराशौ** शीतं च शिवं स्पर्शनेन्द्रियप्रल्हादकरं तच्च तदंबु च जलं तस्य राशिः संघातो यत्रासौ शीतशिवाम्बुराशिः समुद्रः तस्मिन् ।

**मराठी अर्थः—हे जिनेश पूज्य अशा आपली पूजा करणाऱ्या भव्यजीवांना फार मोठें पुण्य लागतें. यद्यपि पूजा सामग्री, स्वच्छ करणें, धुणें, इत्यादिकापासून पाप उत्पन्न होतें तथापि तें इतकें कमी असतें कीं, श्री जिनेश्वराची पूजा केल्यापासून झालेल्या पुण्यानें त्याची सर्वशक्ति नष्ट होते, तें आपल्या**

फलाचा अनुभव आत्म्यास देण्यास समर्थ होत नाहीं हेंच दृष्टांतद्वारें आचार्य सिद्ध करतात. स्पर्शेंद्रियास तृप्त करणाऱ्या थंड पाण्यानें भरलेल्या समुद्रांत पडलेला विषाचा एक कण सर्व समुद्रास दूषित करीत नाहीं; विषाच्या एका कणांत जी मारण शक्ति ती अफाट समुद्रांतील पाण्यानें जशी नाहींशी होते, तद्वत् जिनपूजेपासून प्राप्त झालेल्या पुण्यपूजेपासून उत्पन्न झालेलें सूक्ष्म पातक बिलकुल टिकूं शकत नाहीं.

ननु मुनीनां पुष्पादिपरिग्रहासम्भवात् कथं भगवति पूजा स्यादित्याशंक्याह ।

मुनींद्राजवळ फुलें, दूध, दही, गंध वगैरे परिग्रह नसल्यामुळें ते जिनेश्वराची पूजा कशी करणार या शंकेचें उत्तर आचार्य देतात.

यद्वस्तु बाह्यं गुणदोषसूते-
निमित्तमभ्यन्तरमूलहेतोः ।
अध्यात्मवृत्तस्य तदंगभूत-
मभ्यन्तरं केवलमप्यलं ते ॥ ५९ ॥

यदित्यादि । **यद्वस्तु** पुष्पादिकं । बहिर्भवं **बाह्यं** । कथम्भूतं ? **निमित्तं** कारणं । कस्याः ? **गुणदोषसूतेः** । गुणः पुण्यं दोषः पापं तयोः सूतिः प्रसूतिः उत्पत्तिः, तस्याः । तत्किमित्याह- **तदंगभूतं** तद्वस्तु बाह्यं पुष्पादिकं अंगभूतं सहकारिकारणभूतं । कस्य ? **अभ्यन्तरमूलहेतोः** । अभ्यन्तरश्चासौ मूलहेतुश्च प्रधानहेतुः पुण्यपापोत्पत्तौ उपादानहेतुरित्यर्थः । कथम्भूतस्य ? अस्य **अध्यात्मवृत्तस्य** आत्मनि अधिवृत्तं वर्तनं शुभाशुभपरिणामलक्षणं यस्य । अनेन भक्तिलक्षणशुभपरिणामहीनस्य पूजादिकं न पुण्यकारणं इत्युक्तं भवति । ततः **अभ्यंतरं**

केवलमप्यलं ते अभ्यंतरं शुभाशुभजीवपरिणामलक्षणं कारणं केवलं बाह्यवस्तुनिरपेक्षं ।

मराठी अर्थः—पुष्प, गंध इत्यादिक बाह्य पदार्थ पूजेची सामग्री हे पुण्य किंवा पाप उत्पन्न होण्यास निमित्तकारण आहेत व हे पदार्थ आत्म्यामध्यें उत्पन्न होणाऱ्या शुभ किंवा अशुभ परिणामास सहकारी कारण आहेत. आत्मा हा शुभाशुभ परिणाम उत्पन्न होण्याला मुख्य कारण-उपादानकारण आहे त्यास अंतरंगकारण ह्मणतात. व पुष्पादिक पदार्थ बहिरंगकारण-सहकारिकारण आहेत. यालाच निमित्तकारण असें ही म्हणतात. ज्याच्या अंतःकरणामध्यें भक्ति नाहीं अशा तऱ्हेच्या शुभ परिणामहीन मनुष्यास पूजादिक बाह्य कारणें पुण्योत्पत्तीला कारण होऊं शकत नाहींत. परंतु ज्याच्या अंतःकरणामध्यें स्वभावतःच भक्ति उत्पन्न होते, त्याला बाह्य गंध, पुष्पें इत्यादि पूजा साहित्याची अपेक्षा लागत नाहीं. परंतु सर्व मनुष्यांच्या अंतःकरणामध्यें भक्तिरसाचा प्रवाह आपोआपच वाहू लागत नाहीं, यास्तव त्यांना बाह्य पूजा द्रव्यांची आवश्यकता असते. श्री जिनेश्वराच्या गुणांच्या ठिकाणीं ज्यांचा तत्काल लय लागतो, अशा मुनींना या बाह्य वस्तूंची आवश्यकता भासत नाहीं. यावरून सर्वथा बाह्य पदार्थांची आवश्यकता नकोच असें ह्मणणें योग्य ठरत नाहीं.

भावार्थः-बाह्य इंद्रियांचे विषय असतात ते पूजनाच्या वेळेसही जर जवळ असले तरच गृहस्थाचे मन पूजा अथवा भक्तिमध्यें लागूं शकतें. इतरथा मन स्थिर राहत नाहीं. पूजेचे निरालंब स्वरूपापासून ते लांब कोणते तरी भोग्यविषयाकडे पळत असतें.

एतच्च सर्वं जैनमत एव घटते नान्यत्रेति दर्शयन्नाह ।

**या उपरोक्त कथनाची सिद्धि जैनमतामध्येंच होते इतर मतामध्यें हें सिद्ध होत नाहीं हें आचार्य दाखवितात.**

> बाह्येतरोपाधिसमग्रतेयं,
> कार्येषु ते द्रव्यगतः स्वभावः ।
> नैवान्यथा मोक्षविधिश्च पुंसां,
> तेनाभिवंद्यस्त्वमृषिर्बुधानाम् ॥६०॥

**बाह्येत्यादि** । बाह्यश्च इतरश्चाभ्यन्तरः तौ च तौ उपाधी च हेतू उपादानसहकारिकारणे तयोः समग्रता संपूर्णता । **इयं** प्रतीयमाना । क ? **कार्येषु** घटादिषु । **ते** तव मते । कथम्भूता सा ? **द्रव्यगतः स्वभावः** जीवादिपदार्थगतमर्थक्रियाकारि स्वरूपं । **अन्यथा** एतस्मात्समग्रतातत्स्वभावताप्रकारात् अन्येन तदस्वभावताप्रकारेण । **नैव मोक्षविधिश्च** । च तच्छब्दोऽपिशब्दार्थः । न केवलं घटादिविधानं नैवान्येन प्रकारेण घटते किंतु मोक्षविधिरपि । **पुंसां** मुक्त्यर्थिनां । यत एवं **तेन** कारणेन **अभिवंद्यस्त्वं** । बुधानां गणधरदेवादीनां विपश्चितां । कथम्भूतः ? **ऋषिः** परमर्द्धिसम्पन्नः ॥

**मराठी अर्थः-बाह्य कारणें व अभ्यंतर कारण यांची पूर्णता झाली ह्मणजे कार्य उत्पन्न होतें. जसें मातीपासून आपणास घागर तयार करावयाची आहे तेव्हां माती ही उपादान कारण आहे कारण घागरीचें स्वरूप प्राप्त करून घेण्याची तिच्यांत योग्यता आहे; व बहिरंग कारणें कुंभार, चाक, काठी वगैरे आहेत. यांची पूर्णता झाली ह्मणजे अर्थात् हीं सर्व असलीं ह्मणजे घागर हें कार्य मातीपासून होण्यास उशीर लागत नाहीं. हे जिनेश ! हीं दोन्हीं कारणें द्रव्याचाच स्वभाव आहेत असें आपण सांगितलें आहे. या दोन कारणांच्या पूर्णतेनेंच कार्य होतें. जसें आठव्यांत ठेवलेल्या उडीदामध्यें शिजण्याची शक्ति**

आहे; परंतु अग्नि, पाणी या बहिरंग कारणाच्या अभावीं शिजण्याची शक्ति व्यक्त कशी होणार ? अथवा एका विशिष्ट जातीच्या मुगामध्यें शिजण्याची शक्ति नसते, त्या मुगांस शिजण्याची बाह्य सामग्री मिळाली तरी देखील मूळचा त्यांचा स्वभाव नसल्यामुळें ते शिजणें अशक्य आहे. यावरून पूर्ण सामग्री मिळाली ह्मणजे कार्य उत्पन्न होतें. आत्म्याला मोक्षाची प्राप्ति करून घेण्यामध्यें देखील उपादान व निमित्तकारणांची अपेक्षा पडतेच. अभ्यंतर कारण मोक्षप्राप्ति करून घेण्याची योग्यता व बाह्य कारण दीक्षा घेणें, तपश्चरण, ध्यान, रत्नत्रय पूर्णता वगैरे हीं दोन कारणें मिळालीं ह्मणजे मोक्षाची प्राप्ति होतें. हीं बाह्य कारणें न मिळाल्यास मोक्ष प्राप्ति होणें शक्य नाहीं. किंवा अभ्यंतर कारण मोक्ष प्राप्तिची योग्यता हें नसल्यास मोक्ष प्राप्त होत नाहीं. अन्यथा अभव्यांस देखील मोक्षप्राप्त करून घेणें अशक्य झालें नसतें. तसेंच तीर्थंकर तद्भव मोक्षगामी असतात, परंतु त्यांना देखील मोक्ष हस्तगत करून घेण्यास दीक्षा, तपश्चरणादिक साधनें मिळवावीं लागतात. यावरून उभय कारणांच्या सामग्रीची प्राप्ति झाल्यानें कार्य होतें. हें सिद्ध झालें. या उभय कारणांनींच लौकिक घटादि कार्यें व पारमार्थिक मोक्ष वगैरे कार्यें होतात. असा हे जिनेश ! आपण भव्यजीवांना उपदेश केला; यास्तव परमैश्वर्य सम्पन्न असें आपण गणधरादि मुनींद्राकडून सतत पूजनीय वंद्य आहांत.

याप्रमाणें वासुपूज्य जिनाचें स्तोत्र संपलें.

———

श्री विमलनाथ स्तुतिः ॥

**य एव नित्यक्षणिकादयो नया,**
**मिथोनपेक्षाः स्वपरप्रणाशिनः ।**
**त एव तत्त्वं विमलस्य ते मुनेः,**
**परस्परेक्षाः स्वपरोपकारिणः ।६१॥**

**य एवेत्यादि । य एव नया नित्यक्षणिकादयः ।** नित्यश्च क्षणिकश्च तावादी येषां त तथोक्ताः । आदिशब्देन सत्ताद्येकांतपरिग्रहः । कथंभूताश्च ते ? **स्वपरप्रणाशिनः** स्वश्च तथाध्यवसायपरिणत आत्मा परश्च तथाध्यवसाये प्रवर्त्स्यमानस्तयोः प्रणाशयितुं संसारदुःखार्णवे पातयितुं शीलं येषां ते स्वपरप्रणाशिनः दुर्णया इत्यर्थः । कथम्भूताः सन्तस्ते तथाविधा इत्याह- **मिथोऽनपेक्षाः ।** य एवंविधाः परमतापेक्षया नयाः **त एव तत्त्वं** परमार्थस्वरूपं भवन्ति । सम्यग्नया भवन्तीत्यर्थः । कस्य ? **विमलस्य** विगतो मलो ज्ञानावरणादिकर्मलक्षणो यस्य स विमलस्त्रयोदशतीर्थंकरः तस्य । **ते** तव **मुनेः** प्रत्यक्षवेदिनः । कथंभूताः सन्तस्ते तत्त्वं भवति ? **परस्परेक्षाः** परस्परमन्योऽन्यं ईक्षा अपेक्षा येषां । कुतस्ते तथाविधाः सन्तस्तत्त्वं भवंति ? **स्वपरोपकारिणो** यतः ॥

**मराठी अर्थः —वस्तु सर्वथा नित्यच आहे, किंवा ती सत्तारूपच आहे असें वर्णन करणाऱ्या नयांना दुर्नय ह्मणतात. कारण ते वस्तूंच्या इतर धर्मांचा निषेध करतात. व ते नय बिलकुल स्वतंत्र असल्यामुळें आपल्या विरुद्ध असलेल्या इतर नयांची अपेक्षा=गरज ठेवीत नाहींत. आणि या एकान्त धर्माचें स्वरूप दाखऊन देणाऱ्या या नयाचा आश्रय घेणारे लोक-व त्या नयाचें स्वरूप दाखऊन वस्तु एकान्त धर्मात्मकच आहे अशी ज्यांची श्रद्धा केली गेली आहे असे लोक या उभयतांचा हे कुनय नाश करीत असतात. किंवा पदार्थ**

नित्यच आहे असें वर्णन करणारा नित्यनय अनित्यनयाचा द्वेष करतो व अनित्यनय पदार्थ अनित्यच आहे असें वर्णन करतो. व तो नित्यनयाचा द्वेष करतो. यामुळें परस्परांच्या अपेक्षेनें जी परस्परांची सिद्धि होत असे ती या द्वेषामुळें होत नाहीं; यास्तव हे नय स्वतः आपला नाश करतात. व दुसऱ्या नयांचा नाश करतात. परंतु ज्ञानावरणादि कर्ममलांचा नाश करणाऱ्या हे विमल जिना ! सर्वज्ञ अशा आपल्याकडून वर्णिलेले नय परस्पर नयावर उपकार करणारे व एकमेकांची अपेक्षा–गरज ठेऊन पदार्थांतील अनेक धर्मांची स्वभावांची सिद्धि करणारे आहेत. यास्तव विमल जिनांनीं सांगितलेल्या नयांस ' तत्व ' ह्मणतात व इतर कुनयांना अतत्व ह्मणतात.

ननु यदि नित्योऽनित्यमपेक्षते सोऽपि नित्यं तर्हि सर्वस्य सर्वापेक्षाप्रसंगात्, प्रतिनियतव्यवस्थाविलोपः स्यादित्याशंक्याह ।

जर नित्यनय अनित्यनयाची अपेक्षा करतो व अनित्यनयही नित्यनयाची गरज ठेवतो असें ह्मणाल तर सर्व नय सर्वांची अपेक्षा ठेवतील. व यामुळें अमुक नयाचा विषय–जाणण्यायोग्य पदार्थ अमुकच आहे असें न समजल्यामुळें पदार्थांची व्यवस्था कशी होणार ! या प्रश्नाचें उत्तर आचार्य देतात.

यथैकशः कारकमर्थसिद्धये,
समीक्ष्य शेषं स्वसहायकारकम् ।
तथैव सामान्यविशेषमातृका,
नयास्तवेष्टा गुणमुख्यकल्पतः ॥६२॥

यथेत्यादि । यथा यद्वत् । एकमेकमेकशः । कारकं उपादानकारणं सहकारिकारणं वा । अर्थसिद्धये कर्मनिष्पत्तये प्रभवति । किं

कृत्वा ? **समीक्ष्य** । किं तदित्याह शेषमित्यादि । **शेषमन्यत्स्वसहायकारकं** स्वसहायंच तत्कारकं च तत् । अयमर्थः–उपादानकारणं सहकारिकारणमपेक्षते तच्चोपादानकारणं, न च सर्वेण सर्वमपेक्ष्यते । किन्तु यद्येन अपेक्ष्यमाणं दृश्यते तत्तेनापेक्ष्यते । एवं दृष्टान्तं व्याख्याय दार्ष्टान्तिके योजयन्नाह **तथैवे**त्यादि । तेनैव सापेक्षत्वप्रकारेण **नयाः** प्रतिपत्तुरभिप्रायाः । **तव विमलस्येष्टाः** अभिप्रेताः । कथम्भूताः ? **सामान्यविशेषमातृकाः** सामान्यं च विशेषश्च तौ मातरौ जनकौ येषां तयोर्वा मातृका मातर एव मातृकाः परिच्छेदकाः । कथं ते तवेष्टाः ? **गुणमुख्यकल्पतः** सामान्यस्य मुख्यकल्पे विशेषस्य गुणकल्पना, तस्य वा मुख्यकल्पे सामान्यस्य गुणकल्पना प्रयोजनवशात् ।

मराठी अर्थः—कोणतेंही कार्य उत्पन्न होण्यास दोन कारणांची जरूर असते. उपादान कारण व सहकारी कारण या दोहोंपासून कार्य उत्पन्न होत असते. उपादान कारण सहकारी कारणाची अपेक्षा ठेवीत असते. व सहकारी कारण उपादानाची अपेक्षा ठेवतें. कार्य उत्पन्न होण्यास जेवढ्या सहकारी कारणांची जरूरत असते त्यांचीच उपादान कारण अपेक्षा करीत असतें. व सहकारी कारणही जें उपादानकारण कार्य करावयास समर्थ असेल त्याचीच अपेक्षा ठेवतें. यावरून कार्य उत्पन्न होण्यास नियमित कारणाशिवाय बाकीच्या कारणांची जरूरी नसते. कार्य उत्पन्न होण्यामध्यें जसें नियमित कारणेंच उपयोगी पडतात, तद्वत् पदार्थांतील सामान्य व विशेष धर्म ज्यांचे उत्पादक आहेत, असे नय परस्परनयांची अपेक्षा ठेवीत असतात. द्रव्यार्थिक नय हा सामान्य धर्माचा ग्राहक आहे, परंतु तो पर्यायार्थिक नयाची अपेक्षा ठेवीत असतो. याचप्रमाणें पर्यायार्थिक नय देखील विशेषधर्माचा ग्राहक आहे. परंतु तो सामान्य धर्माचें निराकरण न करतां

आपल्या विषयामध्यें प्रवृत्त होतो. यास्तव हे नय आपआपल्या विषयाचें मुख्य रीतीनें प्रतिपादन करून इतर विषयास गौण करतात. ज्यावेळेस जो नय ज्या धर्माचें वर्णन करतो त्यावेळेस वस्तूमध्यें तो धर्म मुख्य समजला जातो व इतर धर्म गौण समजले जातात. यास्तव हे विमलनाथ ! आपल्यामतामध्यें नयांना गौणता व मुख्यता मानली गेली आहे. तसेंच हे जिनेश ! सामान्य धर्माला मुख्यता दिली ह्मणजे विशेषधर्म हा गौण समजला जातो व सामान्यधर्माचें वर्णन करणाऱ्या नयाला त्या समयीं मुख्यता प्राप्त होते. विशेष धर्माला मुख्यता दिल्यानें सामान्य धर्माला गौणता प्राप्त होते व विशेष धर्माचें वर्णन करणाऱ्या नयांस प्रमुखत्व मिळतें.

ननु सामान्यविशेषयो: कुतश्चिदपि प्रमाणादप्रसिद्धेः
कथं ते तन्मातृकाः इत्याशंक्याह ।

सामान्य व विशेष या धर्मांची कोणत्याही प्रमाण ज्ञानानें अद्यापि
सिद्धि न झाल्यामुळें नय या धर्माचें स्वरूप कसें जाणतात
या शंकेचें उत्तर आचार्य या श्लोकांत सांगतात.

परस्परेक्षान्वयभेदलिङ्गतः,
प्रसिद्धसामान्यविशेषयोस्तव ।
समग्रतास्ति स्वपरावभासकं,
यथा प्रमाणं भुवि बुद्धिलक्षणम् ॥६३॥

**परस्परे**त्यादि । परस्परमन्योन्यमीक्षा अपेक्षा ययोस्तौ च तौ अन्वयभेदौ च सामान्यविशेषौ तयोर्लिङ्गं ज्ञानं । लिङ्गेते ज्ञायेते सामान्यविशेषौ येनेति व्युत्पत्तेः । तस्मात्ततः । किमित्याह--प्रसिद्धेत्यादि । प्रसिद्धौ तौ च सामान्यविशेषौ च । अन्वयलिङ्गतो ह्यभेदज्ञानापरपर्यायात् सामान्यं प्र-

सिद्धं । **भेदलिङ्गतो** भेदज्ञानापरपर्यायाद्विशेषः प्रसिद्धः । एवं प्रसिद्धयोः **समग्रता** सम्पूर्णता एकत्र वस्तुनि कथञ्चित्तादात्म्येन वर्तमानता **अस्ति तव** विमलतीर्थंकरदेवस्य मते । नन्वेकस्य वस्तुनः सामान्यविशेषरूपताविरोधान्न युक्तेत्याशंका । तद्विरोधपरिहारार्थं यथेत्याद्याह । **यथा** येन प्रतिभासप्रकारेण । **बुद्धिलक्षणं** बुद्धिस्वरूपं **प्रमाणं** एकं स्वपरावभासकं स्वपरप्रकाशधर्मद्वयोपेतं । **भुवि** पृथिव्यां । **न** विरुद्धं तथा वस्त्वप्येकं सामान्यविशेषरूपधर्मद्वयात्मकं न विरुद्धं इति । तथा च एकत्र वस्तुनि विशेषणविशेष्यभावेन प्रवर्तमानौ सामान्यविशेषौ सिद्धौ तन्मातृकाश्च द्रव्यार्थिकादयो नयाः सिद्धाः ॥

**मराठी अर्थः—वस्तूमध्यें सामान्य व विशेष असे दोन धर्म आहेत हें तशा तऱ्हेच्या अनुभवानें सिद्ध होतें. हे पदार्थ समान आहेत असा जो अनुभव येतो त्या अनुभवानें पदार्थांमध्यें सामान्य नांवाचा धर्म आहे हें सिद्ध होतें. व या पदार्थापासून हा पदार्थ भिन्न आहे अशा अनुभवानें–ज्ञानानें पदार्थांतील विशेष धर्माची ओळख होते. वर हे दोन्हीं अनुभव परस्परांची गरज ठेवीत असतात. सामान्य व विशेष हे दोन धर्म पदार्थांमध्यें अवश्य असतात. ज्यामध्यें केवळ सामान्य धर्मच आहे असा पदार्थ किंवा ज्यांत फक्त विशेष धर्मच आहे असा पदार्थ मुळींच आढळून येणार नाहीं. जरी हे धर्म आपणास मन्दृदर्शनीं विरुद्धसे वाटतात तथापि ते विरुद्ध नाहींत. या दोन धर्मांमध्यें अतिशय दृढ मैत्री आहे. यांतील एकाचा अभाव झाला तर अवश्य दुसऱ्याचा अभाव झालाच पाहिजे. एवढेंच नाहीं तर या धर्मांनीं युक्त असलेला पदार्थ देखील नाहींसा झालाच पाहिजे. म्हणून हे धर्म परस्परांची अपेक्षा ठेवीत असतात. पदार्थामध्यें हे दोन धर्म कसे राहतात हें आपण ज्ञानाचा दृष्टांत घेऊन व्यक्त करूं. ज्ञानामध्यें दोन धर्म आहेत**

ह्मणजे दोन शक्ति आहेत. या शक्तिच्या योगें तें स्वतःस व स्वतःहून भिन्न अशा वस्तूंना जाणतें. स्वतःस ज्या शक्तीनें तें जाणतें त्या शक्तीस ' स्वावभासक शक्ति ' असें नांव आहे व ज्या शक्तिनें तें इतर पदार्थांना जाणतें, त्या शक्तीस परावभासक शक्ति असें ह्मणतात. दिवा जसा स्वतः प्रकाशमान आहे व पदार्थांसही तो प्रकाशित करतो. तद्वत् ज्ञान हें स्वतःस व इतरांस जाणतें. जसें ज्ञानामध्यें या दोन शक्ति रहात असून-ही यांच्यांत विरोध दिसत नाहीं; तद्वत् सामान्य व विशेष या दोन धर्मांमध्यें आपसांत विरोध नसल्यामुळें ते पदार्थांमध्यें खुशाल राहू शकतात. यास्तव एका वस्तूमध्यें विशेषण विशेष्यभाव धारण करून राहिलेल्या या दोन धर्मांची सिद्धि झाली व त्या धर्मांना जाणणाऱ्या द्रव्यार्थिकादिक नयांचीही सिद्धि होते.

ननु किं पुनर्विशेष्यं किंवा विशेषणमित्यत्राह ।

विशेष्य ह्मणजे काय व विशेषण ह्मणजे काय हें आचार्य सांगतात.

विशेष्यवाच्यस्य विशेषणं वचो,
यतो विशेष्यं विनियम्यते च यत् ।
तयोश्च सामान्यमतिप्रसज्यते,
विवक्षितात्स्यादिति तेऽन्यवर्जनम् ॥६४॥

विशेष्येत्यादि । विशेष्यं च तद्वाच्यं च विशेष्यवाच्यं । यदा सामान्यं वाच्यभूतं विशेष्यं तदा विशेषो विशेषणं यदा तु विशेषो वाच्यभूतो विशेष्यस्तदा सामान्यं विशेषणं तस्य विशेष्यवाच्यस्य विशेषणं भवति । किं तत् ? वचो विशेषणाभिधायि वचनं तद्विशेषणाभिधानद्वारेण तस्य विशेषणं । अनेन तद्द्वयेन वस्तु वाचामगोचरमिति निर-

स्तम् । कथम्भूतं विशेषणमित्याह-यत इत्यादि । **यतो** विशेषणा**द्विनियम्यते** विशेषणमियतरूपतया व्यवस्थाप्यते । किं तत् ? **विशेष्यं** तद्विशेषणं यथा कृष्णत्वं सर्पस्य । किं विशेष्यमित्याह–विनियम्यते च यत् । यद्विशेष्यं । विनियम्यते । **च**-शब्द उभयत्र सम्बध्यते । अत्र तयोरित्यादिना परो दूषणमाह: **तयोरुभयो**–विशेषणविशेष्ययोः **सामान्यं** सामान्यरूपत्व**मतिप्रसज्यते** अतिप्रसंगवद्भवेत् । सर्वोऽपि हि सर्पः कृष्णो भवेत् इति विशेष्यसामान्यमतिप्रसंगवद्भवेत् तथा । सर्पः पृष्ठादिनेव उदरादिनापि कृष्णो भवेदिति विशेषणसामान्यमतिप्रसंगि भवेदिति । अत्रोत्तरमाह विवक्षितादित्यादि । **विवक्षिता**द्विशेषणाद्विशेष्याच अन्यस्य अविवक्षितस्य वर्जनं । कुतः? **स्यादिति** हेतोः । तथाहि, स्यात्कृष्णः सर्पः इति वाक्ये स्यात्कृष्णः पृष्ठादौ न तु कृष्णो नोदरादिना । सर्पोऽपि कश्चिदेव कृष्णः न सर्वः शुक्लादेरप्यनिवारणादित्यन्यवर्ज्जनं ते तव मते सुप्रतीतम् ।

**तात्पर्यः**—सामान्य व विशेष ह्मणजे काय हें प्रथम स्पष्ट केलें आहे. सामान्य धर्माचे दोन भेद आहेत. तिर्यक्सामान्य व ऊर्द्धता सामान्य. तिर्यक्सामान्य ह्मणजे प्रत्येक व्यक्तिमध्यें जें आपणास सादृश्य आढळून येतें तें, जसें काळ्या, पांढऱ्या, तांबड्या, शिंग मोडक्या इत्यादि गाईमध्यें जें आकारसाम्य आढळतें त्यास तिर्यक् सामान्य ह्मणतात. व एकाच वस्तूच्या अनेक पर्यायामध्यें जें व्यापून राहतें त्यास ऊर्ध्वता सामान्य ह्मणतात. जसें मातीची घागर बनवीत असतां जितके पर्याय उत्पन्न होतात त्या सर्व पर्यायामध्यें माती ही असतें. अथवा बालपणा, तारुण्य, मध्यावस्था व वृद्धपणा या सर्व पर्यायामध्यें मनुष्यत्व व्यापून राहतें. याप्रमाणें सर्व पर्यायामध्यें व्यापून असलेल्या द्रव्यास ऊर्द्धता सामान्य ह्मणतात.

विशेष धर्माचेही दोन भेद आहेत. पर्याय व व्यतिरेक ए-

कावस्तूंतील क्रमानें होणाऱ्या अवस्थांना पर्याय विशेष ह्मणतात. जसें आत्म्यामध्यें हर्ष, विषाद वगैरे बालपणा, तारुण्य, वार्द्धक्य वगैरे.

एकावस्तूपासून भिन्न असलेल्या सजातीय किंवा विजातीय पदार्थामध्यें जी विसदृशता आढळते तिला व्यतिरेक असें ह्मणतात. काळ्या व पांढऱ्या गाईमध्यें रंगाच्या अपेक्षेनें विसदृशता आहे व गाय व ह्मैस यांच्यामध्यें आकार विलक्षणता दिसून येते. याप्रमाणें पदार्थांतील सामान्य व विशेष धर्माचें स्वरूप आहे.

मराठी अर्थः—जेव्हां सामान्य धर्म वाच्य असतो तेव्हां विशेष धर्म विशेषण असतो व सामान्य विशेष्य असतें. व जेव्हां विशेष धर्म वाच्य असतो त्यावेळेस सामान्य विशेषण असतें व विशेष धर्म विशेष्य होतो. विशेष्य ह्मणजे ज्यापासून जें नियमित होतें व ज्यामध्यें नियमित होण्याचा धर्म आहे तें विशेष्य होय. व नियमन करणारें अर्थात् नियमन करण्याचा ज्यामध्यें धर्म आहे तें विशेषण होय. वर सामान्यधर्म विशेष होतो व विशेषणही होतो; तसेंच विशेषधर्म देखील विशेष व विशेषण होतो असें ह्मटलें आहे, त्यापैकीं सामान्य धर्म विशेषण कसा होतो? याचें उदाहरण असें समजावें कीं, आपण सर्प पाहिला परंतु, त्यास आपण सर्प कां ह्मणतो तर तो इतर पदार्थांना भिन्न करतो व स्वतःचें ज्ञान करून देतो. तेव्हां इतर पदार्थांचें पृथक्करण करणारें तें विशेषण होय ह्मणून सर्प विशेषण झाला. सर्पामध्यें सर्पत्व हें सामान्य आहे. व तें येथें विशेषण झालें. तसेंच तें सर्पत्व काळें पांढरे तांबडे इत्यादि सर्पांमध्यें देखील आहे परंतु त्या सर्व सर्पांपासून तें सर्पत्व भिन्न नाहीं किंवा त्या सर्व सर्पांना आपणापासून तें

दूर करीत नाहीं यामुळें तें विशेषण नाहीं. तें सर्पत्व सामान्य विशेष्य कसें समजावें याचें उदाहरण असें आहे. आपण काळा सर्प पाहिला तेव्हां काय पाहिलें ? तांबडे, पांढरे, हिरवे इत्यादि सर्पाहून भिन्न असा सर्प पाहिला असें उत्तर आपण द्यालना ? अर्थात् होय असें उत्तर आपणाकडून येईल. तेव्हां सर्पाचा काळेपणा हा इतर रंगाच्या सर्पांना दूर करतो. यावरून येथें काळेपणा हें विशेषण सर्प हें विशेष्य होय. त्याचप्रमाणें विशेषधर्म देखील विशेष व विशेषण होतो. त्याला विशेषणत्व कसें येतें हें वर स्पष्ट केलें आहे. परंतु विशेषधर्म विशेष कसा होतो हें आपण पाहूं. ' सर्पाचा काळेपणा ' असें वाक्य आपण उच्चारिलें. यांत काळेपणा पुष्कळशा पदार्थामध्यें असतो. परंतु सर्व पदार्थांमध्ये सर्पत्वयुक्त काळेपणा कोठें आहे ! सर्पत्व विशिष्ट काळेपणा हा काळ्या सर्पामध्यें आहे. तेव्हां सर्पत्व धर्मानें काळेपणा हा नियत केला यास्तव काळेपणा येथें विशेष आहे असें ह्मणण्यास काय हरकत आहे? यावरून विशेषधर्म विशेष कसा होतो हें व्यक्त झालें.

या वरच्या विवेचनावरून विशेषधर्म व सामान्य धर्म या दोहोंसही सामान्यता प्राप्त होईल अशी शंका मनामध्यें उत्पन्न होणें साहजिक आहे. सामान्य धर्मास सामान्यत्व येणें साहजिक आहे. कारण तो धर्म व्यापक आहे. परन्तु विशेष धर्मास सामान्यपणा कसा प्राप्त होतो हें आपण पाहूं. जसें काळा साप असें ह्मटल्यावरून जो साप काळा आहे त्याचे सर्व अवयव काळेच आहेत काय ? नाहीं पाठ काळी असते, शेंपूट काळें असतें परन्तु त्याचें पोट पांढरें असतें. दांत पांढरें असतात. रक्त तांबडें असतें. परन्तु असें असूनही आपण त्यास काळा साप असेंच ह्मणतो यावरून आपल्या ह्मणण्यांत काळेपणास सामा-

न्यता आली नाहीं काय? याचें उत्तर आचार्यांनीं असें दिलें आहे. 'काळा साप' ह्मणजे कथंचित काळा साप, अर्थात पाठीमध्यें व शेंपटांत काळा, पोट, दांत, व तोंड हीं ज्याचें काळीं नाहींत असा, किंवा सर्प देखील एखादाच काळा. सर्वच सर्प काळे आहेत असें विधान या स्यात् शब्दानें होत नाहीं. स्यात् शब्दानें विशेष धर्मास सामान्यपण येत नाहीं. यास्तव आचार्यांनीं विशेष धर्मास सामान्यता येईल अशा शंकेचें उत्तर 'विवक्षितात्स्यादिति तेऽन्यवर्जनम्' या वाक्यानें दिलें आहे. तेव्हां काळा साप असें जेव्हां आपण ह्मणतो त्यावेळेस आपली विवक्षा पाठीनें व शेपटानें काळा-साप असें ह्मणण्याची असते. परन्तु स्यात् शब्दाचा प्रयोग केला नाहीं तर एखादा मनुष्य सापाचे सर्व अवयव काळे असतात असें समजून घेईल. तें त्यानें तसें न समजावें व विशेष धर्म व्यापक होऊन त्याला सामान्यता प्राप्त होऊं नये यास्तव स्यात् शब्दाची योजना केली ह्मणजे जें विवक्षित असतें त्याचें ग्रहण होतें व जे अविवक्षित असतें त्याचा त्याग होतो. आतां आपण हमेशा स्यात् शब्दाचा प्रयोग कोठें करीत असतो? कथञ्चित् काळा साप असें आपण कोठें ह्मणत असतो? स्यात् शब्द न जोडला तरी आपल्याला जें इष्ट असतें तेवढेंच ग्रहण करतो व बाकीच्याचा त्याग करतो. यास्तव स्यात् शब्द जोडण्याची जरूरत नाहीं अशीही शंका येते. या शंकेचें उत्तर असें आहे कीं, स्यात् शब्द कोठें योजावा हें ज्याला चांगल्या रीतीनें समजलें आहे त्यानें 'स्यात्' शब्दाचा प्रयोग न केला तरी हरकत नाहीं. कारण 'सोऽप्रयुक्तोऽपि तत्वज्ञैः सर्वत्रार्थात्प्रतीयते' स्यात् शब्दाच्या प्रयोगाच्या अभावीं देखील विद्वान् लोक अभिप्रायावरून स्यात् शब्द येथें आहे असेंच समजतात;

परंतु स्याच्छब्दाचा प्रयोग करण्याचा अभ्यास ज्यांचा दृढ झाला नाहीं त्यानें ' स्यात् ' शब्दाचा प्रयोग अवश्य करावा. त्यानें तसें न केल्यास शिष्यांना भ्रान्ति होण्याचा संभव आहे. असो.

स्याच्छब्दस्य फलं दर्शयन्नाह ।

स्याच्छब्दाची सार्थकता आचार्य दाखवितात.

नयास्तव स्यात्पदसत्यलाञ्छिता,
रसोपविद्धा इव लोहधातवः ।
भवन्त्यभिप्रेतगुणा यतस्ततो,
भवन्तमार्याः प्रणता हितैषिणः ॥६५॥

**नया** इत्यादि । **नया** विकलादेशाः **तव** विमलस्य भगवतो **भवन्त्यभिप्रेतगुणाः** । कथम्भूताः ? **स्यात्पदसत्यलांछिताः** । स्यादितिपदेन सत्येन लाञ्छिता उपलक्षिताः । दृष्टांतमाह **रसे**त्यादि । **इव**शब्दो यथार्थे । यथा रसेनोपविद्धा **रसोपविद्धा** रसानुविद्धाः **लोहधातवस्ता**म्रादिधातवः भवन्त्यभिप्रेतगुणाः । अभिप्रेतः साधयितुमिष्टः । सुवर्णलक्षणो गुणो धर्मो येषां । अयमर्थो, यथा रसोपविद्धा लोहधातवः सुवर्णरूपं फलं साधयन्ति तथा स्यात्पदोपविद्धा नयाः स्वर्गापवर्गादिफलमिति । **यतस्ते** तथाभूतास्त्व मते तत्साधयंति **ततो भवन्तं** विमलस्वामिनं **आर्या** गणधरदेवादयः **प्रणता** उपनताः । **हितैषिणो** मोक्षाकांक्षिणः ।

**मराठी अर्थः**—ज्याप्रमाणें सिद्धरसानें माखलेले लोखंड वगैरे धातु सुवर्णरूपानें बनून मनुष्यांच्या इच्छा पूर्ण करतात. त्याचप्रमाणें हे विमलप्रभो ! आपल्या मतामध्यें स्यात् या सत्य उपपदानें अलंकृत होऊन हे नय भव्यजीवांना स्वर्गमोक्षादि इष्ट पदार्थांची प्राप्ति करून देतात. यास्तव हे जिनेश ! गणधरा-

दिक श्रेष्ठ पुरुष स्वहिताची प्राप्ति व्हावी ह्मणून आपणांस नमस्कार करतात.

विमलनाथ हे तेरावे तीर्थंकर आहेत, यांनीं नयाचें व स्याद्वादाचें स्वरूप उत्तम रीतीनें निर्दोष वर्णिलें आहे. वस्तूचें स्वरूप एकांत दृष्टीनें अपुरें भासतें. परंतु स्याद्वाददृष्टीनेंच वस्तूच्या सर्व अंगाचें वर्णन करता येतें. विमलनाथ जिनेंद्र दिव्यज्ञानी असल्यामुळें त्यांनीं वस्तूचें स्वरूप एकान्तदृष्टीनें वर्णिलें नाहीं. ज्ञानावरणादि चार घातिकर्मांचा यांनीं नाश केला व आपलें आत्मस्वरूप निर्मल बनविलें ह्मणून यांचें विमल हें नांव सार्थक आहे.

कर्मांना ' मल ' असें ही ह्मणतात. व कर्मांचें मल हें नांव सार्थक आहे. कारण या मलानें आत्मतत्व अनादिकालापासून बिलकुल मलिन झालें असल्यामुळें तें स्वस्वरूपास जाणण्यास असमर्थ झालें आहे. परंतु विमलनाथ जिनेंद्रांनीं तो कर्ममल स्वस्वरूपापासून धुऊन टाकल्यामुळें त्यांना विमलनाथ हें नांव शोभतें. ह्मणून यांचें विमलनाथ हें नांव सार्थक आहे.

याप्रमाणें विमलनाथ जिनाचें स्तोत्र संपलें.



अथ अनन्तनाथस्तुतिः ।

अनन्तदोषाशयविग्रहो ग्रहो
विषंगवान्मोहमयश्चिरं हृदि ।
यतो जितस्तत्त्वरुचौ प्रसीदता,
त्वया ततोभूर्भगवाननन्तजित् ॥६६॥

**अनन्ते**त्यादि । **जितो** निर्मूलितस्त्वया । कोसौ ? **ग्रहः** पिशाचविशेषः । किंविशिष्ट इत्याह- **अनन्ते**त्यादि । अनन्ताश्च ते दोषाश्च रागादयः तेषामाशयः, आशेते निवसति रागादिदोषो यस्मिन्नित्याशयः तदाधारभूतं चित्तं, स एव विग्रहः शरीरं यस्य स तथोक्तः । पुनरपि कथम्भूतः? **विषङ्गवान्ममेदं** सर्वं स्त्र्यादिकं इति सम्बन्धो विषङ्गः । सोऽस्यास्तीति तद्वान् । यदिवा विषङ्गवान्सम्बन्धवान् । क? **हृदि** । कथं **चिरं** बहुतरकालं भवति । पुनरपिकथंभूतः ? **मोहमयः** मोहेन निर्वृत्तो मोहमयः । मोहरूप इत्यर्थः । क जितः? हृदि चिदात्मन्यात्मस्वरूपे । किं कुर्वता? **तत्त्वरुचौ प्रसीदता** तत्त्वानि जीवादीनि, तेषु रुचिः श्रद्धानं तस्यां प्रसीदता प्रसन्नेन भवता । विपरीताभिनिवेशमलं विशोधयतेत्यर्थः । **यतो** यस्मात्कारणादित्थम्भूतो ग्रहस्त्वया जितस्ततस्तस्मात्कारणाद्भूत्संजातो भगवाननन्तजिन्नाम्ना ॥

**मराठी अर्थः**—संसाराला वाढविणाऱ्या रागद्वेषांचे उत्पत्तिस्थान असें जें चित्त, हेंच ज्याचें शरीर आहे असें व घर, द्रव्य, मुलगा स्त्री वगैरे मध्यें ममत्व बुद्धि- भ्रान्ति उत्पन्न करणारें, मोहमय असें पिशाच जीवादि सात तत्त्वावर श्रद्धान ठेवणाऱ्या आपणाकडून जिंकलें गेलें. ज्ञानस्वरूपांत निमग्न झालेल्या आपल्या आत्म्यांतून आपण त्याला काढून टाकलें-हुसकून दिलें. यास्तव हे जिनेश, आपलें 'अनंतजित्' हें नांव सार्थक आहे.

तात्पर्यः — रागद्वेषांनीं भरलेलें आपलें चित्त हें पिशाच आहे. व तें जे पदार्थ आपले नव्हेत, आपल्या आत्म्यापासून सर्वथा भिन्न आहेत त्यामध्यें स्वत्वाची कल्पना उत्पन्न करतें; आणि आपणास तें वारंवार भुरळ पाडतें. तेव्हां तें आपल्या आत्म्यांतून काढून टाकण्याचा उपाय ह्मणजे जीवादि पदार्थांचें स्वरूप समजून घेणें व त्यावर श्रद्धान ठेवणें आणि आपला आत्मा स्वस्वरूपामध्यें लीन ठेवणें हा होय. या उपायानें हें पिशाच आपल्या आत्म्याचा सम्बन्ध सोडून देईल. श्री अनंतजिनांनीं हाच उपाय अमलांत आणून या पिशाचाचें दमन केलें ह्मणून अनंतजित् हें त्यांचें नांव सार्थक होय.

तथा तज्जयं कुर्वन्नसौ कथम्भूत संजातः इत्याह:—

त्या पिशाचास जिंकून प्रभूनीं पुढें काय केलें हें आचार्य सांगतात.

कषायनाम्नां द्विषतां प्रमाथिना-

मशेषयन्नाम भवानशेषवित् ।

विशोषणं मन्मथदुर्मदामयं,

समाधिभैषज्यगुणैर्व्यलीनयत् ॥६७॥

**कषायेत्यादि**- **कषायनाम्नां** कषायसंज्ञानां **द्विषतां** । कथम्भूतानां? **प्रमाथिनां** प्रमथनशीलानां । **अशेषयन्** निःशेषतः क्षपयन् । किं तत्? **नाम** हृदि इत्यनुवर्तते। हृदि तेषां नामाप्यशेषयन् भगवाननन्तजिदशेषवित् सर्वज्ञः संपन्नः। न केवलं तेषां नाम अशेषयन् । **व्यलीनयत्** द्रवतां नीतवान् । विनाशितवानित्यर्थः । कं ? **मन्मथदुर्मदामयं** । मन्मथः कामः तस्य दुष्टो मदो दुरभिमानो दर्पः, स एवामयो व्याधिः, तम् । कथम्भूतं ? **विशोषणं** सन्तापकं । इत्थम्भूतं तदामयं कैर्व्यलीनयत् ? **समाधिभैषज्यगुणैः** समाधिर्ध्यानं स एव भैषज्यमौषधं तस्य गुणास्तदामयोपशमकरत्वादयस्तैः ।

मराठी अर्थः— मागील श्लोकांत लिहिलेल्या उपायांनीं श्री अनंत जिनांनीं त्या मताचा पराभव केल्यानंतर आत्म्यामध्यें विकार उत्पन्न करून आत्मिक गुणांचा विध्वंस करणाऱ्या कषायांचा नाश केला; व हमेशा आत्म्यामध्यें आकुलता अशान्ति उत्पन्न करणाऱ्या विषयाभिलाषरूपी रोगाचा ध्यानरूपी औषधाच्या कामरूपी रोग नाश करणाऱ्या, गुणांनीं नाश केला.

तात्पर्यः —श्री अनन्त जिनांनीं कषायांचा नाश केला, विषयाभिलाषारूपी रोग ध्यानरूपी औषधानें दूर केला.

ननु मन्मथ दुर्मदामये सति भोगकांक्षायाः प्रवृत्तेः कथं निराकुलः समाधिर्येतस्तदामयविनाशः स्यादित्याशंक्याह—

मदनरूपी रोगानें घेरल्यावर भोगादिक भोगण्याची इच्छा होणारच. मग निराकुळ ध्यान कसें करता येइल, ज्याच्यायोगें मदनरोगाचा नाश होऊं शकेल ? या प्रश्नाचें उत्तर या श्लोकांत देतात.

परिश्रमाम्बुर्भयवीचिमालिनी,
त्वया स्वतृष्णासरिदार्य शोषिता ।
असंगघर्मार्कगभस्तितेजसा,
परं ततो निर्वृतिधाम तावकम् ॥६८॥

परिश्रमेत्यादि—**परिश्रमः** खेदः स एव **अम्बु** यस्याः सा परिश्रमाम्बुः कासौ ? **स्वतृष्णासरित्** स्वस्य तृष्णा विषयाकांक्षा स्वतृष्णा सैव सरित् नदी । कथम्भूता ? **भयवीचिमालिनी** भयान्येव वीचयस्तरंगाः तेषां मालाः पंक्तयः ता यस्यां संति तथोक्ता सा **शोषिता** क्षयमुपनीता । केन ? **त्वया** अनंतजिता । **हे आर्य** साधो । केन कृत्वेत्याह **असंगेत्यादि** असंगो निःसंगता सकलसंगाभावः स एव घर्मार्को ज्येष्ठाषाढीयादित्य-

स्तस्य गभस्तयः किरणाः संततिः संगत्वाभ्यासविवेकोपयोगपरमध्यानादयः तेषां तेजः प्रतापस्तत्प्रयोगे सामर्थ्यं, अस्तगघर्मार्कगभस्तितेजसा । यत एवं नतस्तस्मात्कारणात् । परं प्रकृष्टं । निर्वृतेर्मोक्षस्य धाम अनंतज्ञानादि तेजः । तावकं त्वदीयम् ।

मराठी अर्थः—संपूर्ण परिग्रहांचा अभाव हाच कोणी एक ज्येष्ठ व आषाढ मासांतील सूर्य त्याच्या, निःसंगत्व, इंद्रियें ताब्यांत ठेवण्याचा अभ्यास, विवेक, शुभोपयोग व परमध्यान, अशा दीप्त किरणांच्या तेजानें–उष्णतेनें, दुःखरूपी पाण्यानें भरलेली, इहलोकभय, परलोकभय, मरणभय वगैरे भयरूपी लाटांच्या समूहानें हमेशा वर उसळणारी अशी ही विषय तृष्णारूपी नदी, हे जिनेश, अनंतनाथ आपण शोषून टाकली. यामुळेंच अनंत ज्ञानादि चतुष्टय जें मोक्षाची प्राप्ति करून देतें हेंच तुझें तळपणारें तेज आहे.

ननु भगवान्स्तुतिकारिणे लक्ष्मीं दत्तेऽन्यस्मै च दारिद्र्यमतः कथं वा ईश्वराद्विशिष्यते इत्याशंक्याह ।

भगवान् स्तुति करणाऱ्याचे मनोरथ पूर्ण करतात व आपली निंदा करणाऱ्याचा नाश करतात तर मग वीतराग कसे व महादेव विष्णु व ब्रह्मा यांच्यापेक्षां भगवंतामध्यें काय विशेषता आहे ? याचें उत्तर पुढील श्लोकांत आचार्य देतात.

सुहृत् त्वयि श्रीसुभगत्वमश्नुते,
द्विषँस्त्वयि प्रत्ययवत्प्रलीयते ।
भवानुदासीनतमस्तयोरपि,
प्रभो परं चित्रमिदं तवेहितम् ॥६९॥

सुहृदित्यादि—सुहृद्भक्तिकरः । क ? त्वयि । किं करोति ? श्रीसुभगत्वमश्नुते । श्रीसुभगत्वं लक्ष्मीवल्लभत्वं अश्नुते प्राप्नोति । द्विषन्नभक्तः त्वयि मिथ्यादृष्टिः प्रत्ययवत् प्रत्ययः क्विप् ज्ञानं वा तद्वत्प्रली-

**यते** विनश्यति । नरकादिदुःखमनुभवति इत्यर्थः । **भवान् पुनरुदासीनतमः** अतिशयेनोदासीनो मध्यस्थः, **तयोरपि** द्वयोरपि सुहृद्द्विषतोः । कथं तर्हि परमोदासीनाद्भवतः प्रागुक्तफलसिद्धिः इत्याह प्रभो इत्यादि । हे **प्रभो** स्वामिन्, **परं** प्रकृष्टं **चित्रं** आश्चर्यमद्भुतं **तव ईहितं** चेष्टितं, यदुदासीनोऽपि चिन्तामणिरिवानंतफलसम्प्राप्तिहेतुर्भवानिति ।

**मराठी अर्थ—हे जिनेश आपल्या चरणकमलीं भक्ति ठेवणारा भव्य प्राणी लक्ष्मीकडून आलिंगिला जातो— अर्थात् तो लक्ष्मीचा पति होतो. व आपला द्वेष करणारा अभक्त ( मिथ्यादृष्टि ) व्याकरण शास्त्रांत प्रसिद्ध असलेल्या क्विप् प्रत्याप्रमाणें नाश पावतो. ह्मणजे हे जिनेश, आपली निंदा करणाऱ्या दुष्टाला नरकादि दुर्गति प्राप्त होतात. तथापि आपण या दोषांबद्दल अगदीं उदासीन-मध्यस्थ आहात. हे प्रभो, आपलें चरित्र फारच आश्चर्यकारक आहे. कारण, आपण पूर्ण उदासीन असून देखील भक्ताला चिंतामणि रत्नाप्रमाणें इष्ट वस्तु देता; व अभक्तांस आपल्यापासून नरकादि दुःखें मिळतात. आपलें चरित्र जाणणें फार कठिण आहे.**

यदि भगवानुदासीनोऽपि स्तुतः स्तोतुर्विशिष्टफलसंपत्तिहेतुस्तदा भगवदीयं माहात्म्यं भवान् किं स्तोतुं समर्थः? इत्याह ।

जर भगवान् उदासीन असूनही स्तुति करणाऱ्याला मनोवांछित देतात तर अशा भगवंतांचें माहात्म्य आपण वर्णू शकतां काय असें विचारल्यामुळें आचार्य आपला अभिप्राय सांगतात.

त्वमीदृशस्तादृश इत्ययं मम,
प्रलापलेशोऽल्पमतेर्महामुने ।
अशेषमाहात्म्यमनीरयन्नपि,
शिवाय संस्पर्श इवामृताम्बुधेः ॥७०॥

**त्वमीदृश** इत्यादि–**त्वं** अनन्तजित्तीर्थकरदेवः । **ईदृशो**ऽनन्तरो-

क्तप्रकारः । **तादृशश्चिरोक्तप्रकारः** । **इति** एवं अयं स्तुतिरूपो **मम प्रलापलेशः** प्रलापस्य यत्किंचिद्भाषणस्य लेशो लवः। किंविशिष्टस्य मम ? **अल्पमतेर्**यथावद्भगवद्गुणपरिज्ञानहीनमतेः । यत एवाल्पमतिरहमत एवायं **मम** स्तुत्यंशः प्रलापलेशः । हे महामुने, सकलार्थप्रत्यक्षवेदिन्, तर्हि विफलो भविष्यतीत्याह–**अशेषेत्या**दि । अशेषं निरवशेषं तच्च तन्माहात्म्यं च गुणोत्कर्षः । **तदनीरयन्नपि** अब्रुवन्नपि । **अयं** मम प्रलापलेशः **शिवाय** मोक्षसुखसंपादननिमित्तं भवति । अत्रैव दृष्टान्तमाह–**संस्पर्श** इवेत्यादि । **इव**शब्दो यथार्थे । यथा **संस्पर्शः** संस्पर्शनं । **अमृताम्बुधेः** अमृतसमुद्रस्य । किंचिदपि अब्रुवाणस्तत्संस्पर्शिनः सुखं सम्पादयति तथा स्तुतिप्रलापलेशोऽपीति ।

**मराठी अर्थः—हे सर्वज्ञ ! आपण असे आहात आपण तसे आहात अशा तऱ्हेची जी मी आपली स्तुति केली ती अज्ञ अशा माझी केवळ थोडकीशी बडबड आहे. कारण, आपल्या अनंत गुणांचें वर्णन मजसारख्या पामराकडून कसें होईल बरें ! तथापि आपल्या दोन चार गुणांचें वर्णन देखील मोक्षसुखाची प्राप्ति करून देण्यास निमित्त होतें. जर अमृताच्या समुद्राचा स्पर्श देखील सुखद होतो तर त्या समुद्रामध्यें स्नान केल्यानें सुख होईल म्हणून काय सांगावयाचें.**

**तात्पर्य-श्री जिनेश्वराचें गुणवर्णन हें मोक्षप्राप्तीचें साधन होय. जरी आपण त्यांच्या सर्व गुणांचें वर्णन करूं शकत नाहीं तथापि यथाशक्ति त्यांच्या गुणांचें वर्णन आपण करावें असें ग्रंथकार सर्वांस सांगतात.**

याप्रमाणें अनंतनाथ तीर्थकराचें स्तवन संपलें.

अथ धर्मनाथस्तुतिः ।

धर्मतीर्थमनघं प्रवर्तयन्
धर्म इत्यनुमतः सतां भवान् ।
कर्मकक्षमदहत्तपोग्निभिः,
शर्म शाश्वतमवाप शंकरः ॥ ७१ ॥

**धर्मतीर्थ**मित्यादि । **धर्मतीर्थं** । धर्म उत्तमक्षमादिलक्षणः चारित्रलक्षणोवा । स एव तीर्थं, धर्मस्य वा तीर्थं तत्प्रतिपादक आगमः । कथंभूतं? **अनघं** अनवद्यं । **प्रवर्तयन्** कुर्वन् । **भवान् धर्म** इत्येवमन्वर्थसंज्ञकोनु**मतः सतां** गणधरदेवादिविपश्चितां । अपरमपि किं कृतवान्भवानित्याह—**कर्मे**त्यादि । कर्माण्येव कक्षं वनमटवी **तददहत्** दग्धवान् । कैः ? **तपोऽग्निभिः** । तपांस्येव अग्नयः तपोग्नयस्तैः । ततः किं ? **अवाप** प्राप्तवान् । किं तत् ? **शर्म** सुखं । कथंभूतं ? **शाश्वत**मविनश्वरं । अतः **शंकरो**ऽनुमतः सतां भवान् । शं सुखमात्मनः कर्मकक्षं दग्ध्वा सकलप्राणिनांच धर्मतीर्थं प्रवर्तयित्वा करोतीति शंकरः ।

मराठी अर्थः—हे जिनेश, आपण उत्तमक्षमादि दशधर्मांचा अथवा चारित्ररूपी धर्मांचा जगांत प्रसार केला किंवा धर्माचें स्वरूप दाखऊन देणाऱ्या पवित्र आगमाची जगांत प्रसिद्धी केली ह्मणून गणधरादिक सत्पुरुष आपणांस ' धर्म ' अशा सार्थक नांवानें हाक मारतात. हे जिनेश, आपण कर्मरूपी जंगल तपरूपी अग्नीनें जाळून टाकिलें व अखण्ड सुखाची प्राप्ति करून घेतली.

तात्पर्य—धर्मनाथ तीर्थकरांनीं धर्मांचा प्रसार केला. व कर्मांचा नाश करून स्वतःस सुखी केलें व धर्मांचा उपदेश करून सुखाची प्राप्ति करून घेण्याचा उपाय सांगितला. यामुळें भव्यजीवांना देखील आपण सुख दिलें ह्मणून भव्यजीव आपणांस ' शंकर असेंही ह्मणतात.

स इत्थंभूतो भगवान् किं कृतवानित्याह—

धर्म व शंकर या दोन नांवांला धारण करणाऱ्या भगवान् धर्मतीर्थकरांनीं काय केलें हें आचार्य या श्लोकांत दाखवितात.

देवमानवनिकायसत्तमै—
रेजिषे परिवृतो वृतो बुधैः ।
तारकापरिवृतोऽतिपुष्कलो,
व्योमनीव शशलाञ्छनोऽमलः ॥७२॥

**देवमानवेत्यादि—रेजिषे** शोभितवान् । किंविशिष्ट इत्याह—**परिवृतो** वेष्टितः । कैः ? **देवमानवनिकायसत्तमैः** देवाश्च मानवाश्च तेषां निकायाः समूहाः तेषु सत्तमा अतिशयेन प्रशस्ताः भव्या इत्यर्थः, तैः। न केवलं तैः परिवृतः किंतु बुधैः पंडितैः गणधरदेवादिभिः **वृतः** परिवारितः । क इव किंविशिष्टः केत्याह—तारकेत्यादि । **शशलाञ्छन** इव चंद्र इव । किंविशिष्टः ? **तारकापरिवृतः**तारकाभिः परि समन्ताद्वृतो वेष्टितः । पुनरपि कथंभूतः ? **अतिपुष्कलः** संपूर्णः । पुनरपि किंविशिष्टः ? **अमलो** न विद्यते घनपटलादिमलो यस्य । क ? व्योम्नि गगने ।

**मराठीः**—आकाशामध्यें नक्षत्रांनीं सर्व बाजूनें वेढलेला, मेघपटल अथवा ग्रहण वगैरेनीं रहित, सोळा कळांनी पूर्ण असलेला, असा चन्द्रमा जसा शोभतो तद्वत् देवमानव यांच्या मध्यें अतिशय श्रेष्ठ असलेल्या भव्य जीवांनीं व गणधरादिक विद्वान लोकांनीं वेढलेले हे जिनेश, आपण समवसरणामध्यें फारच शोभला.

ननु सिंहासनादिविभूतिसद्भावात्कथं भगवतो वीतरागता यतो हरिहरादेर्विशिष्टता स्यादित्यत्राहः—

सिंहासन छत्रचामर वगैरे ऐश्वर्य भगवन्ताजवळ असल्यामुळें ते वीतराग कसे व हें ऐश्वर्य असूनही हरिहरादिकांपेक्षां त्यांच्या मध्यें काय विशेषता दिसते याचें उत्तर आचार्य या श्लोकांत सांगतात.

प्रातिहार्यविभवैः परिष्कृतो
देहतोऽपि विरतो भवानभूत् ।
मोक्षमार्गमशिषन्नरामरा–
न्नापि शासनफलैषणातुरः ॥ ७३ ॥

**प्रातिहार्येत्यादि प्रातिहार्याणि च** सिंहासनादीन्यष्टौ । **विभवाश्च** समवसरणादिविभूतयः तैः, **परिष्कृतः** परिवृतः । **देहतोऽपि** न केवलं सिंहासनादिभ्यो **विरतो** विगतममत्वो वीतराग इत्यर्थः **भवान्** धर्मतीर्थंकरदेवः **अभूत्सं**जातः । इत्थम्भूतोऽपि भगवान् तीर्थंकरत्वपुण्यातिशयवशान्**मोक्षमार्गं** सम्यग्दर्शनलक्षणं **अशिषद्**व्युत्पादितवान् । कान्? **नरामरान्** नराश्चामराश्च तान् । किं तदुपदेशेन फलमित्याह नापीत्यादि । **नापि** नैव । शिष्यन्ते मोक्षमार्गं व्युत्पाद्यन्ते येन **तच्छासनं** प्रवचनं तस्य **फलं** तस्य **एषणा** इच्छा तस्या**मातुर** आदरपरः ॥

**मराठी अर्थ**—श्री धर्मनाथ तीर्थंकर सिंहासन, छत्र, चामर वगैरे आठ प्रातिहार्य व समवसरणादि संपत्ति या दोहोंनीं युक्त होते. तथापि यांच्यावर त्यांचें बिलकुल प्रेम नव्हतें. इतकेंच काय परन्तु शरीराविषयीं देखील ते पूर्ण विरक्त होते. तीर्थंकर प्रकृतीचा उदय असल्यामुळें मोक्षास कारण असलेल्या रत्नत्रयाचा त्यांनीं उपदेश दिला परन्तु ज्यांना आपण उपदेश देत आहो त्यांच्यापासून आपणांस कांहीं मिळावें अशी अणुमात्रही फलेच्छा त्यांना नव्हती.

तात्पर्यः—हरिहरादिक ऐश्वर्यशाली असतात परन्तु ते

त्यापासून विरक्त बिलकुल नसतात म्हणून ते संसारी असतात. वैराग्य त्यांच्या वाऱ्यासही उभें रहात नाहीं. यामुळें त्यांनां मरणोत्तर दुर्गतीस जावें लागतें. ज्याला पूर्ण व उत्कृष्ट वैराग्य झालें आहे. वैराग्याच्या शेवटच्या हद्दीला जो पोहोंचला आहे त्याच्याजवळ आपोआप लोकत्रयाची संपत्ति लोटांगण घालीत येते. आपण संपत्तीच्या मागें लागलों तर ती दूरदूर पळते. तीं आपला त्याग करते. व तिच्याविषयीं आपण उदासीन झालों म्हणजे ती आपला आश्रय करते. यास्तव श्री जिनेश तिच्याविषयीं पूर्ण उदासीन आहेत.

हरिहरादिक आपल्या भक्तांना उपदेश करतात याचें कारण हें कीं त्यांनीं आपली भक्ति करावी. परंतु श्री जिनेशांच्या स्वप्नीं देखील भक्तजनांनीं आपल्यावर प्रेम करावें ही गोष्ट आली नाहीं. ते निरिच्छ होऊन भव्यांना उपदेश देते झाले. यावरून हरिहर व श्री जिन यांच्यांतील विशेष वाचकांच्या नजरेस येईल.

यदि शासनफलैषणातुरो न भवति भवान् किमर्थं तर्हि विहरणादिकमित्यत्राह—

श्री जिनेशास उपदेशाच्या फलाची इच्छा नाहीं तर ते विहारादि कां करतात ? या प्रश्नाचें उत्तर.

कायवाक्यमनसां प्रवृत्तयो,
नाभवंस्तव मुनेश्चिकीर्षया ।
नासमीक्ष्य भवतः प्रवृत्तयो,
धीर तावकमचिन्त्यमीहितम् ॥७४॥

कायेत्यादि-कायश्च वाक्यं च मनश्च, तेषां प्रवृत्तयश्चेष्टाः नाभवन् न संजाताः । कया ! चिकीर्षया कर्तुमिच्छया । तर्हि अस-

**मीक्ष्य**कारित्वं भवत इत्यादित्यत्राह नेत्यादि । **नासमीक्ष्य** न वस्तुस्वरूपं यथावद्गत्वा । **भवतः प्रवृत्तयः** कायादिचेष्टाः हे **धीर** परीषहादिभ्यः परप्रश्नादिभ्यश्चाक्षुभितचित्त । **तावकं** त्वदीयं । **अचिन्त्यमद्भुतमीहितं** चेष्टितं । तीर्थकरनामकर्मोदयाद्भव्यप्राण्यदृष्टविशेषवशाच्च सर्वमेतद्भवति इत्यर्थः ।

**मराठी अर्थः—हे मुनिश्रेष्ठा जिनदेवा! आपल्या शरीराचे व्यापार, वाणीचे व्यापार व मनाचे व्यापार हे इच्छापूर्वक झाले नाहींत. वस्तूचें स्वरूप यथायोग्य न जाणतांच हे शारीरिक, वाचनिक व मानसिक व्यापार होत असतील असेंही नाहीं. कारण, आपण पूर्ण जाणते आहांत. इच्छापूर्वक शरीरादिकांचे व्यापार होत नाहींत. अज्ञानपूर्वक शरीरादिकांचे व्यापार होणें आपल्या ठिकाणीं अगदींच असंभवनीय. हीं दोन्ही कारणें नसतांही जर शरीरादिकाचें व्यापार होतात तर हे जिनेश, आपला प्रभाव अचिंत्य आहे यांत कांहीं संशय नाहीं.**

**विशेष स्पष्टीकरणः श्री जिनाचा देशोदेशीं विहार होणें, त्यांच्या मुखांतून दिव्य ध्वनि निघणें व त्यांचे मानसिक विचार चालणें ह्या क्रिया होण्यास विहायोगति व तीर्थकर कर्म कारण होत. विहायोगतिनें त्यांचा सर्वत्र विहार होतो व तीर्थकर कर्मानें त्यांच्या मुखांतून उपदेश निघतो. तसेंच हे वर सांगितलेलें व्यापार होण्यास भव्य जीवांचा पुण्य विशेष देखील कारण आहे. या दोन कारणांच्या साह्यानें श्री जिनाचे हे सर्व शारीरिक, वाचिक व मानसिक व्यापार होतात; हें सिद्ध होतें. केवलींच्या ठिकाणीं मानसिक व्यापार कसे असतात. व ते कोणत्या कर्माच्या उदयानें होतात. केवलींना अतींद्रिय ज्ञान असतें, त्यांना इंद्रियजन्य ज्ञान होत नाहीं यामुळें त्यांचें मानसिक व्यापार कसें होतात अशीही शंका येतें. या दोन**

शंकाचें उत्तर असें आहे—

मणसहियाणं वयणं दिट्ठं तप्पुव्वमिदि सजोगिम्हि ॥
उत्तो मणोवयारेणिंदियणाणेण हीणम्हि ॥२२७॥

इंद्रियज्ञान ज्या जीवांना असतें त्यांचें वचन मनःपूर्वक होत असतें. यास्तव इंद्रियज्ञानरहित अशा सयोग केवलींनाही उपचारानें मन आहे असें सांगितलें आहे. यद्यपि त्यांना मुख्यतया मन नाहीं तथापि त्यांचा दिव्यध्वनि होत असतो. परंतु आम्हांस मन नसेल तर आमच्या ठिकाणीं वचनप्रयोग संभवणार नाहीं; यास्तव केवलींना उपचारानें मन आहे असें म्हटलें आहे.

आम्हासारख्या निरतिशय पुरुषामध्यें असलेला स्वभाव पाहून सातिशय भगवंतामध्येंही त्या स्वभावाची कल्पना करणें अयुक्त आहे. परंतु अशी कल्पना करण्याचा हेतु काय आहे हें या गाथेंत सांगितलें आहे.

अंगोवंगुदयादो दव्वमणट्ठं जिणिंदचंदम्हि ।
मणवग्गणखंधाणं आगमणादो दु मणजोगो ॥

अंगोपांग नामकर्माच्या उदयानें हृदयाच्या ठिकाणीं विकसित अष्टदल कमलाच्या आकाराचें द्रव्यमन उत्पन्न होतें. यास्तव मनोयोग त्यांच्या ठिकाणीं उपचारानें आहे तात्पर्य— केवलींना द्रव्यमन आहे. भावमन नाहीं. तथापि मनोवर्गणायेत असल्यानें मनोयोग आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

न चान्यमनुष्याणां कार्यादिप्रवृत्तयश्चिकीर्षापूर्विकाः दृष्टा अतो भगवतोऽपि तास्तत्पूर्विका एव युक्ता इत्यभिधातव्यं यतः—

छद्मस्थ मनुष्यांचे सर्व व्यापार इच्छापूर्वक होतात यास्तव श्री जिनांचेही सर्व व्यापार तसेच झाले पाहिजेत हें म्हणणें योग्य नाहीं. कारण—

मानुषीं प्रकृतिमभ्यतीतवान्,
देवतास्वपिच देवता यतः ।

तेन नाथ परमासि देवता,

श्रेयसे जिनवृष प्रसीद नः ॥ ७५ ॥

मानुषीमित्यादि । मनुष्याणामियं **मानुषी** तां प्रकृतिं स्वभावं **अभ्यतीतवान्** अतिक्रांतवान् । कुतस्तामभ्यतीतवान् भवानिति चेत् ' नित्यं निःस्वेदत्वं निर्मलता क्षीरगौररुधिरत्वं ' इत्यादिस्वभावत्वात् । न केवलमेतस्मात्कारणात् । **देवतास्वपि** चंद्रेन्द्रादिष्वपि च न केवलं मनुष्येषु **देवता** पूज्यो यतः । **तेन** कारणेन तत्प्रकृतिमभ्यतीतत्वेन देवतात्वेन **हे नाथ** असि भवसि । **परमा** उत्कृष्टा **देवता** पूज्यतमो भवसीत्यर्थः । इत्थम्भूतस्त्वं हे **जिनवृष** देशजिनानां गणधरदेवादीनां वृषउत्कृष्ट । **प्रसीद** प्रसन्नो भव । नोऽस्माकं । किमर्थं ? **श्रेयसे** मोक्षाय मोक्षप्रदोऽस्माकं भवेत्यर्थः ।

**मराठी अर्थ**—वरच्या शंकेचें उत्तर या श्लोकांत आचार्यांनीं दिलें आहे. जिनेश्वराचे सर्व कायिक, मानसिक, वाचनिक व्यापार हे मनुष्याप्रमाणें होत नाहींत. कारण, त्यांनीं मनुष्याचा (सामान्य मनुष्याचा) स्वभाव ओलांडला आहे. ते असामान्य मनुष्य आहेत. जे गुण सामान्य मनुष्यामध्यें आढळून येत नाहींत अशा गुणांचे धारक श्री जिन आहेत ह्मणून त्यांनीं मनुष्यस्वभाव सोडून दिला असें ह्मणावयास कांहीं हरकत दिसत नाहीं. श्री जिनेश्वराचे हे असामान्य गुण आहेत कीं केव्हांही घाम येत नाहीं, शरीर सदा स्वच्छ राहतें, रक्त दुधासारखें पांढरें असतें. इत्यादि गुण मनुष्यामध्यें आढळून येत नाहींत. श्री जिनेश हे इन्द्रचन्द्र वगैरे देवतांना देखील पूजनीय आहेत. अर्थात् हे देखील श्री जिनेन्द्राची पूजा करतात. वास्तव गणधर देवामध्येंही श्रेष्ठ असलेल्या हे धर्मनाथ जिनदेवा, आपण सर्वोत्कृष्ट देवाधिदेव अहात. आपण प्रसन्न व्हा व आह्मांस मोक्षाची प्राप्ति करून द्या.

यात्रमाणें धर्मनाथ तीर्थंकराचें स्तवन संपलें.

अथ शांतिनाथस्तुतिः ।

विधाय रक्षां परतः प्रजानां,
राजा चिरं योऽप्रतिमप्रतापः ।
व्यधात्पुरस्तात्स्वत एव शांति-
र्मुनिर्दयामूर्तिरिवाघशांतिम् ॥ ७६ ॥

विधाय रक्षामित्यादि । **विधाय** कृत्वा । कां ? **रक्षां** पालनं । कासां ? **प्रजानां** । केभ्यः ? **परतः** शत्रुभ्यः । **चिरं** बहुतरकालं **राजा** सन् यः **शांतिर्जिनः अप्रतिमप्रतापः** अनल्पविक्रमः । एतत्कृत्वा पुनः किं कृतवान् इत्याह–व्यधादित्यादि । **व्यधात्** कृतवान् । कां ? **अघशान्तिं** अघस्य पापस्य शांतिं उपशमं प्रजानामात्मनश्च । कदा? **पुरस्तात्** पश्चात् । कोसौ ? शांतिः शांतिर्नाम जिनः । कथम्भूतः? **दयामूर्तिरिव** दयायाः कृपायाः मूर्तिरिव शरीरमिव । पुनरपि कथम्भूतः ? **मुनिः** निखिलार्थसाक्षात्कारी । कथं तां व्यधात् ? **स्वत एव** स्वयमेव न परतः ।

**मराठी अर्थः**–अनुपम पराक्रमाला धारण करणाऱ्या शांति तीर्थकरांनीं शत्रूपासून आपल्या प्रजेचें उत्तम प्रकारें पुष्कळ कालपर्यंत संरक्षण केलें. व राज्य केल्यानंतर त्यांनीं दीक्षा घेतली. दयेची साक्षात् मूर्ति अशा व संपूर्ण पदार्थांना जाणणाऱ्या या शांति तीर्थकरांनीं स्वतः आपल्या पापाची व प्रजेच्या लोकांच्या पापांची शांति केली.

**तात्पर्यः**–गृहस्थावस्थेंत त्यांनीं चांगल्या रीतीनें प्रजेचें शत्रूपासून रक्षण केलें. व तदनंतर ते मुनि झाले. त्यांनीं धर्माचरणानें स्वतःच्या पापांची शांति केली व लोकांसही धर्ममार्गास लाऊन त्यांचीं पापें दूर केलीं.

राज्यावस्थायां एतत्कृत्वा वीतरागावस्थायामेतत्कृतं भगवतेत्याह
श्रीशान्ति जिनांनीं गृहस्थावस्थेंत राज्यपालन केलें व वीतरागावस्थेमध्यें कर्मक्षय केला हें सांगतात.

चक्रेण यः शत्रुभयंकरेण,
जित्वा नृपः सर्वनरेन्द्रचक्रम् ।
समाधिचक्रेण पुनर्जिगाय,
महोदयो दुर्जयमोहचक्रम् ॥ ७७ ॥

चक्रेणेत्यादि। **चक्रेण** रथाङ्गेन । कथम्भूतेन? **शत्रुभयंकरेण** शत्रूणां भयंकरं भयजनकं तेन यः शान्तिर्जिनो गृहस्थावस्थायां **जित्वा** अभिभूय नृपः चक्रवर्ती संजातः । किं तज्जित्वा? **सर्वनरेन्द्रचक्रं** सर्वे च ते नरेन्द्राश्च राजानः तेषां चक्रं समूहं । वीतरागावस्थायां किं कृतवानित्याह-समाधीत्यादि । **समाधि**र्ध्यानं तस्य **चक्रं** समूहो धर्म्यशुक्लध्यानप्रपञ्चरूपः तेन । **पुनः** पश्चात् । **जिगाय**? किं **तद्दुर्जयमोहचक्रम्** दुर्जयश्चासौ मोहश्च मोहनीयं कर्म तस्य चक्रं मूलोत्तरप्रकृतिभेदप्रपञ्चं । किंविशिष्टो भगवान्? **महोदयो** महानुदयो गर्भावतारादिकल्याणपरंपरा यस्य सः ।

**मराठी अर्थः**—विरोध्यांना गर्वगलित करून सोडणाऱ्या भयंकर चक्रानें सर्व राजांच्या समूहास श्री शान्तिनाथांनीं जिंकलें व चक्रवर्ति पदवी मिळविली. मुनिपद धारण केल्यानंतर गर्भावतार वगैरे पञ्च कल्याणांचे अधिनायक अशा या शान्तिजिनांनीं धर्मध्यान व शुक्लध्यानांच्या समूहानें दुर्जय असलेल्या मोहनीय कर्माच्या मूल व उत्तर प्रकृतींचा नाश केला. तात्पर्य, शान्तिचक्रवर्तींनीं गृहस्थावस्थेंत विरोध्याना जिंकलें व मुनि होऊन मोहकर्माला जिंकलें.

सरागावस्थायां वीतरागावस्थायां च भगवानित्थंभूतया लक्ष्म्या शो-
भितवानित्य ह–

सराग व वीतराग या दोन अवस्थामध्यें थी शान्ति जिन कोणत्या लक्ष्मीला धारण करीत होते हें आचार्य सांगतात.

राजश्रिया राजसु राजसिंहो,
रराज यो राजसुभोगतन्त्रः ।
आर्हन्त्यलक्ष्म्या पुनरात्मतन्त्रो,
देवासुरोदारसभे रराज ॥ ७८ ॥

राजश्रियेत्यादि । **राज्ञः श्रीर्लक्ष्मी राजश्रीस्तया । राजसु** नृपतिषु मध्ये यः शांतिनाथो राजा **रराज** शोभितवान् । किंविशिष्टः? **राजसिंहः** राज्ञां सिंहो राजसिंहः प्रधानः। पुनरपि किंविशिष्टः? **राजसुभोगतन्त्रो** राज्ञां ये शोभनभोगास्तेषां तंत्र आयत्तः ते च तंत्रा आयत्ता यस्य । **पुनः** पश्चात् परमवीतरागावस्थायां **आर्हन्त्यलक्ष्म्या** अष्टमहाप्रातिहार्यादनन्तज्ञानादिलक्षणया । रराजेति सम्बन्धः । कथंभूतः? **आत्मतन्त्रः** स्वस्वरूपायत्तः। क रराजेत्याह **देवे**त्यादि । **देवाश्च असुराश्च** देवासुराः, **उदारा** महती समवसरणवर्तिनी **सभा** उदारसभा देवासुराणामुदारसभा देवासुरोदारसभं तस्मिन् । ' सभाराजाऽमनुष्यादिति नपुंसकता ।

**मराठी अर्थः**—राजश्रेष्ठ हे शान्तिनाथ जिन नानातऱ्हेच्या सुखाच्या उपभोगामध्यें निमग्न झाले. व संपूर्ण राजांमध्यें राजलक्ष्मीनें फारच शोभूं लागले. व दीक्षा घेतल्यानंतर स्वस्वरूपामध्यें–आत्मस्वरूपामध्यें निमग्न होऊन अर्हन्तावस्थेंतील लक्ष्मीनें स्वर्गवासी, भवनवासी, व्यन्तर व ज्योतिष्क या देवांनीं भरलेल्या मोठ्या सभेंत ( समवसरणांत ) शोभूं लागले.

**तात्पर्यः**—श्री शान्तिनाथ तीर्थकरांनीं राजलक्ष्मी पुष्कळ कालपर्यन्त धारण केली. तदनंतर दीक्षा घेऊन त्यांनीं चार

घाति कर्मांचा नाश करून आर्हन्त्यलक्ष्मी प्राप्त करून घेतली. आर्हन्त्य लक्ष्मी प्राप्त होण्यास चार घातिकर्मांचा नाश करावा लागतो. यांचा नाश केल्यापासून चार आत्मिक गुण प्रगट होतात. ते असें:—

ज्ञानावरण कर्माच्या नाशानें अनंतज्ञान-केवलज्ञान होतें.
दर्शनावरण कर्माच्या नाशानें अनंत दर्शन प्राप्त होतें.
मोहनीय कर्माच्या अभावानें अनंत सुख मिळतें.
व अंतराय कर्माच्या अभावें अनन्त शक्तिमान् आत्मा होतो.

आर्हन्त्यलक्ष्मी ही तेराव्या गुणस्थानांत ( सयोग केवल नांवाच्या गुणस्थानांत ) प्राप्त होते. त्यावेळेस तीर्थंकर प्रकृतीचा उदय होतो. त्याच्या योगें केवली जीवांना धर्मोपदेश करीत असतात.

अपरमपि सरागवीतरागावस्थायां किं किं संजातमित्याह—

सराग व वीतराग या आवस्थामध्यें अणखी श्री शान्तिनाथांना काय मिळालें हें सांगतात.

यस्मिन्नभूद्राजनि राजचक्रं,
मुनौ दयादीधितिधर्मचक्रम् ।
पूज्ये मुहुः प्राञ्जलि देवचक्रं,
ध्यानोन्मुखे ध्वंसिकृतान्तचक्रम् ॥७९॥

यस्मिन्नित्यादि । **यस्मिन्** शान्तिनाथे **राजनि** सति । **राजचक्रं** नृपनिसंघातः । **प्राञ्जलि** बद्धाञ्जलि **अभूत्संजातम्** । **मुनौ** यतौ सति. **धर्मचक्रं** धर्मश्चारित्रमुत्तमक्षमादिलक्षणो वा तस्य चक्रं समूहः **प्राञ्जलि** आत्मायत्तं अभूत् । कथम्भूतं ? **दयादीधिति** दया एव दीधितयः किरणाः यस्य, दया वा दीधितिः प्रकाशो यत्र । यदि वा मुनौ सकलार्थसाक्षात्कारिणि समुत्पन्नकेवलज्ञाने सति, **धर्मचक्रं** भगवतोऽग्रेसरं रथांगं **प्राञ्जलि** आत्माधीनमभूत् । **पूज्ये** समवसरणस्थितें, धर्मोपदेशके सति

**मुहुः** पुनः पुनः **प्राञ्जलि** बद्धाञ्जलि, **देवचक्रं** इन्द्रादिदेवसंघातोऽभूत्-**ध्यानोन्मुखे** ध्यानस्य व्युपरतक्रियानिवर्तिलक्षणस्य योगचरमसमयवर्तिनः **उन्मुखे** सति । **ध्वंसि** विध्वंसनशीलं **कृतान्तचक्रं** कर्मचक्रमभूत् ।

मराठी अर्थ—श्री शांतिनाथ तीर्थंकर राज्य करीत असतां सर्व राजे हात जोडून नम्र झाले. मुनिपद धारण केलें त्यावेळीं यांनीं दयारूपी किरणांना धारण करणारा उत्तम क्षमादिरूप दशधर्म आपल्या स्वाधीन करून घेतला. अथवा संपूर्ण पदार्थांना एकदम जाणणारें केवलज्ञान यांना झाल्यावर यांच्या पुढें धर्मचक्र नम्र होऊन चालू लागलें. पूज्य अशा शांतिजिनांनीं समवसरणांत बसून धर्मोपदेश केला त्यावेळीं इंद्रादि देवांच्या समूहानें नम्र होऊन वारंवार हात जोडले-भक्ति केली. अयोगिकेवली नांवाच्या चौदाव्या गुणस्थानांत प्रवेश करून शेवटच्या समयीं व्युपरतक्रियानिवृत्ति नांवाच्या चौथ्या शुक्लध्यानाच्या साहाय्यानें श्री शान्तिनाथ भगवन्तांनीं कर्मांचा नाश करून मुक्तिरमा मिळविली.

स्तोता स्तुतेः फलं याचमानः स्वदोषेत्याद्याह—

स्तुतिकार स्तुतीच्या फलाची इच्छा करतात.

स्वदोषशान्त्यावहितात्मशान्तिः,
शान्तेर्विधाता शरणं गतानाम् ।
भूयाद्भवक्लेशभयोपशान्त्यै,
शान्तिर्जिनो मे भगवान् शरण्यः ॥८०॥

**स्वदोषे**त्यादि । **स्वस्य दोषा** रागादयस्तेषां **शान्त्या** प्रक्षयेण **विहितात्मशान्तिः** विहिता कृता आत्मनः शान्तिः अनंतसुखप्राप्तिरूपा येन । एवंविधाया एव **शान्तेर्विधाता** कर्ता । केषां ? **शरणं गतानाम्** । संसारमहार्णवोत्तरणार्थमुपगतानां । इत्थम्भूतः **शान्तिर्जिनो**

भूयादस्तु। किमर्थं? **भवक्लेशभयोपशान्त्यै** भवश्च संसारः क्लेशाश्च दुःखानि भयानि च त्रासाः तेषामुपशान्तिरुपशमनं प्रक्षय इत्यर्थः तदर्थं। कस्य? **मे** मम स्तुतिकर्तुः। किंविशिष्टः **शान्तिः**? **जिनः** कर्मारातिजेता। पुनरपि किंविशिष्टः? **भगवान्** विशिष्टज्ञानवान्, इन्द्रादीनां पूज्यो वा। पुनरपि किंविशिष्टः? **शरण्यः** शरणेषु साधुः शरण्यः। त्राता इत्यर्थः॥

**मराठी अर्थः**—श्री शान्ति जिनांनीं आपल्या ठिकाणच्या रागादि दोषांचा नाश करून अनंत सुखरूप अशी शान्ति मिळविली. व संसारसमुद्रांतून तरून जातां यावें म्हणून शरण आलेल्या भव्य जीवांना परमशान्ति सुखाचा लाभ करून दिला केवलज्ञानसंपन्न, इंद्रादिपूज्य, सर्वांचें रक्षण करणारे, कर्मांचा नाश करणारे श्री शान्ति जिन संसारांत उत्पन्न झालेल्या माझ्या दुःखांचा, भीतींचा नाश करणारे व माझें संरक्षण करणारे होवोत.

**तात्पर्यः**— ग्रंथकारानें शांति जिनाचें स्तवन करून माझें संसारदुःख दूर करा, मी आपणांस शरण आलों आहे. अशी त्यांची प्रार्थना केली आहे. याशिवाय संसारसंबंधी कोणतेही पदार्थ त्यांनीं मागितले नाहींत. कारण, भगवंताची स्तुति करण्याचें हें फळ नव्हें कीं पुण्यानुबंधिनी विभूति मिळविण्यांत तें पर्याप्त व्हावें; असें ग्रंथकर्ता जाणून आहे.

याप्रमाणें शान्ति जिनाचें स्तवन संपलें.।

---

अथ कुंथुनाथ स्तुतिः ।

कुन्थुप्रभृत्यखिलसत्वदयैकतानः,<br>
कुन्थुर्जिनो ज्वरजरामरणोपशान्त्यै ।<br>
त्वं धर्मचक्रमिह वर्तयसि स्म भूत्यै,<br>
भूत्वा पुरा क्षितिपतीश्वरचक्रपाणिः ॥८१॥

कुंथुप्रभृतीत्यादिः । कुन्थुः सूक्ष्मप्राणी स प्रभृतिः आदिर्येषां अखिलसत्वानां ते तथोक्ताः तेषु दया करुणा एकः प्रधानभूतः तानोऽनंतो तस्याः विस्तार आमुक्तयस्य स तथोक्तः । कोसौ ? कुन्थुर्नाम जिनः त्वं । किं कृतवान् **वर्तयसिस्म** प्रवर्तितवान् । किंमत् ? **धर्मचक्रं** धर्मसंघातं क ? **इह** लोके । किमर्थं ? **भूत्यै** मोक्षलक्ष्म्यै । कथम्भूतायै ? **ज्वरजरामरणोपशान्त्यै** ज्वर इत्युपलक्षणं सकलव्याधीनां, ज्वरश्च जराच मरणच तेषामुपशांतिर्विनाशो यस्यां तस्यै । किं कृत्वा **भूत्वा क्षितिपतीश्वरचक्रपाणिः** चक्रं पाणौ यस्यासौ चक्रपाणिः, क्षितिपतीनां ईश्वरः स चासौ चक्रपाणिश्चक्रवर्ती भूत्वेत्यर्थः । कदा ? **पुरा** पूर्वं । किमर्थं तथाविधो भूतोऽयं ? भूत्यै राज्यविभूतिनिमित्त । भूत्यै इत्येतत्संदंशकन्यायेन पूर्वत्र इह चाभिसम्बध्यते ।

**मराठी अर्थः** –कुंथु वगैरे सर्व प्राण्यावर पूर्ण दया करणारे कुंथुनाथ तीर्थंकर जेव्हां गृहस्थावस्थेंत होते, त्यावेळीं राज्यप्राप्तिसाठीं संपूर्ण पृथ्वीचे शासन करणारे चक्रवर्ती झाले. चक्ररत्नाच्या प्रभावानें संपूर्ण भरतक्षेत्र त्यांनीं जिंकलें व चक्रवर्तित्व प्राप्त करून घेतलें. तदनंतर त्यांनीं गृहस्थावस्थेचा त्याग केला व सर्व व्याधि, वृद्धावस्था व मृत्यु यांचा विनाश करणाऱ्या मोक्षलक्ष्मीच्या प्राप्तिस्तव धर्मचक्र आपल्या हातीं घेतलें.

**तात्पर्य**—कुन्थुनाथ हे चक्रवर्ती होते व तीर्थंकरही होते.

यदि राज्यविभूतिसंपन्नो भगवाँस्तर्हि किमर्थं सा परित्यक्तेत्यत्राह
कुंथुनाथ जिनांनीं राज्य कां सोडलें हे आचार्य सांगतात.

तृष्णार्चिषः परिदहन्ति न शान्तिरासा-
मिष्टेन्द्रियार्थविभवैः परिवृद्धिरेव ।
स्थित्यैव कायपरितापहरं निमित्त-
मित्यात्मवान्विषयसौख्यपराङ्मुखोभूत् ॥८२॥

तृष्णेत्यादि–अभूद्भवान् । कथंभूतः? विषयसौख्यपराङ्मुखः । विषयाणां स्रग्वनितादीनां कार्यभूतं सौख्यं विषयसौख्यं तस्मिन् पराङ्मुखो निवृत्तेच्छः । किंविशिष्टः सन्? आत्मवान्वश्येन्द्रियः । कुतस्तथाभूतः सँस्तत्पराङ्मुखोभूदित्याह तृष्णेत्यादि । तृष्णा विषयाकांक्षास्ता एवार्चिषोऽग्निज्वालाः परि समन्ताद्दहन्ति । ननु मनुष्यमात्रं ताः परितापयन्ति तस्य अभिलषितविषयाप्राप्तेः नतु चक्रवर्तिनं विपर्ययादित्यत्राह–नेत्यादि न शान्तिरुपशम आसां तृष्णार्चिषां । कैः? इष्टेन्द्रियार्थविभवैः इष्टा मनोज्ञास्ते च ते इन्द्रियार्थाः स्वस्वविषयाः तेषां विभवाः संपत्तयस्तैः । कुतस्तैः तासां न शान्तिः? यस्मात्परिवृद्धिरेव परि समन्तात् वृद्धिरेव उत्कर्ष एव यतस्तैस्तासां ' लाभाल्लोभः प्रवर्तते ' इत्यभिधानात् ।

त्रिमात्रा चिन्तितं कार्यं त्रिकोट्या नैव पूर्यते । उक्तंच
यथा लाभस्तथा लोभो लाभाल्लोभः प्रवर्धते ॥

कथम्भूताः परितापयन्ति? स्थित्यैव स्वभावेनैव । यदि वा स्थित्यैव क्रियान्तरोपरमेणैव सन्ततमित्यर्थः । किं पुनः किंचिदपि तद्विभवैर्न क्रियते इत्यत्राह–कायेत्यादि । एते इष्टेन्द्रियार्थविभवाः कायस्य शरीरस्य परि समन्ताद्यस्तापः सन्तापः तं हरन्तीति कायपरितापहरं निमित्तं कारणं भवंति न पुनस्तृष्णार्चिषां उपशान्तिकरा भवन्ति इत्यर्थः । इति एवं ज्ञात्वा आत्मवान्विषयसौख्यपराङ्मुखोभूत् ॥

मराठी अर्थः–श्री कुंथुजिनेश्वरांनीं पुष्कळवर्षे चक्रवर्तिसु-

ख्याचा अनुभव घेतला. तदनंतर त्या सुखापासून त्यांना वैराग्य उत्पन्न झालें, ह्मणून त्यांनीं चक्रवर्ति पदाचा देखील त्याग केला. स्त्री, नाना तऱ्हेचे रत्नालंकार व अनेक प्रकारची भोगोपभोगाची सामग्री, जिच्यापासून इन्द्रियसौख्याची प्राप्ति होते; या सर्वांपासून ते पराङ्मुख झाले. त्यांनीं आपलीं इन्द्रियें पूर्ण ताब्यांत ठेविलीं. मनोवांच्छित व इन्द्रियांना तृप्त करणाऱ्या ऐश्वर्यानें तृष्णाग्नीच्या ज्वाला जास्तीच पेट घेतात. या ज्वालांचा नाश, आपणांस कितीही असलें ऐश्वर्य मिळालें तरी, होत नाहीं. उलट यांची वाढच होते. या आशारूपी अग्नीच्या ज्वालांनीं आत्मा सदोदित दग्ध होत असतो. या आशाग्नीच्या ज्वाला ज्यांना इन्द्रियांची तृप्ति करणारे पदार्थ मिळत नाहींत त्यांनाच जाळून भस्म करीत असतील असें नाहीं, तर चक्रवर्तीला देखील आपला प्रभाव या अवश्य दाखवितात. चक्रवर्तीला जरी उत्तम पदार्थ वरचेवर मिळत असतात तथापि, याही पेक्षां अधिक पदार्थ आपल्याजवळ असावेत असें त्याला वाटत असते. यास्तव तो देखील या आशाग्नीच्या ज्वालांनीं सदा होरपळत असतो. भोगोपभोगाच्या पदार्थांनीं केवळ शरीरास कांहीं वेळपर्यंत सुख मिळत असेल, शरीराचा दाह मिटत असेल, परंतु या पदार्थांच्या प्राप्तीमध्यें आशाग्नीच्या ज्वालांनीं होरपळणाऱ्या अंतःकरणाला अणुमात्रही शांति मिळत नाहीं. भोगोपभोगाचे पदार्थ अग्नीच्या ज्वालांना तीव्र दुःखदायक मात्र बनवितात. अशा तऱ्हेच्या विचारांनीं कुंथुजिनास वैराग्य उत्पन्न झालें.

किं पुनस्तत्पराङ्मुखेन भूत्वा कृतमित्याह—

विषयसौख्यापासून विरक्त होऊन त्यांनीं काय केलें हें ग्रंथकार सांगतात.

**बाह्यं तपः परमदुश्चरमाचरँस्त्व—**
**माध्यात्मिकस्य तपसः परिवृंहणार्थम् ।**
**ध्यानं निरस्य कलुषद्वयमुत्तरस्मिन्,**
**ध्यानद्वये ववृतिषेऽतिशयोपपन्ने ॥ ८२ ॥**

**बाह्यमित्यादि** । **आचरँ**स्त्वमाचरितवान् । त्वं कुंथुजिनः । किं तत् ? **तपः** । कथम्भूतं ? **बाह्य**मनशनादिलक्षणं । किंविशिष्टं ? **परमदुश्चरं**, परमं च तत् दुश्चरं च अतिदुष्करं । किमर्थं आचरँस्त्वमित्याह— **आध्यात्मिकस्ये**त्यादि । अध्यात्ममत्रमाध्यात्मिकं तस्य **तपसो** ध्यानलक्षणस्य **परि** समन्तादुद्बृंहणार्थं वृद्ध्यर्थं । अतो बाह्यं तप आचरन् **ववृतिषे** वर्तितवान् । क ? **ध्यानद्वये** धर्म्यशुक्ललक्षणे । कथंभूते ? **अतिशयोपपन्ने** परमातिशयं प्राप्ते । यदि वा अतिशयेन भेदेन उपपन्ने युक्ते धर्म्यं हि आज्ञापायविपाकसंस्थानलक्षणभेदयुक्तं, शुक्लध्यानं तु पृथक्त्वैकत्ववितर्कसूक्ष्मक्रियाप्रतिपातिव्युपरतक्रियानिवृत्तिलक्षणयुक्तं । पुनरपि कथम्भूते एतस्मिन्ध्यानद्वये ? **उत्तरस्मिन्**, आर्तरौद्रधर्म्यशुक्लानीति विन्यासापेक्षया उत्तरस्मिन् धर्म्यशुक्लरूपे । किं कृत्वा तथाभूते ध्यानद्वये ववृतिषे ? **निरस्य** । किं तत् ? **ध्यानं** । किंविशिष्टं ? **कलुषद्वय**मार्तरौद्ररूपम् ।

मराठी अर्थः – श्री कुन्थुजिनांनीं वैराग्य झाल्यावर अतिशय कठिण असें अनशन अवमोदर्य वगैरे सहा प्रकारचें बाह्य तपश्चरण करण्यास आरंभ केला. हें बाह्य तप, अभ्यन्तरतप जें प्रायश्चित्त, विनय, स्वाध्याय वगैरे सहा प्रकारचें आहे, त्याच्या वृद्धिसाठीं करावें लागतें. कारण, बाह्य तपानें मन स्वाधीन राहतें. तें आपलें ध्येय सोडून अन्यत्र भटकत नाहीं. यास्तव तें तप अवश्य केलें पाहिजे. बाह्य तपाचा त्याग करून अंतस्तप करूं म्हटलें असतां तें होणें शक्य नाहीं. कारण, बाह्य तप नस-

त्यामुळें इन्द्रियें अनावर होतात. त्यामुळें अंतस्तप होऊं शकत नाहीं. यास्तव बाह्य तपाची अवश्यकता आहे. बाह्य तप व अंतस्तप यामध्यें साध्यसाधन–भाव आहे. अंतस्तप साध्य हो-ण्यासाठीं बाह्य तप हें कारण मानलें आहे. ज्या तपांत आत्म्या-कडे जास्ती लक्ष दिलें जातें तें अंतस्तप होय. ध्यान चार त-ऱ्हेचें आहे. आर्तध्यान, रौद्रध्यान, धर्मध्यान व शुक्लध्यान. श्रीकुन्थुजिनांनीं आर्तध्यान व रौद्रध्यान या दोन कुध्यानांचा त्याग केला. कारण, या ध्यानानें बाह्य पदार्थावर अतिशय आ-सक्ति उत्पन्न होते. व मनामध्यें वाईट विचार उत्पन्न होतात. या ध्यानापासून क्रमानें तिर्यग्गति व नरकगति प्राप्त होते. धर्म व शुक्ल ध्यानें ही मोक्षाची प्राप्ति करून देण्यास समर्थ अस-तात. श्री कुंथुजिनांनीं या पुढच्या दोन ध्यानांत आपली अतिशय प्रगति करून घेतली.

तत्र वर्तित्वा किं कृतवानित्यत्र ह ।

धर्म्य व शुक्ल ध्यान हीं धारण करून प्रभूंनीं काय केलें हें सांगतात.

हुत्वा स्वकर्मकटुकप्रकृतीश्चतस्रो,
रत्नत्रयातिशयतेजसि जातवीर्यः ।
विभ्राजिषे सकलवेदविधेर्विनेता,
व्यभ्रे यथा वियति दीप्तरुचिर्विवस्वान् ।८४।

हुत्वेत्यादि । विभ्राजिषे भासितवान् । कथम्भूतः सन् ? विनेता प्रणेता । कस्य ? सकलवेदविधेः सकलस्य लोकालोकस्य वेदः परिज्ञानं सकलवेदः तस्य विधिः विधानं यस्मादसौ सकलवेदविधिरागमः तस्य । किं कृत्वा ? हुत्वा दग्ध्वा क्षयमुपनीय । काः ? स्वकर्मकटुक-प्रकृतीः, कटुकाः विरूपकफलदायिन्यः । ताश्च ताः प्रकृतयश्च, स्वक-र्मणां कटुकप्रकृतयः ताः । कति ? चतस्रो घातिचतुष्टयमित्यर्थः

क ता इत्येत्याह–रत्नेत्यादि रत्नानां सम्यग्दर्शनादीनां त्रयं तस्य अतिशयः प्रकर्षः, स एव तेजः कर्मेन्धनदहनस्वभावत्वात् तस्मिन् । किं विशिष्टः ? **जातवीर्यः** जातं प्रादुर्भूतं वीर्यं सामर्थ्यं यस्य सः । इत्थम्भूतो भगवान् क इव क विभ्राजिषे इत्याह व्यभ्रे इत्यादि । **विवस्वाना**दित्यो **यथा** यद्वत् विभ्राजिषे । कथम्भूतः ? **दीप्तरुचिः** दीप्ता रुचिर्यस्य । क ? **वियति** गगने । कथम्भूते ? **व्यभ्रे** विगतान्यभ्राणि यस्मिन् ॥

मराठी अर्थः—श्रीकुन्थुजिनांनीं शुक्ल ध्यानानें रत्नत्रयाची उन्नति करून घेतली, व जेव्हां रत्नत्रयरूपी अग्नि चांगला पेटला तेव्हां त्यांत कडू फल देण्यांत प्रवीण असलेल्या ज्ञानावरणादि चार प्रकृतींना समूळ जाळून टाकून त्यांचा पुरा बीमोड केला. हीं चार कर्में जाळलीं गेल्यानें श्रीकुंथुनाथ जिनास आत्मिक सामर्थ्य पूर्ण प्रगट झालें. व त्यायोगें श्री कुंथु जिनेश्वरांनीं संपूर्ण पदार्थांचें ज्ञान करून देणाऱ्या आगमाची रचना केली. निरभ्र आकाशांत सूर्य जसा आपल्या तेजस्वी किरणांनीं शोभतो तसें श्री कुंथुनाथ भगवान् आपल्या आत्मिक तेजानें शोभू लागले.

उक्तार्थफलं दर्शयन्नाह ।

मागें सांगितलेल्या अर्थाचा निष्कर्ष या श्लोकांत दाखवितात.

यस्मान्मुनीन्द्र तव लोकपितामहाद्या,
विद्याविभूतिकणिकामपि नाप्नुवंति ।
तस्माद्भवन्तमजमप्रतिमेयमार्याः,
स्तुत्यं स्तुवन्ति सुधियः स्वहितैकतानाः ।८५।

**यस्मा**दित्यादि । यस्मात्कारणात् । **मुनीन्द्र** यतिप्रभो **लोकपितामहाद्याः** लोकपितामहो ब्रह्मा आद्यो येषां ईश्वरकपिलसुगतानां ते तथोक्ताः । ते **नाप्नुवंति** न प्राप्नुवन्ति । कां ? **तव विद्याविभूति**-

**कणिकामपि** । विद्या केवलज्ञानं, विभूतिः समवसरणादिलक्ष्मीः । तव या विद्या विभूतिश्च तयोः कणिकामपि लवमपि। **तस्मात्कारणात्त्वं कुन्थु-**तीर्थकरदेवं । कथम्भूतं ? **अजं** न जायते इत्यजः तं जन्मरहितं । पुनरपि कथम्भूतं ? **अप्रतिमेयं** अपरिमेयं, अनन्तं केवलमित्यभिधानात् । पुनरपि कथम्भूतं ? **स्तुत्यं** स्तवार्हं। इत्थंभूतं भवन्तं स्तुवंति । के ते? **आर्याः** गणधरदेवादिमुनयः। किंविशिष्टाः ? **सुधियः** शोभना धीर्बुद्धिर्येषां । पुनरपि कथम्भूताः ? **स्वहितैकतानाः** स्वस्मै हितं निःश्रेयसं तदेकस्तानो विषयो येषां ते स्वहितैकतानाः । मोक्षकांक्षिण इत्यर्थः ॥

**मराठी अर्थः—हे मुनिश्रेष्ठा ! आपल्या ठिकाणीं पूर्णज्ञान व अनुपम ऐश्वर्य आहे. आपल्या ज्ञानाचा व ऐश्वर्याचा एक लवही ब्रह्मा, विष्णु महेश सुगत कपिल वगैरे कुदेवामध्यें आढळून येत नाहीं. यास्तव हे जिनेश कुंथुनाथ, जन्मरहित अनंत केवलज्ञानसंपन्न स्तवनार्ह असें आपण, मोक्षकांक्षी बुद्धिमान गणधरादिकांकडून हमेशा स्तविले जात आहांत.**

यामप्रमाणें कुंथुनाथ जिनाचें स्तवन संपलें.

---

टीपः—ब्रह्मादिकांच्या अपेक्षेनें भगवंतास जें विद्या व विभूतिमध्यें अधिक दाखविले त्यामुळें पुढें अजत्व आणि अप्रतिमेयत्व विशेषण जोडणें बरें दिसतें.

अथ अरनाथ स्तुतिः ।

गुणस्तोकं सदुल्लंघ्य तद्बहुत्वकथा स्तुतिः।
आनन्त्यात्ते गुणा वक्तुमशक्यास्त्वयि सा कथम् ॥८६॥

गुणस्तोकेत्यादि । गुणानां स्तोकं लवं सद्विद्यमानं । उल्लंघ्य अतिक्रम्य । तद्बहुत्वकथा तेषां गुणानां बहुत्वकथा बहुत्वकीर्तनं स्तुतिर्लोकप्रसिद्धा । सा स्तुतिः त्वयि अरतीर्थकरदेवे कथं कर्तुं शक्या ? कुतो न शक्या ? ते गुणा वक्तुमशक्या यतः । कुतस्ते तव गुणा वक्तुं न शक्यन्ते इतिचेत् आनन्त्यात् ।

अर्थः-थोड्या गुणांला तिखट मीठ लाऊन त्यांचें मोठ्या भक्तीनें वर्णन करणें यास जगामध्यें स्तुति ह्मणण्याचा प्रघात पडला आहे. परंतु हे अर जिन, आपल्या ठिकाणीं थोडकेच गुण असते तर ते वाढवून त्यांचें वर्णन केलें असतें. परंतु आपले अनंत गुण आहेत यास्तव आपली स्तुति होऊं शकत नाहीं. आपले जेवढे गुण आहेत तेवढ्या गुणांचें वर्णन जर आह्मी कांहीं करूं शकणार नाहीं तर आह्मी आपल्या गुणांचें वाढवून वर्णन कसें करणार ? यास्तव आपल्या एखाद्या दुसऱ्या गुणाच्या वर्णनास स्तुति ह्मणता येत नाहीं.

तर्हि मौनं कर्तव्यमित्यत्राह ।

जर गुण वर्णन करतां येत नाहीं तर मौन धारण करावें असे भगवंतांनीं ह्मटल्यावर आचार्य उत्तर देतात.

तथापि ते मुनीन्द्रस्य, यतो नामापि कीर्तितम् ।
पुनाति पुण्यकीर्तेर्नस्ततो ब्रूयाम किंचन ॥८७॥

तथापीत्यादि । तथापि त्वद्गुणानां वक्तुमशक्यत्वप्रकारेणाऽपि । ते तव । मुनीन्द्रस्य गणधरदेवादिमुनिस्वामिनः । यतो यस्मात्का-

रणात् । नामापि, न केवलं गुणाः । कीर्तितं स्तुतं भक्त्या उच्चारितं । पुनाति पवित्रीकरोति । नोऽस्मान् । कथम्भू स्य ते ? पुण्यकीर्तेः पुण्या प्रशस्ता कीर्तिर्वाणी ख्यातिर्वा यस्य । पुण्याय वा पुण्यनिमित्तं कीर्तिः स्तुतिर्यस्य स पुण्यकीर्तिस्तस्य । यत एव ततस्तस्मात्कारणात् । ब्रुयाम स्वशक्त्या भक्त्या च स्तुयाम । किंचन तव गुणलवमात्रम् ।

अर्थः-पवित्र दिव्यध्वनीला धारण करणाऱ्या आपल्या पवित्र कीर्तिनें भूमंडलास भरून टाकणाऱ्या, किंवा आपली स्तुति करणाऱ्यास पवित्र करून सोडणाऱ्या हे मुनिश्रेष्ठा ! गणधरादिकांच्या अधिपते ! आपले गुण तर दूरच राहोत केवळ नांव देखील जर आह्मी भक्तीनें उच्चारिलें तर तें आमचें पाप नाहींसें करतें, आह्मांस पवित्र बनवून सोडतें. ह्मणून हे जिनेश अरनाथ, आपले गुण अनंत असल्यामुळें आह्मी त्यांचें वर्णन करण्यास असमर्थ असलों तरी स्वशक्तीनें व भक्तीनें आपल्या गुणांच्या लवाचेंच वेड्यावाकड्या शब्दांनीं आह्मी वर्णन करूं.

तदेवाह-

गुणलव वर्णनास प्रारंभ.

लक्ष्मीविभवसर्वस्वं, मुमुक्षोश्चक्रलांछनम् ।
साम्राज्यं सार्वभौमं ते, जरत्तृणमिवाभवत् ॥८८॥

लक्ष्मीत्यादि । ते तव । जरत्तृणमिवाभवत् जीर्णतृणमिव संजातं । किं तत् ? साम्राज्यं, कथम्भूतं ? सार्वभौमं सर्वभूमौ भवं सार्वभौमं । पुनरपि कथंभूतम् ? चक्रलांच्छनं चक्रं लांछनं चिह्नं यस्य । पुनरपि किंविशिष्टं ? लक्ष्मीविभवसर्वस्वं लक्ष्म्याः विभवो विभूतिः सर्वस्व आत्मीयो यस्य । कथम्भूतस्य ते? मुमुक्षोः सर्वसंगपरित्यागमिच्छोः ॥

मराठीअर्थः—लक्ष्मीचें सगळें ऐश्वर्य ज्यांत एकत्र झालें

आहे असें चक्रवर्तिपदाचें द्योतक सर्व भरतखण्डाचें राज्य, हें वैराग्यपूर्ण जिना ! आपणांस जीर्ण झालेल्या गवताप्रमाणें वाटलें.

तात्पर्य:—सांसारिक मनुष्याच्या ऐश्वर्याची शेवटची हद्द ह्मणजे चक्रवर्तिपद प्राप्त होणें हें होय. परंतु अरतीर्थकरांस हें सर्वोत्कृष्ट ऐश्वर्यही तुच्छ वाटलें व त्यांनीं त्याचा गवताच्या काडीप्रमाणें त्याग केला. अक्षय सुखाची प्राप्ति व्हावी--अखण्ड मुक्तिसाम्राज्य मिळावें ह्मणून दीक्षा घेतली.

एवमात्मगतं परमवीतरागत्वगुणं प्रदर्श्य शरीरगतं गुणं प्रदर्शयन्नाह ।

याप्रमाणे आत्मिक पूर्ण वैराग्यगुणाचें स्वरूप ग्रंथकारानें दाखविलें आतां श्री अरतीर्थकराच्या शारीरिक गुणाचें वर्णन ग्रंथकार करतात.

तव रूपस्य सौन्दर्यं दृष्ट्वा तृप्तिमनापिवान् ।
द्व्यक्षः शक्रः सहस्राक्षो बभूव बहुविस्मयः ॥ ८९ ॥

तवेत्यादि । तव रूपस्य त्वदीयशरीरमूर्तेः, सौन्दर्यं रमणीयतां दृष्ट्वा । तृप्तिं दर्शनाकांक्षापरिपूर्तिं, अनापिवान् प्राप्तवान् । कोसौ ? शक्रः । कथम्भूतः ? द्व्यक्षः द्वे अक्षिणी लोचने यस्यासौ द्व्यक्षः । पश्चाद्बभूव संजातः । किंविशिष्टः ? सहस्राक्षः सहस्रमक्ष्णां यस्यासौ सहस्राक्षः सहस्रलोचनः । न केवलं सहस्राक्षो बभूव, बहुविस्मयः अनेकाश्चर्यश्च बभूव ॥

हे प्रभो ! आपले शरीरसौंदर्य दोन डोळ्यांनीं पाहून तृप्ति न झाल्यामुळें इंद्र हजार डोळे उत्पन्न करून आपलें देहलावण्य पाहू लागला. तथापि त्याच्या हजार डोळ्यांचें पारणें न फिटल्यामुळें तो फारच आश्चर्यचकित झाला.

तात्पर्य— श्री अरजिनाचें सौंदर्य लोकोत्तर होतें.

इदानीं अंतरंगमोहशत्रुपराजयलक्षणं गुणं भगवतः स्तुवन्नाह—
श्री अरजिनांनीं अंतरंग मोहशत्रूचा पराजय केला यास्तव
भगवन्ताच्या या गुणाचें वर्णन करतात.

**मोहरूपो रिपुः पापः कषायभटसाधनः ।**
**दृष्टिसम्पदुपेक्षास्त्रैस्त्वया धीर पराजितः ॥९०॥**

**मोहरूप** इत्यादि । मोह इत्युपलक्षणं ज्ञानावरणादिघातिकर्मणाम् । मोहो मोहनीयं कर्म रूपं स्वभावो यस्य स **मोहरूपः** । कोसौ ? **रिपुः** शत्रुः । कथम्भूतः ? **पापः** पापरूपः । घातिचतुष्टयं हि पापमुच्यते '**सद्वेद्यशुभायुर्नामगोत्राणि पुण्यम्, अतोन्यत्पाप**' मिति वचनात् । पुनरपि कथम्भूतः ? **कषायभटसाधनः** । कषाया एव भटास्त एव साधनं सैन्यं तंत्रं यस्य । इत्थम्भूतो रिपुस्त्वया मुनींद्रेण **पराजितो** निर्मूलितः । हे **धीर** परिषहादिभ्योऽक्षोभितचित्त । कैः कृत्वेत्याह **दृष्टी**त्यादि । दृष्टिः सम्यग्दर्शनं पद्यते गम्यतेऽर्थो यया सा पत् प्रतिपत्तिः । समीचीना पत् संपत् सम्यग्ज्ञानमित्यर्थः । उपेक्षा परमौदासीन्यलक्षणं चारित्रं । दृष्टिश्च सम्पच्चोपेक्षा च ता एवास्त्राणि प्रहरणानि तैः ॥

**मराठी अर्थः**—परिषह, उपसर्ग इत्यादिकापासून तिळमात्रही न भिणाऱ्या हे धीर अरजिना ! नरकादि कुगतिमध्यें ढकलून देणाऱ्या व कषायरूपी शूर सैन्य ज्यानें स्वतः जवळ बाळगलें आहे अशा दुष्ट मोहरूपी शत्रूस आपण सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र या तीन अमोघ अस्त्रांनीं पूर्ण जिंकिलें.

**विशेष स्पष्टीकरणः**—या श्लोकांत 'मोहरूप' हा शब्द आला आहे त्याचा अर्थ केवळ मोहनीय कर्म असाच नव्हे. 'ज्ञानावरणादि चार घातिकर्में' असा मोह या शब्दाचा अर्थ

होतो. जसें मांजर घरांत शिरेल बरें कां ? असें आपण ह्मणतो. येथें मांजरानें मात्र घरांत शिरू नये, इतर प्राणी शिरल्यास कांहीं हरकत नाहीं; असा जर कोणी विपरीत अर्थ केल्यास आपण त्यास ' वेडा आहे ' असें ह्मणूं. तेव्हां या ठिकाणीं मांजर या शब्दानें मांजराचा बोध होऊन इतर प्राण्यांचा देखील बोध होतो. तद्वत्च मोह या शब्दाचा देखील अर्थ समजावा. या चार घाति कर्मामध्यें मोहकर्म हें बलाढ्य आहे. मुनिजन याचाच प्रथम नाश करतात. जोपर्यंत या कर्माचा नाश होणार नाहीं तोपर्यंत केवलज्ञानाचा उदय होणें अशक्य आहे. प्रथमतः मोहनीय कर्म नष्ट होतें. यांचा नाश झाल्यावर तदनंतर ज्ञानावरण, दर्शनावरण व अंतराय या तीन कर्मांचा नाश करण्यास फारच सोपें जातें. मोह कर्माच्या आश्रयानें हीं कर्में आपलें प्रभुत्व आत्म्यावर दाखविनात. मोह कर्माला सर्व कर्मांचा राजा असें ह्मटलें आहे. राजाला जिंकल्यावर त्याचें सैन्य जिंकण्यास उशीर लागत नाहीं. ही तीन कर्में देखील समर्थ असल्यामुळें यांना देखील मोह असें ह्मटलें आहे. मोहनीय कर्माचा श्री जिनानें विध्वंस केला याचा अर्थ जिनानें मोहकर्मासह तीन कर्मांचा नाश केला असाच होतो. ज्यावेळेस याकर्मांचा नाश होतो त्यावेळेस मुनीश्वरांस श्री जिन अशी संज्ञा प्राप्त होते. या चार कर्मांना घातिकर्म किंवा पापकर्म असें ह्मणतात. यास्तव प्रथमतः अरजिनांनीं या पापकर्मास जिंकलें.

मोहजयाद्यज्जातं तद्दर्शयन्नाह—

मोहकर्माचा पराभव केल्यावर अरतीर्थकरांना काय प्राप्त झालें हें दाखवितात.

कंदर्पस्योद्धुरो दर्प—
स्त्रैलोक्यविजयार्जितः ।

ऱ्हेपयामास तं धीरे,

त्वयि प्रतिहतोदयः ॥ ९१ ॥

कंदर्पस्येत्यादि । कंदर्पस्य कामदेवस्य । उद्धुरः उल्बण उत्कट.। दर्पोऽहकारः । कथम्भूतः ? त्रैलोक्यविजयार्जितः त्रैलोक्यस्य विजयस्तेन अर्जित उपार्जितः । ऱ्हेपयामास लज्जां नीतवान् । तं कंदर्पं । कथम्भूतः सन् ? प्रतिहतोदयः प्रतिहतो विनाशित उदयो यस्यासौ प्रतिहतोदयोऽलब्धास्पदः । क ? त्वयि । कथम्भूते ? धीरे अक्षुभितचित्ते ।

मराठी अर्थः संपूर्ण त्रैलोक्याला जिंकल्यामुळें उत्पन्न झालेला मदनाचा उत्कट गर्व, धीर अशा हे अर जिनेश, आपल्यावर बिलकुल प्रभाव चालवूं शकला नाहीं. उलट मी त्रैलोक्यास देखील जर्जर करून सोडलें असें म्हणणाऱ्या मदनाच्या गर्वानें मदनासच लाजविलें.

तात्पर्यः—श्री अरजिनेश्वरानें जसा मोहाचा पराभव केला तसा या मदनाचाही पराभव केला. मदनास, मी त्रैलोक्यास जिंकलें आहे; माझ्यासारखा शूर कोण आहे, असें वाटत होतें. त्यानें सर्व त्रैलोक्य वश केलें होतें. परंतु श्री जिनेश्वरास तो आपल्या कह्यांत आणू शकला नाहीं.

एकदा रति व मदन हे विहार करण्यासाठीं निघाले असतां त्यांनीं वाटेंत श्री जिनेश्वरास पाहिलें. त्यावेळेस रति व मदन यांच्यामध्यें जो मजेदार संवाद झाला त्याचें येथें वर्णन केल्यास तें विसंगत दिसणार नाहीं असें वाटतें. तें वर्णन असें—

कोऽयं नाथ जिनो भवेत्तव वशी हुं हुं प्रतापी प्रिये ।
हुं हुं तर्हि विमुंच कातरमते शौर्यावलेपक्रियाम् ।
मोहोऽनेन विनिर्जितः प्रभुरसौ तत्किंकराः के वयम् ।
इत्येवं रतिकामजल्पविषयः स श्रीजिनः पातु वः ॥१॥

रति–प्राणनाथ, हे कोण आहेत ?

मदन–हे जिनेश्वर आहेत.

रति–आपण सर्व विश्वाला स्वतःच्या आधीन केलें आहे ना ? मग यांनाही वश केलेंच असेल ?

मदन–प्रिये, हे फारच थोर आहेत. हे माझ्या स्वाधीन कसचे होतात. यांच्यापुढें माझी दाळ बिलकुल शिजली नाहीं. यांना पाहिलें कीं माझ्या अंगांत कापरेंच भरतें.

रति–वाहवा, तर मग आपण पुरे भ्याड आहात असेंच ना ! आणि माझ्यापुढें जे आपल्या शौर्याचे पोवाडे आपण गाता ते केवळ आपला भितेपणा दिसू नये एवढ्याच करितां कां ?

मदन–प्रिये, तूं माझ्यावर भित्रेपणाचा जो आरोप केलास तो व्यर्थ आहे. अग राजाधिराज व पराक्रमी अशा मोह सम्राट्चा देखील यांनीं युद्धांत पराभव केला तर मग आम्ही तर या मोह सम्राटाचे नोकर. आमचा श्रीजिनेश्वरापुढें काय पाड. याप्रमाणें ज्यांना पाहून रति व मदन यांच्यामध्यें असा संवाद झाला ते श्रीजिनेश्वर सतत संरक्षण करोत.

मोहे कन्दर्पे च विनिर्जिते यज्जातं तद्दर्शयन्नाह ।

भगवंतांनीं मोह व मदन यांना जिंकल्यावर पुढें आणखी काय केलें हें ग्रंथकार सांगतात.

आयत्त्यां च तदात्वे च,
दुःखयोनिर्दुरुत्तरा ।
तृष्णानदी त्वयोत्तीर्णा,
विद्यानावा विविक्तया ॥ ९२ ॥

आयत्यामित्यादि । तृष्णैव नदी तृष्णानदी । त्वया भगवन्..

**उत्तीर्णा** तृष्णानद्या दूरे भगवान्व्यवस्थित इत्यर्थः ॥ कया ? **विद्या-नावा** विद्येव नौस्तया । कथम्भूतया ? **विविक्तया** विशुद्धया निर्दोषया । किंविशिष्टासौ ? **दुरुत्तरा** दुःखेन महता कष्टेन उत्तीर्यते इति । पुनरपि कथम्भूता ? **दुःखयोनिः** दुःखस्य योनिरुत्पत्तिहेतुः । कदा ? **आयत्यां च** परलोके **तदात्वे च** इहलोके । चकार उभयत्र परस्पर-समुच्चये ॥

**मराठी अर्थः**—हे प्रभो, निर्दोष ज्ञानरूपी नौकेनें इह पर-लोकीं दुःखोत्पत्ति करणारी व मोठ्या कष्टानें जी तरूं शकू अशी आशारूपी नदी आपण तरून गेला.

**तात्पर्य**—जेव्हां मोह व मदन यांचा पराभव श्रीजिनेश्व-रांनीं केला तेव्हां त्यांना निर्मल ज्ञानाची प्राप्ति झाली. व जेव्हां ज्ञानरूपी नौका त्यांच्या हातांत आली तेव्हां दुर्लंघ्य अशी आशानदी देखील तरून ते पर तीराला जाऊन पोहोचले.

मोहकामतृष्णोन्मूलने च यज्जातं तद्दर्शयन्नाह ।

मोह, काम व आशा या त्रयीला जिंकल्यावर भगवंतांना काय प्राप्त झालें हें दाखवितात.

**अन्तकः क्रन्दको नृणां,**
**जन्मज्वरसखा सदा ।**
**त्वामन्तकान्तकं प्राप्य,**
**व्यावृत्तः कामकारतः ॥ ९३ ॥**

**अन्तक** इत्यादि । **अन्तको** यमः । कथम्भूतः ? **क्रन्दकः** आक्रन्द-नहेतुः । केषां ? **नृणां** । पुनः कथम्भूतः ? **जन्मज्वरसखा** जन्म च ज्वरश्च तयोः सखा । कदा ? **सदा** सर्वकालं । स इत्थम्भूतोऽन्तको **व्यावृत्तः** उपरतः ? कस्मात् ? **कामकारतः** कामेन इच्छया करणं कामकारः तस्मात्कामकारतः यदृच्छावृत्तितः । त्वयि प्रतिहतेच्छः संपन्न

इत्यर्थः । किं कृत्वासौ यतो व्यावृत्तः ? प्राप्य । कं ? त्वां अरतीर्थंकरदेवं । कथम्भूतं ? अन्तकान्तकं अन्तकस्य यमस्य अंतकं विनाशकं ॥

**मराठी अर्थः**—यम हा मनुष्यादि प्राण्यांना रडविणारा आहे. व तो जन्म व ज्वरादि रोगांचा मित्र आहे. परंतु हे जिनेश, आपण त्या यमाचाही नाश करणारे असल्यामुळें यम हा आपण होऊनच आपल्याकडे पाठ करून निघून गेला. तात्पर्य यमाला जिनेशांनीं जिंकलें ह्मणून ते अविनाशी पदास पोहोचले. व जन्म ज्वरादिकांचा श्रीजिनांनीं नाश केल्यामुळें त्यांच्या मित्राचा—यमाचा त्यांना नाश करता आला.

ननु भगवति मोहादिप्रक्षयः कुतोऽवगत इत्याह—

श्री जिनांच्या ठिकाणी मोहादिकांचा अभाव झाला हें आपण कसें जाणलें या शंकेचें उत्तर—

भूषावेषायुधत्यागि,
विद्यादमदयापरम् ॥
रूपमेव तवाचष्टे,
धीर दोषविनिग्रहम् ॥ ९४ ॥

भूषेत्यादि । तव रूपमेवाचष्टे कथयति । कं ? दोषविनिग्रहं दोषस्य मोहादेर्विनिग्रहं प्रक्षयं । धीर अरस्वामिन् । कथम्भूतं रूपं ? भूषावेषायुधत्यागि । भूषा अलंकारः । कटककटिसूत्रादिः । वेषः शरीरोत्कर्षः उद्धततादिः । आयुधं प्रहरणं । तानि त्यजतीत्येवंशीलं । पुनरपि कथम्भूतं ? विद्यादमदयापरं परमज्ञानोपशमकारुण्यतंत्रम् ॥

**मराठी अर्थः**—हे धीर अरजिनेश, कटक कुंडल, कमरपट्टा इत्यादि अलंकार व वेष आणि नाना तऱ्हेचीं आयुधें-शस्त्रें

यांनीं रहित व निर्मल ज्ञान, पूर्ण इंद्रियजय व परम दयेनें भरलेलें असें हें आपलें स्वरूपच, आपण मोह, मदन व मृत्यु यांचा नाश केला आहे असें आह्मांस स्पष्टपणें सांगत आहे.

अपरमपि तन्निग्रहे यज्जातं तद्दर्शयन्नाह--

मोहादिकांचा विनाश केल्यानें श्री जिनेशास काय प्राप्त झालें हें सांगतात.

समंततोंगभासां ते,
परिवेषेण भूयसा ॥
तमो बाह्यमपाकीर्ण–
मध्यात्मं ध्यानतेजसा ॥ ९५ ॥

समंतत इत्यादि । समंततः सर्वतः अंगभासां शरीरतेजसां । ते तव परिवेषेण परिमण्डलेन । कथम्भूतेन? भूयसा महता तमोऽन्धकारः । कथम्भूतं ? बाह्यं । अपाकीर्णं ध्वस्तं । अध्यात्ममभ्यंतरं तमो ज्ञानावरणादिलक्षणं ध्यानतेजसा अपाकीर्णम् ।

मराठी अर्थः–हे अरजिनेश ! चोहीकडे पसरलेल्या आपल्या शरीराच्या मोठ्या प्रभेनें आपण बाह्य अंधकाराचा नाश केला व ध्यानरूपी तेजानें आत्म्यामध्यें पसरलेला ज्ञानावरणादिरूपी अंधकार आपण नाहींसा केला.

एवमपायातिशयं स्तुत्वा भगवतः पूजातिशयं स्तोतुमाह–

श्रीजिनाच्या मोहविनाशादि अतिशयाची स्तुति करून ग्रंथकार श्री जिनाची सर्वजनपूज्यता दाखवितात.

सर्वज्ञज्योतिषोद्भूत–
स्तावको महिमोदयः ।

कं न कुर्यात्प्रणम्रं ते,

सत्त्वं नाथ सचेतनम् ॥ ९६ ॥

सर्वज्ञेत्यादि । ( १ ) सर्वज्ञस्य ज्योतिरनंतज्ञानं तेन उत्कर्षेण उद्भूतो जातः । कोसौ ? महिमोदयः महिम्नो माहात्म्यस्य उदयः प्रादुर्भावः । किंविशिष्टः ? तावकस्त्वदीयः । कं न कुर्यादपि तु कुर्यादेव । कं ? सत्वं । प्राणिनं । कथम्भूतं ? सचेतनं गुणदोषविवेकचतुरं । कथम्भूतं कुर्यात् ? प्रणम्रं प्रणमनशीलं । ते तव ॥

मराठी अर्थः हे अर प्रभो ! सर्व पदार्थांना जाणणाऱ्या आपल्या ज्ञानरूपी ज्योतीनें-प्रकाशानें प्रगट झालेलें आपलें महत्व-पूज्यत्व कोणत्या गुणदोषांचा विचार करणाऱ्या प्राण्याला नम्र बनविणार नाहीं बरें ? आपलें माहात्म्यच असें आहे कीं तें सर्व प्राण्यांना आपल्या पायांचें भक्त बनवितें.

अथेदानीं भगवतो वागतिशयं स्तुवन्नाह ।

आतां श्रीजिनाच्या वचनांचे-दिव्य ध्वनीचें माहात्म्य सांगतात.

तव वागमृतं श्रीमत्,

सर्वभाषास्वभावकम् ।

प्रीणयत्यमृतं यद्वत्,

प्राणिनो व्यापि संसदि ॥ ९७ ॥

तवेत्यादि । तव संबंधि वागेवामृतं वागमृतं अनंतसुखहेतुतया प्राणिनामाप्यायकत्वात् । कथम्भूतं ? श्रीमत् यथावन्निखिलार्थप्रतिपादनलक्षणा श्रीर्विद्यते यस्य तच्छ्रीमत् । पुनरपि कथम्भूतं ? सर्वभाषास्वभावकम् सर्वभाषा स्वभावो यस्य तदित्थम्भूतं । तव वागमृतं प्रीणयति सन्तर्पयति । कान्? प्राणिनः । किंवत् ? अमृतं यद्वदमृतं यथा । किंविशिष्टं ? व्यापि । क्व ? संसदि समवसरणरूपायाम् ॥

मराठी अर्थः —हे प्रभो अर जिनेश! प्राण्यांना अनन्त सुखाची प्राप्ति करून देण्यास कारण असलेलें दिव्यध्वनिरूप अमृत, संपूर्ण पदार्थांना प्रतिपादन करण्याच्या शक्तीनें युक्त आहे; व तें सर्व भाषांमध्यें परिणत होतें. भिन्न भिन्न भाषा जाणणाऱ्या प्राण्यांना आपला दिव्यध्वनि सर्व भाषेंत परिणत होतो असें म्हटलें आहे. अशा तऱ्हेचें हें वचनामृत संपूर्ण समवसरणांत व्यापून राहतें व तें अमृताप्रमाणें प्राण्यांना तृप्त करतें सुखी करतें.

नन्वेकान्तेऽपि वाचो वास्तवार्थप्रतिपादकत्वेन प्राणिनां संतर्पकत्वसम्भवान्न कश्चिद्भवदीयवचोतिशयः सम्भवतीत्याह—

एकान्त मतांत देखील एकान्ताचें स्वरूप दाखविणाऱ्या वचनांनीं वस्तूचें खरें स्वरूप समजतें व त्यापासून मनास आनंद होतो वास्तव आपल्याच वचनाला महत्व कसें देतां येईल! एकान्तवचन देखील महत्वाचें आहे या शंकेचें उत्तर ग्रन्थकार देतात.

अनेकान्तात्मदृष्टिस्ते
सती शून्यो विपर्ययः ॥
ततः सर्वं मृषोक्तं स्या-
त्तदयुक्तं स्वघाततः

अनेकान्तेत्यादि । ते तव या अनेकान्तात्मदृष्टिरनेकान्तात्मकं मतं सा सती सत्या । विपर्ययः एकान्तदृष्टिरूपः शून्योऽसत्यः । यथा चैकान्तोऽसत्यस्तथा 'अन्वर्थसंज्ञ' इत्यादौ प्ररूपितम् । ततः एकान्ताश्रयेण निरवशेषं मृषाऽसत्यमनृतमुक्तं स्यात् । कथं मृषोक्तं तत्स्यादिति चेत् तदयुक्तं यतस्तयां एकान्तदृष्ट्या अयुक्तं सर्वं वक्तुमनुचितं । कुतस्तया तदयुक्तं ? स्वघाततः स्वशब्देन सदसदाद्येकान्तो गृह्यते । स्वस्य

घात: स्वघातस्त स्म त् । नहि नीलसुखादिपदार्थप्रपंचप्ररूपणया शून्यैकान्तः सत्ताद्येकान्तो वा न विरुध्यते यतस्तया स्वघातो न स्यात् ।

मराठी अर्थः-हे अर प्रभो ! आपलें अनेकांतात्मक मत खरें आहे. व इतरांनीं कल्पिलेलें एकांत मत असत्य. अनेकांत मत खरें कसें व एकांत मत खोटें कां याचें वर्णन 'अन्वर्थसंज्ञः सुमतिर्मुनिस्त्वं ' या स्तोत्रामध्यें केलें आहे. यास्तव एकांताच्या मतें जें पदार्थस्वरूप वर्णिलें जाईल तें सर्व असत्य आहे--अयोग्य आहे. एकांत दृष्टीनें पदार्थस्वरूप वर्णिलें जाणार नाहीं जर एकांतदृष्टीनें देखील पदार्थांचें वर्णन आह्मांस करतां येईल तर, शून्यैकांत, सत्ताद्वैत, वगैरेचा विरोध आह्मी कसा करूं शकू ? आह्मी या एकांत पदार्थांचा विरोध करतो—त्यांचें खंडन करू शकतो. यास्तव तें एकांतमत असत्य आहे. अंतरंग पदार्थ आत्मा, ज्ञान, सुख वगैरे व बाह्य पदार्थ पुद्गलादि जड वस्तु या आपणास अनुभवास येतात. यांची आह्मी सिद्धि करूं शकतो. आमचे सर्व व्यवहार हे पदार्थ मानल्यानें सुरक्षीत चालतात. यास्तव शून्यैकांत मत असत्य आहे. तसेंच सुखदुःख ज्ञान, शक्ति वगैरे गुण भिन्न भिन्न आत्म्यामध्यें दिसतात. व जडपदार्थामध्येंही तदनुरूप गुण दिसून येतात. ह्मणून ब्रह्मवादही खोटा आहे असें ह्मणण्यास काय हरकत आहे. यावरून एकांतवाद खोटा आहे हें सिद्ध होतें.

नन्वनेकान्ते विरोधादिदोपसम्भवात्कथमसौ युक्त इत्याशंक्याह --

अनेकांत मतांत विरोधादिक आठ दोष उत्पन्न होतात यामुळें हें मत योग्य कसें मानावें या शंकेचें उत्तर—

ये परस्खलितोन्निद्राः

स्वदोषेभनिमीलिनः ।

तपस्विनस्ते किं कुर्यु-
रपात्रं त्वन्मतश्रियः ॥ ९९ ॥

**ये** इत्यादि । **ये** एकांतवादिनः **परस्मिन्ननेकांते स्खलितं** दोषो विरोधादिस्तस्मिन्**नुन्निद्राः** व्यपगतनिद्राः तद्दर्शने पटवः, **स्वदोषेभनिमीलिनः** स्वस्मिन्सदाद्येकांते सुखनीलादेर्विरोधादिदोषे इभनिमीलनं येषां । यथेभः पश्यन्नपि अपश्यन्निव वर्तते तथैते स्वदोषं पश्यंतोऽपि न पश्यंतीति । कथम्भूतास्ते ? **तपस्विनो** वराकाः । **किं** स्वपक्षसाधनं परपक्षदूषणं वा **कुर्युः** ? नैव । कुतः ? **अपात्रं** अभाजनं ते यतः । कस्याः ? **त्वन्मतश्रियः** तव मतं त्वन्मतं द्वादशांगादिलक्षणं तस्य श्रीर्यथावद्वस्तुस्वरूपविवेचकत्वं तस्याः ।

मराठी अर्थः--एकांतवादी अनेकांतमतामध्यें विरोधादि दोष आहेत असें म्हणून ते दाखविण्यास सदा आपली तयारी दाखवीत असतात. व शून्यैकांत, सत्ताद्वैत वगैरे एकांतांतील दोषाकडे हत्तीप्रमाणें दुर्लक्ष्य करितात. जसे हत्ती पदार्थांना पहात असूनही पहात नसल्याप्रमाणें दाखवितो. तद्वत् हे एकांतवादी देखील आपल्यामतांतील दोषाकडे पहात असूनही पक्षपातवश होऊन एकांतमतच निर्दोष आहे असें मानतात. पक्षपातग्रस्त झालेले हे एकांतवादी स्वपक्षसिद्धि व परपक्षखंडन कसें करूं शकतील. असो. हे अरजिनेश ! हे एकांतवादी आपल्या द्वादशांगवर्णित पदार्थांचें निर्दोष वर्णन करण्यास अपात्र आहेत--अयोग्य आहेत.

विशेष स्पष्टीकरण--अनेकांतामध्यें विरोधादिक आठ दोष उत्पन्न होतात; यामुळें तें मत ग्राह्य नाहीं असें एकांतवादी लोक म्हणतात. परंतु विचार केला असतां त्यांचें म्हणणें योग्य दिसत नाहीं. परंतु ते आठ दोष कोणते व त्यांचा अनेकांत

वादामध्यें कसा प्रवेश झाला याचें एकांतवाद्याच्या तर्फे वर्णन करून त्या सर्व दोषांचा परिहार करून अनेकांत वाद सर्वथा निर्दोष आहे हें सिद्ध करूं.

१ विरोध—एका पदार्थामध्यें परस्परविरोधी दोन स्वभावांची कल्पना केली ह्मणजे किंवा हे दोन धर्म त्या पदार्थांत मानले ह्मणजे तेथें विरोध दोष उत्पन्न होतो. जसें अग्नि शीतल व उष्ण ही आहे असें मानणें. हें मानणें विरोध दोष सहित आहे. तसेंच अनेकांतमत ही पदार्थामध्यें परस्परविरुद्ध असे अस्तित्व व नास्तित्व हें दोन धर्म मानतें, यामुळें या मतांत हा विरोध दोष उत्पन्न होतो. कारण जेथें अस्तित्व आहे तेथें नास्तित्व राहणें अशक्य आहे. जेथें नास्तित्व आहे तेथें अस्तित्व रहात नाहीं.

२ वैयधिकरण्य—ज्यांचा आधार भिन्नभिन्न आहे अशा दोन स्वभावांची एका पदार्थांत कल्पना करणें यास वैयधिकरण्य दोष ह्मणतात. जसें स्त्रीत्वधर्माचा आधार स्त्री आहे व पुरुषत्व धर्माचा आधार पुरुष आहे. परंतु या दोन्ही धर्मांची—स्वभावांची एका आधारामध्यें कल्पना केली ह्मणजे हा दोष उत्पन्न होतो. परंतु अनेकांत मत दोन भिन्न आधारामध्यें राहणाऱ्या अस्तित्व, नास्तित्व धर्मांची एका आधारामध्यें कल्पना करतें. अस्तित्व हें भावात्मक पदार्थामध्यें राहतें व नास्तित्व हे अभावात्मक पदार्थामध्यें राहतें. गाढवाच्या शिंगामध्यें नास्तित्व धर्म आहे व घटामध्यें अस्तित्व धर्म आहे. परंतु यांची एकाच आधारामध्यें कल्पना करणें. जसें घागर आहे व नाहींही, असें ह्मणणें.

३ अनवस्था—ज्या रीतीनें पदार्थामध्यें एक धर्म मानतो व ज्या रीतीनें आपण दुसरा धर्म मानतो त्याच रीतीनें याच्य-

मार्गे त्या प्रत्येकधर्मामध्ये तेच धर्म मानीत जाणें. पदार्थामध्यें अस्तित्व धर्म व नास्तित्व धर्म ज्याप्रकारें मानतात त्याचप्रकारानें त्या प्रत्येक अस्तित्व नास्तित्व धर्मामध्यें पुनः देखील तेचतेच धर्म अनेकांत मत मानतें. योग्यप्रमाणानें-पद्धतीनें पदार्थांच्या परंपरेची कल्पना करणें सोडून देऊन वाटेल त्या रीतीनें पदार्थांच्या परम्परेची कल्पना करीत बसल्यानें पदार्थांच्या परम्परेचा शेवट लागत नसल्यामुळें अनवस्था दोष उत्पन्न होतो.

४ संकर—ज्या रूपानें अस्तित्व धर्माची आपण कल्पना करितो त्याचरूपानें-रीतीनें नास्तित्व धर्माची देखील कल्पना करणें. यास संकर ह्मणतात.

५ व्यतिकर—वस्तु ज्या रीतीनें भेदात्मक किंवा अस्तित्वात्मक मानली जाते त्याच रीतीनें ती अभेदात्मकच किंवा नास्तित्वधर्मात्मकच मानणें यास व्यतिकर ह्मणतात. एकमेकांचा स्वभाव एकमेकामध्यें मानणें, यास व्यतिकर ह्मणतात.

६ संशय—वस्तु अस्तित्वधर्म व नास्तित्व धर्मांनी युक्त आहे असें मानलें तर वस्तु या दोन धर्मांपैकीं कोणत्या धर्मानें युक्त आहे याचा निश्चय होत नाहीं. यास संशय दोष ह्मणतात.

७ अप्रतिपत्ति—वस्तूचें ज्ञान न होणें. जेव्हां वस्तूच्या स्वभावाविषयीं मन साशंक होतें त्या वेळेस वस्तूच्या स्वरूपाचें ज्ञान होत नाहीं. हा अप्रतिपत्ति नांवाचा दोष अनेकांतामध्यें संभवतो. कारण, त्या मतांत वस्तु अनेकधर्मात्मक मानली आहे. परंतु तद्धर्मात्मक वस्तुचें ज्ञान होत नाहीं.

८ अभावः—त्या वस्तूचें ज्ञान न झाल्यामुळें व तिचें अस्तित्व जाणण्याचा दुसरा मार्ग नसल्यामुळें, अभाव दोष उत्पन्न होतो. अनेकधर्मात्मक वस्तूचें ज्ञान न झाल्यामुळें सिद्धा

अभाव आहे असें आह्मी ह्मणतो. याप्रमाणें हे आठ दोष अनेकांत वादामध्यें उत्पन्न होतात.

वर जे अनेकांतवादामध्यें दोष दाखविले ते खरोखरच त्यांत आहेत किंवा व्यर्थच त्याच्यामार्थी ते लादले आहेत. हें पुढल्या विवेचनावरून स्पष्ट होतें.

प्रथमतः विरोध दोष अनेकांतामध्यें आहे किंवा नाहीं हे पाहूं. वस्तूमध्यें अनेक धर्म आहेत. जसें एखादा वादी ज्यावेळेस परमताचें खंडन करतो त्यावेळेस त्याचें भाषण केवळ खंडनपरच असतें असें नाहीं. जर त्याचें भाषण खंडनपरच मानलें तर तें त्याच्या पक्षाचें देखील खण्डनच करील. परंतु असें नाहीं. त्याचें भाषण स्वपक्षाचें मण्डन करीत असतें व इतरपक्षाचें खण्डन करीत असतें. अर्थात या दोन स्वभावांनीं भरलेलें असतें. एका मनुष्याचें अनेक व्यक्तींशीं भिन्न भिन्न नातें असतें. व तें निरनिराळ्या अपेक्षांनीं सिद्ध होतें. यामुळें तें युक्तियुक्त मानलें जातें. व तसले आपेक्षिक स्वभाव त्यामध्यें आहेत हें सिद्ध होतें. याचप्रमाणें वस्तूमध्यें अस्तित्व नास्तित्व वगैरे अनेक गुण आहेत. हे जरी विरुद्ध आहेतसें वाटतें, परंतु अपेक्षांच्या सहायानें यांतील विरोध दूर करतां येतो. विरोध त्या ठिकाणींच आढळून येतो, जेथें जें नसतें तेथें मानलें ह्मणजे. जसें गाढवाला शिंग नसतांनाही तें आहे असें मानल्यानें. परंतु अस्तित्व नास्तित्व हे धर्म वस्तूमध्यें आह्माला अविरुद्ध असलेले आढळून येतात. यामुळें यामध्यें विरोध नाहीं. जसें घागर ही स्वरूपानें आहे व ती पटरूपानें नाहीं ह्मणजे कापडासारखी नाहीं. तेव्हां ती अमुक रीतीनें आहे व अमुक रीतीनें नाहीं हें आपण प्रत्यक्ष तिचें स्वरूप पाहून देखील जाणूं शकतो. ज्या रीतीनें ती घागर अस्तित्व स्वभावाला धा-

रण करते त्याच रीतीनें ती नास्तित्व स्वभावास धारण करतें असें जर स्याद्वाद ह्मणत असता तर तो अवश्य सदोष ह्मटला गेला असता. स्याद्वादानें वस्तूमध्यें अनेक धर्मांची सिद्धि करतां येते. जीवाचा ज्ञान दर्शन मूळ स्वभाव आहे ह्मणून त्यास जीव ह्मणतां येतें. व प्रमेयत्वादि धर्मांचेही त्याच्या ठिकाणीं अस्तित्व असल्यामुळें त्यास अजीव असेंही ह्मणता येते. यास्तव सकृद्दर्शनीं विरुद्ध वाटणारे गुण देखील स्याद्वाद दृष्टि प्राप्त झाली ह्मणजे अविरुद्ध वाटू लागतात. पदार्थामध्यें विरुद्ध धर्म असतातच. तथापि त्यायोगें कोणतीही हानि होत नाहीं. जसें गजाननाचें अर्धें शरीर मनुष्याकृति धारण करतें व अर्धें शरीर हत्तीच्या तोंडाचें स्वरूप धारण करतें. अ.पण नृसिंहाकडे पहा तेथेंही हाच प्रकार; तोंड सिंहाचें व सर्व शरीर मनुष्याचें. झाडाचा बुंधा स्थिर असला तरी त्याच्या फांद्या वाऱ्यानें हलत असतात. तेव्हां चलाचलत्व हे विरुद्ध धर्मही त्यामध्यें राहूं शकतात. यास्तव शीत व उष्ण हे धर्म जसें एकत्र राहत नाहींत तद्वत् अस्तित्व नास्तित्व हे विरुद्ध धर्म एकत्र राहू शकत नाहींत असें ह्मणणें चुकीचें आहे, हें सिद्ध होतें. धूपारतीचा वरचा भाग गरम असतो व खालचा भाग थंड असतो. यावरून शीतोष्णधर्म देखील एका वस्तूमध्यें अविरुद्धपणें राहू शकतात, हें सिद्ध होते.

याचप्रमाणें वैयधिकरण्य नांवाचा दोषही अनेकांत वादांत प्रवेश करीत नाहीं. अस्तित्व नास्तित्व हे दोन धर्म जर भिन्न भिन्न वस्तूमध्यें आढळून आले असते—यांचे आधार जर भिन्न असते तरच हा दोष या स्याद्वादामध्यें आढळून आला असता. परंतु हे दोन धर्म एकाच आधारामध्यें राहू शकतात. याचप्रमाणें वर सांगितलेलीं उदाहरणें येथेंही उपयोगी पडतील.

अनवस्था—हाही दोष या मताचा आश्रय करीत नाहीं.

जैनमतामध्यें पदार्थाचें वर्णन दोन रीतींनें करितात. त्या दोन रीती द्रव्यार्थिक व पर्यायार्थिक या दोन नयांचा आश्रय घेतला ह्मणजे सिद्ध होतात. वस्तूमध्यें सामान्य व विशेष असे धर्म आहेत. हें पर्यायार्थिक दृष्टीनें वर्णन केलें आहे. द्रव्यार्थिक दृष्टीनें वस्तु अभेदस्वरूप आहे. यावरून वस्तु एकानेकात्मक आहे. अभेद दृष्टीनें ती एक आहे; त्यावेळेस गुण पर्याय यांची कल्पना गौण होते. भेद दृष्टीनें ज्यावेळेस आपण पदार्थाकडे पाहतो त्यावेळेस आपली अभेददृष्टी गौण होते; व आपल्या नजरेसमोर गुण व पर्याय हे येत असतात. भेददृष्टीनें वस्तुधर्म अनंत असल्यामुळें तेथें अनवस्था कशी ? द्रव्यामध्यें सामान्य व विशेष हे दोन धर्म आहेत. यांच्यामध्यें अनुवृत्ति व व्यावृत्ति यांच्या योगें भेद उत्पन्न होतो. व तो भेद त्यांचीं भिन्न भिन्न कार्यें होतात ह्मणून आहे. व त्यांचीं भिन्न भिन्न कार्यें देखील तशा तऱ्हेच्या दोन पदार्थांतील अनेक शक्तीमुळें होतात. व त्या शक्तिमध्येंही सहकारी कारणांच्या सहायानें अनेकपणा येतो. तेव्हां याद्दष्टीनें विचार केल्यास अनवस्था उत्पन्न होते; परंतु ही दोषावह नाहीं. जेथें पदार्थामध्यें वास्तविक अनंत धर्म दिसून येतात तेथें अनवस्था कशी ? परंतु मूळ पदार्थाची जेथें सिद्धि होत नाहीं व युक्तीचा आश्रय न घेतां पदार्थपरंपरा कल्पना केली जाते तेथेंच अनवस्था दोष मानला आहे.

संकर व व्यतिकर हेही दोष स्याद्वादामध्यें नाहींत. ज्या रीतीनें पदार्थामध्यें आह्मी अस्तित्व स्वभाव मानतो त्याच रीतीनें नास्तित्व स्वभावाची कल्पना आह्मी मानीत नाहीं. पदार्थामध्यें एकत्व ज्या रीतानें मानतो त्याच रीतीनें अनेकत्व आह्मी मानीत नाहीं. यामुळें संकर दोष आमच्या मतामध्यें शिरत नाहीं. एकत्व जसें द्रव्यार्थिक नयानें आह्मी मानतो.

याचप्रमाणें पदार्थांत अनेकत्व देखील द्रव्यार्थिक नयानें मानू तर अवश्य संकर दोष या मतामध्यें शिरला असता पदार्थाचें अस्तित्व स्वरूप चतुष्टयानें आहे. व नास्तित्व पररूप चतुष्टयाने आहे यास्तव संकर दोष स्याद्वादांत बिलकूल येत नाहीं.

व्यतिकर दोषही यांमध्यें नाहीं. तसेंच वस्तु सामान्य-विशेषधर्मात्मक नित्यानित्यात्मक व एकानेकात्मक आहे हें युक्तीनें सिद्ध झालें आहे. यास्तव ती एकस्वभावात्मक आहे किंवा अनेकस्वभावात्मक आहे असा संशयच रहात नाहीं. संशय नसल्याने त्या वस्तूविषयीं अज्ञानही रहात नाहीं. यामुळे अप्रतिपत्ति हा दोष स्याद्वादांत उद्भवत नाहीं. तसेंच वस्तूचे अस्तित्व सिद्ध होत असल्यामुळें अभाव दोषालाही या मतामध्यें आश्रय मिळत नाहीं. याप्रमाणें एकांतवाद्यांनी स्याद्वादामध्यें आरोपिलेल्या या आठ दोषांचे निराकरण झालें. व स्याद्वाद हा निर्दोष आहे. एकांतवाद्यांनीं केवळ स्वपक्ष-वश होऊन द्वेषबुद्धीने या आठ दोषांचे खापर स्याद्वादाचे माथीं मारलें होतें परंतु स्याद्वाद निर्दोष आहे हें या विवेचनावरून ठरतें. असो.

ननु सर्वमेतदयुक्तं वस्तुनो वाचामगोचर वादित्याह—

एकांतवाद टाकाऊ आहे व अनेकांतवाद ग्राह्य आहे असे म्ह-णणे अयोग्य आहे. कारण, वस्तूचें वर्णन शब्दांनी करता येत नाहीं. ती अवाच्य आहे. अशा शंकेचे निरसन आचार्य या श्लोकांत करितात.

ते तं स्वघातिनं दोषं,
शमीकर्तुमनीश्वराः ।
त्वद्द्विषः स्वहनो बाला-
स्तत्वावक्तव्यतां श्रिताः ॥ ९८ ॥

ते इत्यादि । ते एकांतवादिनः । तं स्वघातिनं दोषं स्वं हन्तीत्येवंशीलं । शमीकर्तुं परिहर्तुं । अनीश्वराः असमर्थाः । त्वां अनेकांतवादिनं द्विषन्तीति त्वद्द्विषः । स्वहनः स्वमात्मानं घ्नन्तीति । बाला यथावद्वस्तुस्वरूपानभिज्ञाः । तत्त्वावक्तव्यतां श्रिताः आश्रिताः । अवक्तव्यं हि तत्त्वमभ्युपगच्छद्भिस्तैरात्मनो न किंचिद्रूपं प्ररूप्यते इत्यात्मघातिनस्ते अनेकधर्मात्मनो वस्तुनः क्रमेण वक्तव्यत्वसम्भवेऽपि अवक्तव्यत्वाभ्युपगमाद्बाला इति ।

अर्थ—हे अर जिनेश, स्वतःचे रागादिक दोष दूर करण्यास असमर्थ असलेले व तुझा द्वेष करणारे ते एकांतवादी लोक वस्तूच्या खऱ्या स्वरूपाचें ज्ञान नसल्यामुळें लहान अज्ञान बालकाप्रमाणें स्वतःचा नाश करून घेत आहेत. व वस्तु सर्वथा अवक्तव्य आहे असें म्हणतात.

विशेष स्पष्टीकरण—सर्वथा पदार्थाचें स्वरूप अवक्तव्य आहे असें मानल्यावर पदार्थांचें वर्णन कसें करतां येईल. आत्म्याचें स्वरूप समजून घेऊन आपलें कल्याण करण्याचा मार्गच कुंठित होईल. व या मताचा आश्रय करणाऱ्या लोकांस आत्मिक स्वभावांचा परिचय न झाल्यामुळें त्यांनीं स्वतःचा नाश करून घेतला असें म्हणण्यास कोणती हरकत आहे? अथवा या श्लोकांत ' त्वद्द्विषः ' असें एक पद आहे. त्याचा अर्थ प्रकृत प्रकरणांत जिनेश्वराचा द्वेष करणारे असा होतो. आणि जे जिनेश्वराचा द्वेष करतात ते ' स्वहनः ' म्हणजे आपला नाश करतात असे समजावें. याचें कारण असें आहे कीं जिनेश्वरानें सत्य मोक्षमार्गाचा उपदेश भव्यांना केला आहे. व त्या उपदेशानेंच जीवांना मोक्षप्राप्ति होते. अशा सत्य उपदेशाचा अव्हेर करून जिनेश्वराचा द्वेष केल्यानें अनंत पापाच्या भारानें आत्मा अधोगतीस प्राप्त होतो. आत्म्याला अवनत दशेला पोहोंचविणें

म्हणजे आत्मघात करणें नव्हे कां? यास्तव जे जिनेश्वराचा द्वेष करतात ते आत्मघातकी होत हें सिद्ध होतें.

सर्व पदार्थांचें स्वरूप शब्दांनीं अवर्णनीय मानल्यावर वस्तूंचें स्वरूप शिष्यांना समजावण्याचा उपाय कोणता? अथवा पदार्थांचें स्वरूप अवक्तव्य आहे असें जर म्हटलें तर अवक्तव्य शब्दानें त्या पदार्थाचें स्वरूप सांगितलें असें होत नाहीं कां? पदार्थ सगळे अवक्तव्य आहेत असें म्हणणारा मनुष्य मी मौनव्रत धारण केलें आहे असें सगळ्यांना सांगणाऱ्या मनुष्याप्रमाणेंच समजावा. कारण, ज्या मनुष्यानें मौनव्रत-न बोलण्याचें व्रत घेतलें तो बोलणार कसा? व बोलूं लागेल तर मौनव्रती कसा? याचप्रमाणें सर्व पदार्थ अवक्तव्य आहेत असें म्हणणारा मनुष्य समजावा.

कीदृशास्तर्हि प्रतिपक्षरभिप्रायाः सत्याः कीदृशाश्चासत्या इत्याह—

जाणणाऱ्याचे कोणते अभिप्राय खरे समजावेत व खोटे कोणते समजावेत या प्रश्नाचें उत्तर आचार्य या श्लोकांत सांगतात.

सदेकनित्यवक्तव्या-
स्तद्विपक्षाश्च ये नयाः ।
सर्वथेति प्रदुष्यन्ति
पुष्यन्ति स्यादितीह ते ॥ ९९ ॥

**सदि**त्यादि । संश्च एकश्च नित्यश्च वक्तव्यश्च इत्येवंविधा ये नयाः । **तद्विपक्षाश्च** असदनेकानित्यावक्तव्याश्च ये नयास्ते । **प्रदुष्यन्ति** प्रकर्षेण दुष्टा भवन्ति । कथं? **सर्वथेति** सर्वप्रकारेणेति । कथं तर्हि ते सत्या भवन्तीत्याह-पुष्यन्तीत्यादि । **पुष्यन्ति** स्वार्थप्रतिपादने निर्बाधत्वेन पुष्टा भवन्ति स्यादित्यनेनोपलक्षिताः सन्तः । **इह** जगति तैं तत्र मते ।

अर्थः—सर्वथा वस्तु सदात्मकच आहे, एक स्वभावात्मकच आहे, नित्यच आहे, वर्णन करण्याजोगीच आहे; असें वर्णन करणारे नय, व सर्वथा वस्तु असत्, अनेक, अनित्य व अवक्तव्यस्वभावात्मक आहे असें वर्णन करणारे नय हे असत्य आहेत. यांच्या योगें वस्तूंच्या खऱ्या स्वभावांचे ज्ञान होत नाहीं. परंतु हे जिनेश. हेच नय ज्यावेळेस स्यात् या शब्दानें अलंकृत होतात त्यावेळेस पदार्थांच्या स्वभावांचें वर्णन निर्दोषपणें करावयास समर्थ होतात.

तात्पर्य—पदार्थांच्या स्वभावांचे वर्णन सर्वथा असेंच आहे दुसऱ्या रीतीनें होऊं शकत नाहीं. असें जेव्हां नय ह्मणतात. तेव्हां ते मिथ्या आहेत, असें मानावें. व वस्तु कथंचित् या स्वभावाला धारण करते व कथंचित् त्याही स्वभावाला धारण करते असें वर्णन करणारे नय सत्य होत. कारण, वस्तु एक स्वभावाचीच नाहीं. तिच्यामध्यें नानास्वभाव आहेत. तेव्हां अमुक स्वभावच वस्तूमध्यें आहे, दुसरा स्वभाव तिच्यांत नाहींच असा नियम करणारे नय असत्य कां नसावेत. यास्तव जैनांनीं जें वस्तूचें वर्णन केलें आहे तें खरें होय. व इतरांनीं केलेलें वर्णन मिथ्या होय. स्याद्वादाच्या आश्रयानें विरोध कोठेंच दिसत नाहीं व त्याचा आश्रय सोडला ह्मणजे सर्वत्र विरोधच विरोध आहे असें समजावें.

स्याच्छब्दगुणमाह—

स्यात् या पदाचें स्वरूप काय आहे हें आचार्य सांगतात.

सर्वथानियमत्यागी यथादृष्टमपेक्षकः ।
स्याच्छब्दस्तावके न्याये नान्येषामात्मविद्विषाम् ॥ १०० ॥

सर्वथेत्यादि । सदेवासदेवेत्यादिको नियमः सर्वथानियमः तं त्यजतीत्येवंशीलस्तत्त्यागी । कोसौ ? स्याच्छब्दः । पुनरपि कथम्भूतः ?

**यथादृष्टमपेक्षकः** येन प्रकारेण सदसदित्यादिरूपेण दृष्टं प्रमाणप्रतिपन्नं यथादृष्टं, बहिरन्तश्च तत्त्वमपेक्षते ऽन्विष्यते । क इत्थम्भूतः स्याच्छब्दः? **मावके न्याये** त्वदीयायां अनेकान्तात्मिकायां नीतौ नान्येषामेकान्तवादिनां । कथम्भूतानां? **आत्मविद्विषां** आत्मवैरिणां । कथं तेषामात्मवैरित्वमिति चेत्सदाद्येकान्ताभ्युपगमने तेनात्मना विद्विषणात् ।

**मराठी अर्थ—**पदार्थ सद्रूपच आहे किंवा तो असद्रूपच आहे असा जो नियम त्याचा त्याग 'स्यात्' शब्द करीत असतो. अर्थात् एकान्त वादाचा निरास स्यात्शब्दानें करतां येतो. वस्तूचे जे स्वभाव आहेत त्यांचा प्रत्यक्षादि प्रमाणांना विरोध न आणतां शोध करणारा असा हा स्यात्शब्द आहे. हे जिनेश, या 'स्यात्' शब्दाचा प्रयोग आपण प्रतिपादलेल्या अनेकान्त मताशिवाय इतर मतामध्ये केलेला आढळत नाहीं. हे जिनेश, एकांतवाद्यांनीं स्वतःच आपला नाश करून घेतला आहे. कारण, जीवादि पदार्थांची अथवा त्यांच्या स्वभावांची सिद्धि स्याद्वादाशिवाय होत नाहीं. एकांतवादी पदार्थ सद्रूपच आहे किंवा असद्रूपच आहे असें जे ह्मणतात ते त्यांचे ह्मणणें देखील स्याद्वादाचा आश्रय न केल्यानें सिद्ध होत नाहीं. यामुळे त्यांनीं स्वतः आपल्या पायावर कुऱ्हाड मारून घेतली असें होत नाहीं काय? ह्मणून ते एकांतवादी स्वतःचेच शत्रू आहेत हें सिद्ध होतें.

ननु भगवन्मते येन रूपेण जीवादि वस्तु नित्यादिस्वभावं तेन किं कथञ्चित्तथा सर्वथा वा? यदि सर्वथा तदेकांतप्रसंगादनेकांतक्षतिः । अथ कथञ्चित्तदानवस्थेत्याशंक्याह—

श्री जिनेश्वराच्या-मतामध्यें ज्या रीतीनें जीवादि वस्तु नित्यादि स्वभावाला धारण करणाऱ्या आहेत असें सांगितलें, त्याच रीतीनें त्या वस्तु कथंचित् नित्यादि स्वभावयुक्त मानल्या

आहेत किंवा सर्वथा मानल्या आहेत ? जर सर्वथा नित्यादि स्वभावयुक्त वस्तु आहेत असें मानलें तर एकांतवादाचाच स्वीकार केला असें होईल. व या योगें तुमचा अनेकांतवाद नाश पावेल. कदाचित् कथंचित् नित्यादिस्वभावयुक्त वस्तु आहेत असें मानीत असाल तर अनवस्था नांवाचा दोष येतो. तो असा-कीं आपण अनेकांतही कथंचित् अनेकांतस्वरूपाचा मानला व त्यांत पुनः पुनः अनेकांताची कल्पना करीत गेल्यास त्या परंपरेचा अंतच लागणार नाहीं. या शंकेचें उत्तर आचार्य देतात.

अनेकांतोऽप्यनेकांतः,
प्रमाणनयसाधनः ।
अनेकांतः प्रमाणात्ते,
तदेकांतोऽर्पितान्नयात् ॥१०१॥

अनेकांतोऽपीत्यादि । अनेकांतोऽपि न केवलं सम्यगेकांत इत्यपि-शब्दार्थः । कथम्भूतःअनेकान्तः कथंचित्स्यादित्यर्थः । पुनरपि कथंभूतः प्रमाणनयसाधनः । प्रमाणे च नयाश्च साधनं यस्य । एतदेव दर्शयन्ननेकांत इत्याद्याह । प्रमाणात्साधनात् अनेकांतः सिध्यति । ते तव मते । सकलादेशः प्रमाणाधीनः इत्यभिधानात् । तदेकांतः तस्मिन्ननेकांते एकांतः तदेकांतः प्रतिनियतधर्मः । स कस्मात्सिध्यति ? नयात् कथम्भूतात् अर्पितात् विवक्षितात् । विकलादेशो नयाधीनः ।

अर्थ हे अरजिनेश, आपल्या मतामध्यें अनेकांत देखील कथंचित् अनेकांत आहे. सम्यगेकांत कथंचित् अनेकांत असणार. त्याच्याबद्दल काय सांगावयाचें आहे? अनेकांताची सिद्धि प्रमाणापासून होते. व सम्यगेकांताची सिद्धि सत्य नयापासून होते.

विशेष स्पष्टीकरण—एकांताचे दोन भेद आहेत सम्यगेकांत व मिथ्या एकांत. वस्तूच्या अनेक स्वभावांना विषय न करतां एकाच स्वभावाला मुख्यतेनें जाणणार व इतर स्वभावांना त्यावेळेस गौण समजणारें जें ज्ञान त्यास सम्यगेकांत ह्मणतात. या सम्यगेकांताला अनेकांत ह्मणण्याचें कारण हें आहे कीं हा एकांत, वस्तु एक स्वभावात्मकचें आहे, असें समजत नाहीं. एवढेंच कीं, वस्तूंतील एका धर्माला मुख्य समजतो व तिच्या इतर धर्माला गौण समजतो. वस्तूच्या जेवढ्या अंशाला मुख्यता अनेकांत देतो तेवढाच अंश त्यावेळेस मुख्यतेनें या अनेकांताचा विषय असल्यामुळें मुख्यत्वाच्या दृष्टीनें या अनेकांताला 'सम्यगेकांत' असें आह्मी ह्मणूं शकतो. व वस्तूच्या इतर स्वभावांचा निषेध न करतां त्यांना गौण मानीत असल्यामुळें या एकांतास अनेकांत असेंही ह्मणतां येते. व पदार्थांत विवक्षित स्वभावाशिवाय दुसरे स्वभाव नाहींत असें समजणारें जें ज्ञान त्यास मिथ्यैकांत ह्मणतात. याप्रमाणें एकांताचें जसें दोन भेद आहेत तसेंच अनेकांताचे देखील दोन आहेत. सम्यगनेकांत व मिथ्या अनेकांत, वस्तूच्या सर्व स्वभावांना सांगणारा युक्ति व आगम यांच्या योगें ज्याला बाधा येत नाहीं किंवा जो युक्ति व आगम यांचें उल्लंघन न करतां त्यांना अनुकूल असतो तो सम्यगनेकांत होय. वस्तु एकानेक स्वभावात्मकच आहे असें मानणारा तो मिथ्या अनेकांत होय. या अनेकांताचें युक्ति व आगम या उभयतांबरोबर विळा भोपळ्या एवढें सख्य असतें. ह्मणून यास मिथ्या अनेकांत ह्मणतात. तसेंच सम्यगनेकांतास प्रमाण ह्मणतात व मिथ्या अनेकांतास प्रमाणाभास असें ह्मणतात. जर अनेकांत हा सर्वथा अनेकांतच असतां तो कथंचित् एकांत न होता तर एकांताचा अ-

भाव झाल्यामुळे एकांताच्या समूहापासून बनलेल्या अनेकांताच्या देखील अभाव झाला असता. जसें वृक्ष ह्मणजे काय याचा विचार करूं लागलो तर आपणांस असें वाटेल कीं शाखा पानें फुलें बुंधा इत्यादिकांच्या समुहालाच वृक्ष ह्मणतो. यांना सोडून वृक्ष असूं शकेल काय? तद्वत एकांताच्या समूहाला सोडून अनेकांत निराळा असूं शकत नाहीं. जसें वस्तूमध्यें सामान्य व विशेष असे धर्म असतात. या धर्मांचा पिंडच वस्तू होय. वस्तूनें जर विशेष धर्म सोडून दिले तर सामान्य धर्मही राहणार नाहीं. याक्रम जें विशेष धर्मांचें ज्ञान करून देणाऱ्या एकांताचा त्याग अनेकांतानें केला तर अनेकांताचा ही लोप होऊन सर्वस्वी ज्ञानाचा लोप होईल. यास्तव अनेकान्त देखील कथंचित् एकांत व कथंचित् अनेकांत आहे; असें समजावें.

प्रकृतार्थमुपसंहरन्नाह—

आतां प्रकृत विषयाचा उपसंहार करितात—

इति निरुपमयुक्तशासनः,
प्रियहितयोगगुणानुशासनः।
अरजिन दमतीर्थनायक–
स्त्वमिव सतां प्रतिबोधनाय कः॥१०२॥

इतीत्यादि। इति एवं **निरुपमं** उपमायाः निष्क्रांतं **युक्तशासनं** युक्तं प्रमाणोपपन्नं शासनं मतं यस्य। **युक्तिशासन** इतिच क्वचित्पाठः। निरुपमा निर्बाधा युक्तिः प्रत्यक्षादिलक्षणा यस्य शासने मते इतिच। **प्रियहितयोगगुणानुशासनः**। प्रियाः सुखदाः हिताः परिणामपथ्याः तेच ते योगगुणाश्च। योगाः प्रशस्तमनोवाक्कायव्यापाराः गुणाः सम्यग्दर्शनादयः तेषामनुशासनः अनुशासकः। इत्थंभूतः **अरजिन** अरसंज्ञक जिन! **दमतीर्थनायकः** दमस्येन्द्रियजयस्य सूचकं तीर्थं

प्रवचनं तस्य नायकः प्रवर्तकस्त्वमित्र सतां पंडितानां प्रतिबोधनाय प्रतिबोधनार्थं कोन्यो नैव कश्चित् ।

अर्थ—पूर्वी सांगितल्याप्रमाणें निर्दोष युक्तींनीं भरलेलें ज्याचें मत आहे, सुखदायक व परिणामीं हितकर असे ज्याचे मानसिक, शारीरिक व वाचनिक व्यापार आहेत व जो सम्यग्दर्शनादिक गुणांचा भव्यांना उपदेश करतो. इन्द्रिय विजयाचें सूचक अशा शास्त्रांचा भव्यांना ज्यानें उपदेश केला, अशा हे अरजिना ! तुझ्याशिवाय कोणता मनुष्य पंडित जनांना उपदेश देण्यास समर्थ आहे ?

इदानीं स्तुतेः फलं याचमानः प्राह—

आतां ग्रंथकार स्तुतीच्या फळाची याचना करतात—

मतिगुणविभवानुरूपत-
स्त्वयि वरदागमदृष्टिरूपतः ॥
गुणकृशमपि किंचनोदितं,
मम भवताद्दुरितासनोदितम् ॥१०५॥

मतीत्यादि । मतेर्बुद्धेर्गुणो यथावदर्थपरिच्छेदकत्वं तस्य विभवः सम्पत्तिः तस्यानुरूपतः यावान्मतिगुणविभव इत्यर्थः । त्वयि विषये वरद आगमदृष्टिरूपतः आगमेन दृष्टिर्दर्शनं परिज्ञानं भवद्गुणानां तस्या रूपं तस्मादागमदृष्टिरूपतः आगमप्रतिपादितभवद्गुणानतिक्रमेणेत्यर्थः । गुणकृशमपि गुणानां भवद्गुणानां कृशमपि स्तोकमपि लेशोऽपि किञ्चन किं उदितं व्यावर्णितं । मम स्तोतुः । भवताद् भूयात् । दुरितासनोदितं दुरितं पापं तस्य असनं क्षेपणं विनाशनं तस्मिन्नुदितं उदयि समर्थम् ।

अर्थ—शास्त्रामध्यें जें आपल्या गुणांचें वर्णन केलें आहे,

त्यास अनुसरून व माझ्या बुद्धिमध्यें जी विचारशक्ति आहे, तिचा आश्रय घेऊन यथाशक्ति जें आपल्या गुणांचें अल्प वर्णन मी केलें, हे अर जिनेश, तें आपलें थोडेंसें गुणवर्णन माझ्या पातकांचा नाश करो.

इति अरनाथस्तुतिः ।

याप्रमाणें श्रीअरनाथ जिनाचें स्तोत्र संपलें ।

---

अथ मल्लिनाथ जिनस्तुतिः ।

यस्य महर्षेः सकलपदार्थ-
प्रत्यवबोधः समजनि साक्षात् ।
सामरमर्त्यं जगदपि सर्वं
प्राञ्जलि भूत्वा प्रणिपतति स्म ॥१०६॥

यस्येत्यादि । **यस्य** मल्लिनामतीर्थंकरदेवस्य । कथम्भूतस्य ? **महर्षेः** महानिन्द्रादीनां पूज्यः स चासौ ऋषिश्च तस्य । किं? **समजनि** संजातः । कोसौ ? **सकलपदार्थप्रत्यवबोधः** सकलाश्च ते पदार्थाश्च तेषां प्रति समंतात् अव अशेषविशेषतो बोधः परिज्ञानं । कथं **समजनि** ? **साक्षात्** परिस्फुटतया । अत एव **प्रणिपततिस्म** प्रणतं संजातं । किं तत् ? **जगत्** । कथम्भूतं ? **सर्वमपि** । पुनरपि कथम्भूतं ? **सामरमर्त्यं** अमराश्च मर्त्याश्च तैःसह वर्तते इति सामरमर्त्यं । किं **कृत्वा** ? **प्रांजलि भूत्वा** प्रबद्धांजलि भूत्वा ।

**अर्थः—ज्या इंद्रादिपूज्य श्री मल्लि जिनेश्वरास संपूर्ण पदा-**

यांचें पूर्ण व स्पष्ट असें ज्ञान झालें आहे; व ज्यास चतुर्णिकाय देव व सर्व मनुष्यें आणि सगळें जग मोठ्या भक्तीनें हात जोडून नम्र होऊन नमस्कार करतात, त्या श्रीमल्लिजिनेश्वराास मी शरण जातो.

भगवदीय शरीरं वचनं चैयाविधमित्याह ।

श्री मल्लिजिनांचे शरीर व दिव्य ध्वनि यांचें वर्णन.

यस्य च मूर्तिः कनकमयीव,
स्वस्फुरदाभाकृतपरिवेषा ।
वागपि तत्वं कथयितुकामा,
स्यात्पदपूर्वा रमयति साधून् ॥१०७॥

**यस्य** चेत्यादि । **यस्य** मल्लितीर्थकरदेवस्य **मूर्तिश्च** शरीरं च । कथम्भूतं ? **कनकमयीव** सुवर्णेन निर्वृत्ता इव । पुनरपि कथम्भूतेत्याह **स्वेत्यादि स्फुरन्ती** चासौ आभाच दीप्तिः स्फुरदाभा, स्वस्य स्फुरदाभा, तया कृतः परिवेषः सकलशरीरव्याप्तिः, भामण्डलं वा यस्यां स तथोक्ता । न केवलं मूर्तिरेवंविधा किंतु **वागपि** वचनमपि । यस्येति सम्बन्धः । किंविशिष्टा ? **कथयितुकामा** । किं तत् ? **तत्त्वं** यथावद्वस्तुस्वरूपं अचेतनापीयमुपचारादेवमुच्यते, यथा भिक्षा भिक्षुकान् वासयति । सा इत्थंभूता वा किं करोति इत्याह **रमयति** आत्मन्यनुरक्तान्करोति । कान् ? **साधून्** भव्यान् । कथम्भूता ? **स्यात्पदपूर्वा** स्यात्पदोपलक्षिता इत्यर्थः ।

अर्थः—श्री मल्लि जिनेश्वराचें शरीर सोन्यानें बनविल्याप्रमाणें दिसत होतें. व कांतीचें मंडळ त्यांच्या शरीराभोंवतीं पसरलें होतें व स्याद्वादानें भरलेला त्यांचा दिव्य ध्वनि वस्तूचें खरें स्वरूप दाखविणारा असल्यामुळें तो भव्य जनांचीं मनें आपल्याकडेच आकर्षण करून घेत असे.

ननु प्रमाणबाधिताशो भाषायत्वत: कथं तान्रमयिष्यतीत्याह ।

श्री मल्लिजिनांचा दिव्य ध्वनि जर प्रमाणांनी बाधित असेल तर भव्यजीवांना आपल्याकडे आकर्षित कसा करूं शकेल या शंकेचें उत्तर.

यस्य पुरस्ताद्विगलितमाना,
न प्रतितीर्थ्या भुवि विवदन्ते ।
भूरपि रम्या प्रतिपदमासी-
ज्जातविकोशाम्बुजमृदुहासा ॥ १०८ ॥

यस्येत्यादि । यस्य भगवतः । पुरस्तादग्रतः । प्रतितीर्थ्या एकांतवादिनो न विवदन्ते न विप्रतिपत्तिं कुर्वन्ति । क ? भुवि पृथिव्यां कथम्भूताः ? विगलितमाना विगलितो विनष्टो मानो दर्पो येषां ते तथोक्ताः । अतः कथं प्रमाणबाधिता तद्वाक् । भगवत्समागमने भूमिरपि इत्थंभूता संजातेत्याह भूरपीत्यादि । भूरपि पृथिव्यपि । रम्या मनोज्ञा । पदं पदं प्रति प्रतिपदं । आसीत्संजाता । कथंभूता इत्याह-जातेत्यादि । विकोशानि विकसितानि च तानि अंबुजानि पद्मानि तैर्जातो मृदुः कोमलो हासो यस्याः ।

अर्थः—या पृथ्वीतलावर श्री मल्लिजिनेश्वरापुढें एकांतवादी बिलकुल वाद करूं शकत नाहीं. एकांत वाद्यांचा गर्व श्री मल्लि जिनेश्वरास पाहिल्याबरोबर कोठें पळून जातो हें समजतच नाहीं. यावरून त्यांचें वचन युक्तियुक्त होतें. श्री मल्लि जिनाचा दिव्यध्वनि इतका आकर्षक होता कीं त्यायोगें भव्यजीवच मोहित होत होतें असें नाहीं, परंतु अचेतन पृथ्वी देखील आनंदानें मनोहर दिसूं लागली व विकसित कमलांच्या मिषानें ती गालांतल्या गालांतच मंद मंद हसूं लागली.

इदानीं भगवतो वचनप्रतिग्राहिशिष्यसंपदं दर्शयन्नाह.

आतां भगवंताच्या वचनाचे ग्रहण करणाऱ्या शिष्यांचें वर्णन करितात.

यस्य समंताज्जिनशिशिरांशोः,
शिष्यकसाधुग्रहविभवोऽभूत् ।
तीर्थमपि स्वं जननसमुद्र-
त्रासितसत्वोत्तरणपथाग्रम् ॥१०९॥

**यस्ये**त्यादि । **यस्य** मल्लिनाथस्य **समंता**त्सर्वतः । अंशव इव किरणा इव अंशवो वचनविशेषाः वस्तुस्वरूपप्रकाशकत्वात् । **शिशिराः** सकललोकाप्यायकत्वेन शीतला अंशवो वचनानि यस्य स तथोक्तः । जिनश्चासौ **शिशिरांशु**श्च तस्य । **शिष्यकसाधुग्रहविभवोऽभूत्** । शिष्यकाश्च ते साधवश्च यतयो भव्या वा त एव ग्रहास्तारकास्तेषां विभवः सम्पत् **अभूत्** सजातः । न केवलं तद्विभव एवाभूत् किंतु **तीर्थमपि** श्रुतमपि । अभूत् । कथम्भूतं ? **स्वं** आत्मीयं । पुनरपि कथम्भूतमित्याह-**जनने**त्यादि । जननं जन्म संसारः तदेव समुद्रो दुष्पारत्वात् तेन त्रासिता भयं नीतास्तेच ते सत्वास्तेषामुत्तरणपथः । अत एव सकलतीर्थेभ्योऽग्रं प्रधानं तत् ।

**अर्थः—संपूर्ण लोकांचा संसारताप दूर करणारे वचनरूपी थंड किरणांना धारण करणाऱ्या मल्लिनाथ जिनचंद्रांचे शिष्य असें यतीश्वर व भव्यजीव हेच नक्षत्रें होत. व हेच श्री जिनेश्वरचन्द्राचें ऐश्वर्य आहे. व मल्लिनाथ तीर्थकरांनीं आपल्या दिव्यध्वनींतून सांगितलेलें द्वादशांगश्रुत, संसारसमुद्र तरून जाणें अशक्य आहे अशा विचारानें घाबरलेल्या भव्यजीवांना तो तरून जाण्याचा मार्ग दाखविण्यामध्यें अग्रस्थान पटकाविलें.**

ननु प्रागुक्तविशेषणविशिष्टोऽपि भगवान्कथं कर्मणां प्रक्षयं कुर्याद्यतः सकलपदार्थप्रत्यवबोधभाक्, सकलकर्मविप्रमोक्षलक्षण-मोक्षभाग्वा भवेदित्याह-

पूर्ववर्णन विशिष्ट श्री जिनेश्वर कर्माचा कसा नाश करतात ज्यायोगें सर्व पदार्थांचें त्यांना ज्ञान होतें किंवा संपूर्ण कर्मांचा नाश-रूपी मोक्षप्राप्ति होईल ? या शंकेचें उत्तर आचार्य देतात.

यस्य च शुक्लं परमतपोऽग्नि-
ध्यानमनन्तं दुरितमधाक्षीत् ।
तं जिनसिंहं कृतकरणीयं-
मल्लिमशल्यं शरणमितोऽस्मि ॥११०॥

**यस्य चे**त्यादि । यस्य भगवतः शुक्लंच ध्यानं । **परमतपोऽग्निः** परमं च तत्तपश्च तदेवाग्निरशेषकर्मनिर्दाहकत्वात् । तद्रूपं यत् शुक्ल-ध्यानं च । यद्दुरितं अष्टकर्मरूपं अधाक्षीत् । कथम्भूतं दुरितं? **अनन्तं** न केनचिदंतः कर्तुं शक्यते यस्य । एकत्ववितर्कवीचारलक्षणेन हि शुक्लध्यानेन घातिकर्माणि दग्धानि अतः सकलार्थावबोधसम्भवः । व्युपरतक्रियानिवृत्तिलक्षणेन तु शेषकर्माणि ततः सकलकर्मविप्रमोक्षल-क्षणमोक्षसंभवः । **तं जिनसिंहं** तं प्रागुक्तविशेषणविशिष्टं । जि-नश्चासौ सिंहश्च, जिनानां वा सिंहः प्रधानस्तं । **मल्लिं** मल्लिनामानं तीर्थंकरदेवं । कथम्भूतं ? **कृतकरणीयं** कृतं करणीयं संसारोच्छेदल-क्षणं येन । पुनरपि कथंभूतं ? **अशल्यं** न [illegible] नि शल्यान्यस्य । **शरणं इतो** गतोऽस्मि भवामि ।

**अर्थ**—संपूर्ण कर्मांचा नाश करण्यास [illegible]णें असलेल्या ज्याच्या उत्कृष्ट तपोरूपी शुक्लध्यानानें, ज्यांचा नाश करण्यास अशक्य अशा आठ कर्मांचा नाश [illegible], व ज्यानें सं-

साराचा उच्छेद-नाश केला; माया, मिथ्यात्व, निदान ही शल्यें ज्यानें आपल्या आत्म्यापासून दूर केलीं; आणि जो गणधरादिकामध्यें श्रेष्ठ आहे, त्या श्री मल्लिजिनेश्वरास मी अनन्यभावानें शरण गेलो आहे.

तात्पर्य—तपश्चरण हे कर्मनिर्जरा व मोक्षाची प्राप्ति करून देणारें आहे. ध्यान हा तपाचाच भेद आहे. एकत्ववितर्कवीचार नांवाच्या ध्यानानें मल्लिजिनांनीं घातिकर्मांचा नाश केला. त्यामुळें त्यांना सर्व वस्तूंचें ज्ञान झालें. व्युपरत-क्रियानिवृत्ति नांवाच्या ध्यानानें त्यांनीं अघाति कर्मांचा नाश केला. त्यामुळें त्यांना मोक्षलक्ष्मीची प्राप्ति करून घेतां आली. त्यांनीं कर्मांचा नाश कसा केला व ज्ञान प्राप्ति त्यांना कशी झाली या शंकेचें उत्तर आचार्यांनीं या श्लोकांत दिलें आहे. असो.

मोहरूपी मल्लाचा—पहिलवानाचा यांनीं पाडाव केला यामुळें यांचें मल्लि हें नांव सार्थक आहे. जगामध्यें मोहमल्ल हा अद्वितीय पहिलवान त्याच्यावर विजय मिळविणें सामान्य माणसाला अगदीं अशक्य आहे. त्याला जिंकण्याचें काम या जिनेश्वरांनीं केलें यास्तव इंद्रादिकांनीं यांचें ' मल्लि ' असें नांव ठेविलें.

इति मल्लिनाथस्तुतिः ।

याप्रमाणें मल्लिनाथ जिनांचें स्तोत्र संपलें.

अथ श्री मुनिसुव्रत स्तुतिः ।

अधिगतमुनिसुव्रतस्थिति-
मुनिवृषभो मुनिसुव्रतोऽनघः ।
मुनिपरिषदि निर्बभौ भवा-
नुडुपरिषत्परिवीतसोमवत् ॥ १११ ॥

अधिगतेत्यादि । शोभनानि च तानि व्रतानि च सुव्रतानि । मुनीनां सुव्रतानि मुनिसुव्रतानि तेषां स्थितिः सा अधिगता निश्चिता येन स तथोक्तः । कोऽसौ ? मुनिसुव्रतः अनेनान्वर्थसंज्ञा भगवतः प्रतिपादिता । पुनरपि कथम्भूतः ? मुनिवृषभो मुनिनायकः । पुनरपि किंविशिष्टः ? अनघो न विद्यतेऽघं घातिकर्मचतुष्टयरूपं पापं यस्य स इत्थम्भूतो भगवान् निर्बभौ विराजितवान् । क ? मुनिपरिषदि समवसरणे । क इव केत्याह उडुरित्यादि । उडूना नक्षत्राणां परिषत्संघातः तया परिवीतः स चासौ सोमश्चंद्रः स इव तद्वत् ।

अर्थ—पापरूप चार घातिकर्मांनीं रहित, मुनिनायक, मुनीश्वरांच्या व्रतांचा निर्णय ज्यांनीं केला आहे ह्मणूनच मुनिसुव्रत हें सार्थक नांव धारण करणारे श्री जिनेश—[ २० विसावे तीर्थंकर ] तारागणानें वेष्टिलेल्या चंद्राप्रमाणें मुनिजनांच्या सभेमध्यें शोभले.

भगवतः शरीरातिशयं दर्शयन्नाह ।

भगवंताच्या शरीराचें माहात्म्य सांगतात.

परिणतशिखिकण्ठरागया
कृतमदनिग्रहविग्रहाभया ।

**तव जिन तपसः प्रसूतया,**
**ग्रहपरिवेषरुचेव शोभितम् ॥ ११२ ॥**

**परिणतेत्यादि** । अनंतरश्लोके वपुरित्यास्ते तदिहाभिसम्बध्यते । तेनेत्थं व्याख्यायते । शोभितं । किं ? तद्वपुः कस्य? **तव हे जिन** । कया ? **कृतमदनिग्रहविग्रहाभया** मदो मदनो दर्पो वा कृतो मदनस्य निग्रहो येन स चासौ विग्रहश्च तस्य भा दीप्तिस्तया अथवा कृतमदनिग्रहेति संबोधनात्तज्जिनेत्यस्य विशेषणं । कथम्भूतयेत्याह **परिणतेत्यादि** । परिणतो युवावस्थः स चासौ शिखी च मयूरः तस्य कंठः तस्य राग **इव** रागो यस्याः सा तथोक्ता तया । रागः छायासादृश्यमित्यर्थः । पुनरपि कथम्भूतया ? **तपसः प्रसूतया** अनशनादिलक्षणं तपः तस्मात्प्रसूतया जातया । कयेव शोभितमित्याह **ग्रहेत्यादि** । ग्रहस्य चन्द्रमसः परिवेषो मंडलं तस्य रुक् दीप्तिस्तयेव ॥

**अर्थः—हे जिनेश ! अनशनादि बारा प्रकारच्या तपाचें उत्पत्तिस्थान व भर तारुण्यांत आलेल्या मयूराच्या कंठासारखा नीलवर्ण धारण करणाऱ्या आणि मदनाचा अथवा गर्वाचा विध्वंस करणाऱ्या अशा शरीराच्या कांतीनें आपलें शरीर प्रभामंडलानें वेष्टिलेल्या चंद्राप्रमाणें शोभूं लागलें.**

पुनरपि कथम्भूतं वपुरित्याह ।

पुनः भगवंताच्या शरीराचें वर्णन.

**शशिरुचि शुचि शुक्ललोहितं,**
**सुरभितरं विरजो निजं वपुः ।**
**तव शिवमतिविस्मयं यते,**
**यदपि च वाङ्मनसीयमीहितम् ॥११३॥**

**शशीत्यादि** । शशी चन्द्रः तस्य रुचिर्दीप्तिस्तद्वच्छुचिर्निर्मल

शुक्लोहितं रुधिरं यस्य । सुरभितरं सुगन्धितरं । विरजो विगतं रजो यस्य । निजं आत्मीयं, वपुः शरीरं । तव हे यते महामुने शिवं प्रशस्तं शुभं । अतिविस्मयं सौन्दर्येण साश्चर्यं । यदपि च वाङ्मनसीयं वाङ्मनसोद्भवं ईहितं तदपि अतिविस्मयम् ।

अर्थ—हे जिनेश, हे महामुने, चंद्रकिरणाप्रमाणें निर्मल व पांढऱ्या रक्तानें युक्त, सुगंधित, निष्पाप, धूळ वगैरेनीं रहित, शुभ असें आपलें शरीर सर्व जनांना आश्चर्यांत गुंग करून सोडलें. व आपल्या शरीराप्रमाणेंच आपल्या मनानें वचनाचे व्यापार देखील, अत्यंत निर्मल व शुभ आहेत.

तात्पर्यः-श्री मुनिसुव्रत तीर्थकरांचें शरीर, मन व भाषण हीं सारखीं होतीं. शरीर सौंदर्यांत ज्याची बरोबरी कोणी करणारें नाहीं असें होतें, मन सर्व सद्गुणांच्या विकासानें सुंदर दिसत होतें. आणि भाषण चित्ताकर्षक व जगाच्या कल्याणाला वाहिलेलें असे होतें. यास्तव या तिहींची समानता होती.

सर्वज्ञलिंगं वेदमित्याह ।

श्रीजिनेश्वराच्या दिव्य ध्वनीनें ते सर्वज्ञ आहेत हें सिद्ध होतें. हें आचार्य सांगतात.

स्थितिजननानिरोधलक्षणं,
चरमचरं च जगत्प्रतिक्षणम् ।
इति जिन सकलज्ञलांछनं,
वचनमिदं वदतां वरस्य ते ॥ ११४ ॥

स्थितीत्यादि । स्थितिः ध्रौव्यं जननमुत्पादो निरोधो विनाशस्तल्लक्षणं स्वरूपं यस्य तत्तथोक्तं । किं तत् ? जगत् । कथम्भूतं ? चराचरं च प्रतिक्षणमनुक्षणमित्यर्थः । किं का[illegible]तथाभूतमित्याह

प्रतिक्षणं क्षणं प्रति। इति एवं यद्वचनं तत्ते तव जिन सकलज्ञलांछनं सर्वज्ञताचिह्नं। किंविशिष्टस्य ते ? वदतां वरस्य। वदतां तत्वमुपदिशतां मध्ये वरस्य श्रेष्ठस्य।

अर्थ—हे मुनिसुव्रतनाथ जिनेश, आपण तत्वांचा उपदेश करणाऱ्या गणधरादिकांमध्यें श्रेष्ठ आहांत. व प्रतिक्षणीं जगांतील चेतन पदार्थांच्या स्थित, उत्पत्ति व विनाश ह्या तीन अवस्था होतात असा आपण उपदेश केला. या उपदेशावरून-च आपण सर्वज्ञ आहांत हें ठरतें. हा आपला उपदेश सर्वज्ञपणाचें चिह्न आहे.

तात्पर्य—कित्येक लोक पदार्थ क्षणिकच मानतात, कित्येक पदार्थ नित्य आहेत असें समजतात. व कित्येक पदार्थांची उत्पत्ति हमेशा होते असें समजतात. परंतु प्रतिक्षणीं उपरोक्त तीन अवस्था पदार्थांमध्यें होतच असतात. प्रत्येक पदार्थांच्या पूर्व अवस्थेचा नाश होतो, नवीन अवस्था उत्पन्न होते व या दोन अवस्थेमध्यें पदार्थ आपली स्थिरता राखीत असतो. म्हणून पदार्थ या तीन अवस्थांना धारण करीत असतो. जसें समुद्रामध्यें एक लाट उत्पन्न होते, तिचा विनाश होऊन तिचें दुसऱ्या लाटेमध्यें परिणमन होतें. परंतु लाटेच्या उत्पत्ति व विनाश या दोन अवस्थामध्यें जल कायम असतें. जसें जलामध्यें ह्या तीन अवस्था दृष्टिगोचर होतात तशाच या तीन अवस्था सर्व पदार्थांमध्यें प्रतिक्षणीं होत असतात. असा उपदेश श्री मुनिसुव्रतनाथ जिनांनीं भव्यांना केला म्हणून त्यांच्या या उपदेशावरून ते सर्वज्ञ होते हें ठरतें.

भगवतोऽपायप्राप्तिप्रतिपादनपूर्वकं स्तोता स्तुतेः फलं याचमानः प्राह।

श्रीमुनिसुव्रतनाथ देखील प्रथम अष्ट कर्मसहित होते; तदनंतर कर्मांचा नाश करून त्यांनीं मोक्ष मिळविला. मला देखील

हे मोक्षपदाची प्राप्ति करून देवोत. असी ग्रंथकार प्रार्थना करतात.

**दुरितमलकलंकमष्टकं,**
**निरुपमयोगबलेन निर्दहन् ।**
**अभवदभवसौख्यवान् भवान्,**
**भवतु ममापि भवोपशान्तये ॥११५॥**

**दुरिते**त्याद्याह—**अभवत्सं**जातः । कोसौ ? **भवान्** मुनिसुव्रततीर्थंकरदेवः । कथम्भूतः ? **अभवसौख्यवान्** । भवे संसारे सौख्यमिन्द्रियप्रभवं भवसौख्यं न भवसौख्यमभवसौख्यमतीन्द्रियं मोक्षसौख्यमित्यर्थः । तदस्यास्तीति तद्वान् । किं **कुर्वन्नभवसौख्यवानभवत्** ? **निर्दहन्** भस्मसात् कुर्वन् । किं तत् ? **दुरितमलकलङ्कं** दुरितं कर्म तदेव मलो जीवस्वरूपप्रच्छादकत्वात् तेन कलंक आत्मन उपलेपस्तं । कथम्भूतं ? **अष्टकं** ज्ञानावरणाद्यष्टप्रकारं । केन निर्दहन् ? **निरुपमयोगबलेन** योगः समाधिः शुक्लध्यानलक्षणो, निरुपमश्चासौ योगश्च तस्य बलं सामर्थ्यं तेन । स इत्थम्भूतो भगवान् **भवतु** अस्तु । किमर्थं ? **भवोपशांतये** संसारविनाशाय । कस्य ? **ममापि** स्तोतुरपि । न केवलं स्वात्मन एव ॥

**अर्थः**–आपल्या उत्कृष्ट शुक्लध्यानाच्या सामर्थ्यानें जीवाचें वास्तविक स्वरूप झाकून टाकणाऱ्या आठ कर्ममलांचा नाश करून हे मुनिसुव्रतनाथ जिनेश ! आपण अतींद्रिय मोक्षसुखाची प्राप्ति करून घेतली आहे. यास्तव हे जिनेश, माझें देखील आपण संसारदुःख दूर करा.

इति मुनिसुव्रतनाथस्तुतिः ।

याप्रमाणें श्री मुनिसुव्रतनाथ जिनाचें स्तवन संपलें.

---

अथ श्री नमिनाथस्तुतिः ।

स्तुतिः स्तोतुः साधोः कुशलपरिणामाय स तदा,
भवेन्मा वा स्तुत्यः फलमपि ततस्तस्य च सतः ।
किमेवं स्वाधीन्याज्जगति सुलभे श्रायसपथे,
स्तुयान्न त्वा विद्वान्सततमभिपूज्यं नमिजिनम् ॥११६

स्तुतिरित्यादि । स्तुतिः स्तोत्र । **कुशलपरिणामाय** कुशलं पुण्यं तस्य साधकः परिणामः कुशलपरिणामः तस्मै । भवतीत्यध्याहार्यं । कस्य ? **स्तोतुः** स्तुतिकर्तुः । कथम्भूतस्य ? **साधोः** भव्यस्य । **स स्तुत्यः तदा** स्तोतुः काले । उपलक्षणमेतत्तद्देशस्य । तत्र **भवेन्मा वा** भवेत् । नायमाङ 'लुङिति' लुग् भवति । **ततः** स्तुत्यात्फलमपि स्वर्गादिकं भवेन्मा वेति योज्यं । **तस्यः च सतः** । चो यस्मादर्थे । तस्य स्तोतुः सतो विद्यमानस्य । यस्मात्कुशलपरिणामप्रसाध्यपुण्यविशेषादेव तत्फलं संभवति अतश्च कथं स प्रेक्षापूर्वकारी **भवन्तं न स्तुयात्** इत्याह–**किमेव**मित्यादि । **किं न त्वा** त्वां स्तुयात् अपितु स्तुयादेव । कोसौ ? **विद्वान्** विवेकी । कस्मिन्सति ? **श्राय पथे** श्रेयो निःश्रेयस तदधिकृत्य कृतः श्रायसः । देविकाशिंशपादीर्घसत्रश्रेयसामात् इत्येकारस्याकारः । स चासौ पथाश्च सम्यग्दर्शनादिलक्षणो मोक्षमार्गस्तस्मिन् । कथम्भूते ? **सुलभे** सुखप्राप्ये । क ? **जगति** । कस्मात् ? **स्वाधीन्यात्** आत्मायत्तत्वात् । **इत्थं** एवमुक्तप्रकारेण । कथम्भूतं त्वां ? **नमिजिनं** नमिनामानं जिनं तीर्थकरदेवं । पुनरपि कथम्भूतम् ? **सततमभिपूज्यं** सततं सर्वदा अभि समन्तादिन्द्रादीनां पूज्यमाराध्यम् ।

**अर्थः—स्तुति हीं पुण्य उत्पन्न करते, स्तुतीच्या योगानें पुण्य उत्पन्न होईल असे आत्म्याचे परिणाम शुभ होतात. परंतु ज्या आराध्य देवाची आपण स्तुति करतो तो आराध्य देव स्तुति करतेवेळीं त्या ठिकाणीं असो किंवा नसो. अथवा त्या स्तुतीपासून आम्हांस स्वर्गादिकांची प्राप्ति होवो अथवा न होवो**

**परंतु स्तुति केल्यापासून पुण्य उत्पन्न होतें हें खरें. व पुण्यापासून स्वर्गादिकांची प्राप्ति आपोआपच होईल. वास्तव सम्यग्दर्शनादि लक्षणाचा मोक्ष मार्ग सुलभ रीतीनें या स्तुतीपासून आपणांस प्राप्त होतो, व स्तुती करणें हें आपल्या स्वाधीन आहे. यास्तव इन्द्रादिकांकडून पूजनीय अशा हे नमि जिना! कोणता विद्वान मनुष्य तुला नमस्कार करून तुझी स्तुति करणार नाहीं बरें.**

किं तेन कृतं येनेत्थं पूज्योसौ संवृत्त इत्याह ।

**श्रीनमि जिनांनीं असें कोणतें कृत्य केलें ज्याच्यायोगें ते सर्वलोकवंद्य झाले? याचें उत्तर.**

**त्वया धीमन् ब्रह्मप्रणिधिमनसा जन्मनिगलं,**
**समूलं निर्भिन्नं त्वमसि विदुषां मोक्षपदवी।**
**त्वयि ज्ञानज्योतिर्विभवकिरणैर्भाति भगव-॥**
**न्नभूवन्खद्योता इव शुचिरवावन्यमतयः ॥११७॥**

त्वयेत्यादि । **त्वया** नमितीर्थकरदेवेन । **धीमन्**विशिष्टबुद्धियुक्त! **निर्भिन्नं** विनाशितं । किं तत्? **जन्मनिगलं** जन्मैव निगलं बन्धनं । कथं निर्भिन्नं? **समूलं** तत्कारणभूतकर्मणा सहेत्यर्थः । कथम्भूतेन त्वया? **ब्रह्मप्रणिधिमनसा** ब्रह्मणि परमात्मस्वरूपे प्रणिधिः प्रणिधानमेकाग्रता यस्य तत्तथाविधं मनो यस्य तेन । यतस्त्वया तन्निर्भिन्नं ततस्त्वं **असि** भवसि । **मोक्षपदवी** मोक्षमार्गः । केषां? **विदुषां** विपश्चितां । ननु सुगतादिभिरपि निर्भिन्नं भविष्यति अतस्तेपि तत्पदवीरूपाः स्युरित्यत्राह त्वयीत्यादि । **त्वयि** नमिजिने । कथम्भूते? **शुचिरवौ** शुचिर्निर्मलो रविः शुचिकाले वा आषाढकाले रविः तस्मिन् । तद्रवाविव तद्रवौ । किं कुर्वति? **भाति** । कैरित्याह **ज्ञाने**त्यादि । ज्ञानमेव केवलस्वरूपं ज्योतिस्तस्य विभवः सम्पत्तिः स एव किरणास्तैः ।

इत्थं त्वयि विभाति सति हे भगवन्, **अभूवन्** संजाताः । के ? **अन्य-मतयः** भवत्प्रणीततत्त्वादन्यस्मिंस्तत्त्वे मतिर्बुद्धिर्येषामीश्वरकपिलसुगतादीनां। कथम्भूता अभूवन् ? **खद्योता इव** खे आकाशे द्योतन्ते इति खद्योताः कीटविशेषाः त इव । हतप्रतापाः संजाताः इत्यर्थः ।

मराठी अर्थः—हे केवलज्ञानसंपन्न नमि जिनेंद्रा! तूं परमात्मस्वरूपामध्यें लीन होऊन कर्मांचा त्यांच्या कारणासह नाश केलास, यामुळें विद्वान लोकांना तूं मोक्षमार्ग झाला आहेस. विद्वानांना हे जिनेश तूं मोक्षमार्ग दाखऊन दिला आहेस. आषाढ महिन्यांतील सूर्याप्रमाणें केवलज्ञानरूपी तेजस्वी किरणांनीं अद्वितीय सूर्य असा तूं प्रकाशित झाला असतां तुझ्यापुढें असे महादेव, कपिल, बुद्ध वगैरे कुदेव काजव्याप्रमाणें कांतिःहीन दिसूं लागले.

तात्पर्य—मोक्षमार्गस्य नेतारं, भेत्तारं कर्मभूभृताम् ।
ज्ञातारं विश्वतत्त्वानां, वन्दे तद्गुणलब्धये ॥

या श्लोकांत वर्णिलेल्या तीन गुणांचे धारक नमि जिनेश होते. त्यांनीं कर्मांचा नाश केला होता म्हणून त्यांच्या ठिकाणीं कर्मभेदनत्व गुण होता. विद्वानांना मोक्षमार्गाचा उपदेश केला होता म्हणून त्यांच्या ठिकाणीं नेतृत्व गुण होता. व ते सर्वज्ञ असल्यामुळें त्यांनीं ज्ञातृत्व गुणाला धारण केलें होतें.

इदानीं सप्तभंगसमाश्रयणेन भगवता यथा तत्त्वमुपदिष्टं तथा प्रदर्शयन्नाह ।

सर्वज्ञ अशा नमि जिनोंनीं त्यावेळेस सप्तभंगाच्या आश्रयानें जो तत्त्वांचा उपदेश केला त्याचें आचार्य वर्णन करतात.

विधेयं वार्यं चानुभयमुभयं मिश्रमपि तत्,
विशेषैः प्रत्येकं नियमविषयैश्चापरिमितैः ।
सदान्योन्यापेक्षैः सकलभुवनज्येष्ठगुरुणा,

**त्वया गीतं तत्वं बहुनयविवक्षेतरवशात् ॥ ११८ ॥**

विधेयमित्यादि—**त्वया** नमितीर्थकरदेवेन । **गीतं** कथितं । किं तत् ? **तत्वं** जीवादि । कुतो ? **बहुनयविवक्षेतरवशात्** बहवश्च ते नयाश्च नैगमादयः तेषां विवक्षाच इतरा चाविवक्षा तयोर्वशादायत्तत्वात् । कथं तद्वशात्तत्प्रतिपादितमित्याह—**विधेयमित्यादि** । **विधेयं** स्वरूपादिचतुष्टयापेक्षयास्तित्वं, **वार्यं** चापि पररूपादिचतुष्टयान्नास्तित्वं । **च**ः समुच्चये । **अपि**ः सम्भावने । **अनुभयमवाच्यं** युगपत्तयोर्वक्तुमशक्यत्वात् । **उभयं** चास्तिनास्तिरूपं क्रमविवक्षितस्वपररूपचतुष्टयापेक्षया । **मिश्रमपि**, स्यादस्त्यवक्तव्यं, स्यान्नास्त्यवक्तव्यं, स्यादस्तिनास्ति चावक्तव्यंच तत्तत्वं । एते सप्तभंगाः कथंभवन्तीत्याह-**विशेषैः** त्रिकालधर्मैः । कथं? **प्रत्येकं** एकं एकं प्रति प्रत्येकं । कथम्भूतैः ? **नियमविषयैः** सप्तैव नाविका भंगाः इति योयं नियमः तद्विषयैः । पुनरपि कथम्भूतैः ? **विशेषैः** अपरिमितैः एकस्यापि वस्तुनोऽनन्तधर्मसम्भवात् । पुनरपि कथम्भूतैः ? **सदान्योन्यापेक्षैः** सदा सर्वकालं, अन्योन्यापेक्षैः परस्परापेक्षैः । स्वरूपादिचतुष्टयेन सत्वं हि पररूपादिचतुष्टयेनासत्वमपेक्षते । मूर्तत्वममूर्तत्वं स्थूलत्वं सूक्ष्मत्वं इत्यादि । कथम्भूतेन त्वयेत्याह **सकलेत्यादि** । सकलं च तद्भुवनं च तस्य ज्येष्ठो महान् स चासौ गुरुश्च आराध्यः तेन ॥

अर्थ—हे नमि जिनेश, आपण सर्व जगाचे गुरु आहांत. पदार्थांचें वर्णन सप्तभंगीच्या आश्रयानें केलें आहे. व तें वर्णन निरपेक्ष नसून पदार्थांतील प्रत्येक धर्मास अनुसरून आहे. पदार्थांतील धर्म एकमेकाची अपेक्षा ठेवतात. जसें मित्र आपल्या मित्राची मदत घेऊन आपलीं कार्यें तडीस नेतो, त्याचप्रमाणें पदार्थांतील धर्म देखील परस्परांची अपेक्षा ठेवतात. आणि अशा योगानें ते धर्म पदार्थांचें व स्वतःचें देखील अस्तित्व राखीत असतात. यास्तव त्या धर्मांचें निरपेक्ष वर्णन वस्तूची व

तद्गतधर्मांची सिद्धि करू शकत नाहीं. श्री नमि जिनांनीं पदार्थाचें वर्णन सात प्रकारांनें केलें आहे तें असें—

१ पदार्थांचा सद्भाव स्वरूपचतुष्टयाचे योगानें आहे. जसें घागर ही आपल्या स्वरूपांतच राहते. ती परस्वरूपांत राहत नसते. अर्थात् ती कपड्याच्या आकाराची नाहीं यास्तव घागरीचें अस्तित्व स्वरूपचतुष्टयाच्या अपेक्षेनें आहे. [ या स्वरूपचतुष्टयाचें वर्णन मागें केलें आहे. ] ह्मणून घागर ही कथंचित् स्वस्वरूपानें आहे.

२ पदार्थांचा अभाव परचतुष्टयाच्या अपेक्षेनें आहे. घागरीचा कापडाच्या दृष्टीनें अभाव आहे. कपड्याचे गुणधर्म घागरीमध्यें नसतात. यास्तव त्या दृष्टीनें तिचा अभाव आहे; असें ह्मणतां येते. घागरीचा सर्वथा अभाव मानतां येत नाहीं. तसें मानलें तर तिचें जें कापडाच्या स्वरूपाहून भिन्न स्वरूप दिसतें तेंही दिसलें नसतें. यास्तव घागर ही कथंचित् परचतुष्टयाच्या दृष्टीनें अभावात्मक आहे असें ह्मणतां येतें.

३ स्वरूपचतुष्टय व पररूपचतुष्टयाच्या अपेक्षेनें वस्तु अवक्तव्य आहे. जसें एक मनुष्य एकाचा मामा आहे व एकाचा काका आहे. येथें एकेका नात्याच्या आश्रयानें त्याला मामा किंवा, काका असें ह्मणतां येईल. परंतु एकदम दोन्ही नातीं आपल्या दृष्टीपुढें ठेऊन त्याचें एकदम शब्दद्वारें वर्णन करूं ह्मटल्यास तें साधणार नाहीं. कारण, आपण शब्दांची रचना क्रमानेंच करूं शकतो. यास्तव एकदम त्या दोन नात्यांचें वर्णन करतां येत नाहीं. याचप्रमाणें स्वपरचतुष्टयाची अपेक्षा एकदम जेव्हां मनांत उद्भवते तेव्हां वस्तुही अवक्तव्य ठरतें.

४ स्वरूपचतुष्टय व पररूपचतुष्टयाची क्रमानें अपेक्षा केल्यास वस्तु कथंचित् भावाभावात्मक आहे. द्रव्यार्थिक नयानें

वस्तु सदात्मक आहे व पर्यायार्थिक नयानें ती असदात्मक आहे. या नयांची क्रमानें विवक्षा केली ह्मणजे वस्तु कथंचित् सदसदात्मक आहे हें ठरतें.

५ स्वरूपचतुष्टयाच्या अपेक्षेसह एकदम स्वपररूपचतुष्टयाची विवक्षा असली ह्मणजे हा भंग तयार होतो. यास कथंचित्सदवक्तव्य असें ह्मणतात. स्वपरचतुष्टयाची एकदम विवक्षा असल्यामुळें पदार्थाचें वर्णन करतां येत नाहीं ह्मणून त्यास अवक्तव्य ह्मणतात. त्या अवक्तव्य भंगासहित पुनः स्वरूपचतुष्टयाची अपेक्षा ठेविली ह्मणजे हा पांचवा भंग होतो.

६ अवक्तव्य भंगाबरोबर पररूपचतुष्टयाची अपेक्षा ठेवल्यानें हा भंग होतो याचें स्यान्नास्त्यवक्तव्य असें नांव आहे.

७ अवक्तव्य भंगाबरोबर स्वपरचतुष्टयाची अपेक्षा ठेवल्यानें हा भंग होतो. याचें नांव स्यादस्तिनास्ति अवक्तव्य असें आहे.

याप्रमाणें या सात भंगांच्या आश्रयानें श्री नमि जिनांनीं भव्यांना उपदेश केला.

परमपि भगवतो गुणमाह ।

पुनः नमिजिनाच्या गुणाचें वर्णन आचार्य करतात.

अहिंसा भूतानां जगति विदितं ब्रह्म परमम्
न सा तत्रारंभोऽस्त्यणुरपि च यत्राश्रमविधौ ।
ततस्तत्सिद्ध्यर्थं परमकरुणो ग्रन्थमुभयम् ।
भवानेवात्याक्षीन्न च विकृतवेषोपधिरतः ॥ ११९ ॥

अहिंसेत्यादि–अहिंसा दया । भगवता जगति लोके । विदिता यथावत् ज्ञाता विदितमित्येतल्लिंगपरिणामेनाभिसम्बध्यते । सा केषां ?

भूतानां प्राणिनां । तथा ब्रह्म परमात्मस्वरूपं, ब्रह्मचर्यं वा, परमयुत्कृष्टं जगति विदितं यथावज्ज्ञातं । न सा अहिंसा तत्र तस्मिन्नाश्रमविधौ पार्खंडिप्रकारे । यत्र यस्मिन् तद्विधौ । आरम्भो व्यापारोऽस्ति । कथम्भूतः ? अणुरपिच स्वल्पोऽपि न केवलं महान् । यत एवं ततस्तस्मात्कारणात् तत्सिद्ध्यर्थं तस्या अहिंसायाः सिद्ध्यर्थं निरतिचाराहिंसाव्रतसिद्ध्यर्थं ग्रन्थं परिग्रहं । उभयं बाह्याभ्यन्तरं च भवानेव न सुगतादिः । अत्याक्षीत् परित्यक्तवान् । किंविशिष्टः ? परमकरुणः परमा करुणा दया यस्य तथाभूतस्यापि भगवतो यथाजातलिंगविरोधी कश्चिद्विकारादिर्भविष्यति इत्यत्राह नचेत्यादि । वेषश्च जटामुकुटभस्मोद्धूलनादिः उपधिश्च वस्त्राभरणाक्षसूत्राजिनादिपरिग्रहः विकृतौ यथाजातलिंगविरोधिनौ तौच तौ वेषोपधीच तयो रत आसक्तो नच नैव ।

मराठी अर्थः—संपूर्ण प्राणिमात्रावर दया करणें हेच परमात्म स्वरूपाची प्राप्ति होण्याचें साधन होय. संपूर्ण प्राण्यांवर दया करणें ह्मणजे संपूर्ण प्राण्याविषयीं परमसमता धारण करणें होय. शत्रु व मित्र याविषयीं रागद्वेषाचा त्याग करणें अर्थात् शत्रु व मित्र ही भेदकल्पना सोडून देणें. यासच पूर्ण अहिंसा ह्मणतात. जेव्हां अशी अहिंसा-अशी शांति आपणांस लाभते तेव्हां आपल्या आत्म्यास परमात्मपद मिळतें. परंतु हे नमि प्रभो, पाखंडी ऋषींच्या आश्रमामध्यें या अहिंसेचा लेशसुद्धां दिसून येत नाहीं. कारण, तेथें पंचाग्नि साधन जलस्नान इत्यादि कृत्यें पाखंडी ऋषींकडून केलीं जातात. पंचाग्निसाधन केल्यानें जीवहिंसा होते, जलस्नान केल्यानें जलकायिक जीवांची हिंसा होते. तसेंच स्नान करतांना बरेच सूक्ष्म जंतु जटेमध्यें अडकतात व पंचाग्नितपाच्यावेळीं ते जंतु अग्नीमध्यें पडून मृत्यु पावतात. यामुळें पाखंडीऋषींच्या आश्रमामध्यें आरंभ पूर्ण भरलेला आहे. जेथें असा आरंभ आहे अशा ठिकाणीं

अहिंसेचें पालन होत नाहीं. जेथें अत्यल्प देखील आरंभ असतो तेथेंही जर अहिंसाव्रत पाळलें जात नाहीं तर अशा पाखंडी ऋषींच्या आश्रमामध्यें अहिंसेचें पालन होणें नितांत असम्भवनीय समजावें. यास्तव हे जिनेश, या अहिंसेचें पूर्ण पालन व्हावें ह्मणून अतिशय दयाळु अशा हे नमिजिनेश, आपणच बाह्याभ्यन्तर परिग्रहांचा त्याग केला व यथाजात स्वरूपामध्यें विरोध उत्पन्न होईल अशा वेषाचाही आपण बिलकुल त्याग केला. आपण डोक्यावर जटा वाढविली नाहीं, अंगाला भस्म लाविलें नाहीं. तसेंच वस्त्र, अलंकार जपमाला, हरणाचें कातडें वगैरे परिग्रह देखील जवळ बाळगला नाहीं. यामुळें आपल्या ठिकाणींच अहिंसा पूर्णपणें दिसून येत आहे.

यत एवंविधस्त्वं ततस्त्वदीयं वपुस्ते परमवीतरागतां कथयतीत्याह—

ज्या अर्थी हे जिनेश, आपण पूर्ण अहिंसाव्रतप्रतिपालक आहां त्या अर्थी आपलें शरीर परमवीतरागतेचें स्पष्ट निदर्शक आहे. श्री जिनेश्वराच्या शरीराचें आचार्य वर्णन करतात.

वपुर्भूषावेषव्यवधिरहितं शांतिकरणं ।
यतस्ते संचष्टे स्मरशरविषातंकविजयम् ॥
विना भीमैः शस्त्रैरदयहृदयामर्षविलयं ।
ततस्त्वं निर्मोहः शरणमसि नः शांतिनिलयः॥१२०॥

वपुरित्यादि । ते तव वपुः शरीरं। संचष्टे कथयति। कं ? स्मरशरविषातंकविजयं स्मरः कामस्तस्य शरा बाणास्त एव विषं संतापमोहहेतुत्वात् तेनातंकश्चित्तपीडा स एव वातंकोऽप्रतीकारो व्याधिः तस्य विजयं विनाशं । कथम्भूतं वपुरित्याह भूषेत्यादि । भूषा कटककटिसूत्राद्यलंकारः तस्या आ समन्ताद्वेषो व्याप्तिर्यथास्थानं विनिवेशः तेन व्यवधि-

र्वपुषः प्रच्छादनं तेन रहितं । पुनरपि कथम्भूतं ? शान्तकरणं शान्तानि उपशान्तानि स्वस्वविषयस्पृहाव्यावृत्तानि करणानीन्द्रियाणि यस्य । पुनरपि कथम्भूतमित्याह अदयेत्यादि । न विद्यते दया अस्येत्यदयं हिंस्रं तच्च तद्धृदयं च तस्यामर्षः क्रोधः तस्य विलयो विनाशो यत्र । ननु भगवानायुधरहितस्तत्कथं तज्जयः स्यादित्याह विनेत्यादि । विना अन्तरेण भीमैर्भयानकैः शस्त्रैः प्रहरणैः । इत्थंभूतं तव वपुः यतस्ते तज्जयं संचष्टे ततस्तस्मात्कारणात् । त्वं नमितीर्थंकरदेवः । शरणं असि भवसि । नोऽस्माकं । किंविशिष्टो ? निर्मोहः मोहान्निःक्रान्तो मोहो वा निःक्रान्तो यस्मात् । पुनरपि कथम्भूतः ? शान्तिनिलयः शान्तेः सकलकर्मप्रक्षयस्य निलयः आश्रयः, शांतिर्वा मुक्तिर्निलयः आश्रयो यस्य ॥

मराठी अर्थः–हे नमिनाथ जिनेश ! आपलें शरीर कुंडल, करगोटा, कडे इत्यादि अलंकारांनीं रहित आहे व आपलीं इंद्रियें आपआपल्या विषयांचा त्याग केल्यामुळें शांत झालीं आहेत. यामुळें सन्ताप व मोह उत्पन्न करणाऱ्या मदनाच्या बाणरूपी विषाचा नाश आपण केला आहे, हें आपलें शरीर आम्हांस स्पष्ट रीतीनें सांगत आहे. भयानक शस्त्रें हातांत धारण न करतांही हिंस्र हृदयांत उत्पन्न होणाऱ्या क्रोधावर आपण विजय मिळविला आहे, असें आपलें शरीर आम्हांस दर्शवीत आहे; व आपण निर्मोह आहांत हें सांगत आहे. हे जिनेश ! आपण सर्व कर्मांचा नाश करून शांतीचे माहेरघर बनला आहां. यास्तव आपणच आमचे संरक्षक आहां.

याप्रमाणें श्री नमिस्तोत्र संपलें.



श्री नेमिनाथस्तुतिः ।

भगवानृषिः परमयोग-
दहनहुतकल्मषेन्धनः ।
ज्ञानविपुलकिरणैः सकलं
प्रतिबुध्य बुद्धकमलायतेक्षणः ॥१२१॥

**भगवानित्यादि** । भगवान्विशिष्टज्ञानवानिंद्रादीनां पूज्यो वा । अरिष्टनेमिरिति द्वितीयवृत्तगतेनाभिसम्बन्धः । कथंभूतः ? **ऋषिः** परमर्धिसंपन्नः । पुनरपि कथंभूत इत्याह **परमेत्यादि** । **परमश्चासौ योगश्च** शुक्लध्यानं स एव **दहनः** कल्मषं ज्ञानावरणादि कर्म तदेवेन्धनं तद्दहने हुतं क्षपयेन्धनं येनासौ **परमयोगदहनहुतकल्मषेन्धनः** । किं कृत्वा? **प्रतिबुध्य** प्रकाश्य ज्ञात्वा । किं **तत्सकलं** लोकालोकजातं । कैः ? **ज्ञानविपुलकिरणैः** ज्ञानमेव विपुला विस्तीर्णा निरवशेषद्योतनसमर्थाः किरणा रश्मयः तैः । पुनरपि कथम्भूतो **बुद्धकमलायतेक्षणः** बुद्धं विकसितं तच्च तत्कमलं च (कमलशब्देनात्र तत्पत्रमुच्यते) तद्वदायते दीर्घे ईक्षणे लोचने यस्य सः ।

एतद्विशेषणविशिष्टो भगवान् पुनः कथम्भूतः संजात इत्याह—

हरिवंशकेतुरनवद्यविनय—
दमतीर्थनायकः ।
शीलजलधिरभवो विभव—
स्त्वमरिष्टनेमिजिनकुंजरोऽजरः ॥१२२॥

**हरीत्यादि** । अभव आसीर्भूतवान् । कथम्भूतो **विभवो** विगतसंसारो मुक्त इत्यर्थः । किंनामा त्वमित्याह **अरिष्टनेमीत्यादि** । अरिष्टनेमिः अरिष्टनेमिनामा, अरिष्टानां कर्मणां नेमिश्चक्रधारा स चासौ **जिन-**

**कुंजरश्च,** जिनानां देशजिनानां, कुंजरो नायकः प्रधानः । पुनरपि कथम्भूतः ? **अजरो** न विद्यते जरा वार्द्धक्यमस्येति । पुनरपि किंविशिष्टः ? हरिवंशकेतुः हरिवंशे विष्णुवंशे केतुर्ध्वजः । पुनरपि कथम्भूतः ? **अनवद्यविनयदमतीर्थनायकः** । न विद्यतेऽवद्यं दोषोऽनयोरित्यनवद्यौ तौ च तौ विनयदमौ च । ज्ञानदर्शनतपश्चारित्रोपचारभेदाद्विनयः पंचविधः , पंचेंद्रियजयनाद्दमोऽपि । अनवद्यता चानयोर्मायादिरहितत्वात्, तयोस्तीर्थं प्रतिपादकं प्रवचनं तस्य नायकः प्रवर्तकः । पुनरपि किंविशिष्टः ? **शीलजलधिः** शीलानां जलधिः समुद्रः ।

**मराठी अर्थः-हरिवंशालाभूषणभूत, शीलांचा समुद्र १८००० शीलांना धारण करणारा, कपटाचा ज्यांत लेशही नाहीं असा निर्दोष पांच प्रकारचा विनय, व पांच प्रकारचा इंद्रिय विजय यांचें प्रतिपादन करणाऱ्या परमागमाचा कर्ता, जन्म, जरा, मृत्यु यापासून दूर असलेला, शंभर इंद्राकडून पूजिला जाणारा, परम शुक्लध्यानरूपी अग्नीनें ज्ञानावरणादि आठ कर्मरूपी लाकडें ज्यानें जाळून टाकलीं आहेत असा व विकसित झालेल्या कमलाच्या या कळीप्रमाणें सुंदर व लांब नेत्राचा असा श्री अरिष्टनेमि तीर्थंकर होता. त्याचें अरिष्टनेमि हें सार्थक नांव होतें. कारण, अरिष्ट=आठ कर्मे व नेमि चाकाची धार. जसें चाक चालत असतांना त्याचे खालीं आलेल्या पदार्थांचा चुराडा होतो त्याप्रमाणें या तीर्थंकरानें कर्मांचा नाश केला होता म्हणून याचें अरिष्टनेमि असें सार्थक नांव होतें. या तीर्थंकरानें लोक व अलोकास प्रकाशित करणाऱ्या आपल्या ज्ञानरूपी किरणांनीं सर्व पदार्थांचें स्वरूप जाणलें व गणधरादिकामध्यें श्रेष्ठ असलेल्या या तीर्थंकरानें मुक्ति संपादन केली.**

इत्थम्भूतस्य भगवतः पादयुगलं कीदृशमित्याह—

**वर सांगितलेल्या गुणांना धारण करणाऱ्या श्री नेमिनाथ तीर्थं**

करांचे पाय कसे होते याचें वर्णन.

त्रिदशेंद्रमौलिमणिरत्न-
किरणविसरोपचुम्बितम् ।
पादयुगलममलं भवतो
विकसत्कुशेशयदलारुणोदरम् ॥१२३॥
नखचंद्ररश्मिकवचाति-
रुचिरशिखरांगुलिस्थलम् ।
स्वार्थनियतमनसः सुधियः
प्रणमंति मंत्रमुखरा महर्षयः ॥ १२४ ॥

**त्रिदशे**त्यादि ! **त्रिदशा** देवास्तेषामि**न्द्राः** स्वामिनः तेषां **मौलयः** मुकुटानि तेषु **मणिरत्नानि** मणयः पद्मरागादयस्त एव **रत्नानि** वज्रादीनि वा तेषां **किरणाः** तेषां **विसरः** प्रसरः तै**रुपचुंबितं** । किं तत् ? **पादयुगलं** । कथम्भूतं ? **अमलं** न विद्यते मलं पापं यस्य, यद्दर्शनेन भव्यानां वा कस्य संबंधि तत् ? **भवतः** अरिष्ठनेमितीर्थंकरदेवस्य । पुनरपि कथम्भूतमित्याह **विकसदित्यादि** । विकसच्च तत्कुशेशयंच पद्मं तस्य दलं पत्रं तद्वदरुणं रक्तं उदरं पादतलं यस्य **तद्विकसत्कुशेशयदलारुणोदरम्** । पुनरपि किंविशिष्टं पादयुगलमित्याह **नखेत्यादि** । नखा एव चन्द्रास्तेषां रश्मयस्तेषां कवचः परिवेषः तेनातिरुचिरं शिखरमग्रभागो यस्य तत्तथाविधं अंगुलीनां स्थलं उन्नतप्रदेशो यस्य पादयुगलस्य तत् **नखचन्द्ररश्मिकवचातिरुचिरशिखरांगुलिस्थलं** तत्किं कुर्वंति ? **प्रणमन्ति** । के ते ? **महर्षयः** । कथम्भूताः **मन्त्रमुखराः** मन्त्रेण सप्ताक्षरेण, सामान्यस्तुतिरूपेण वा **मुखरा** वाचालाः । पुनरपि कथम्भूताः ? **सुधियः** शोभना धीर्येषां अत एव **स्वार्थनियतमनसः** स्वार्थे मोक्षलक्षणे नियतं नियंत्रितं मनो यैः ॥

अर्थ—देवेंद्रांच्या मुकुटामध्यें असलेल्या पद्मराग व हिरे यांच्या किरणांच्या समूहानें स्पर्शित झालेले [ देवेंद्र नमस्कार करीत असतां त्यांच्या मुकुटांतील रत्नांची कांति श्री नेमिनाथस्वामीच्या चरणावर पडली ] व प्रफुल्लित झालेल्या तांबड्या कमळांच्या पाकळीप्रमाणें तांबडा रंग धारण करणारे, नखरूपी चंद्राच्या किरणांनीं व्याप्त झाल्यानें अतिशय शोभत आहे पुढचा भाग ज्यांचा अशा बोटांनीं शोभणारे, असें आपले पाय हे श्री जिनेश मोक्ष प्राप्तिकडे ज्यांचें लक्ष्य लागलें आहे ' नेमिनाथायनमः ' या सात अक्षरी मंत्राचा हमेशा उच्चार करणारे, किंवा आपलें गुणवर्णन करणारे असे विद्वान् गणधरादिक महर्षि मोठ्या भक्तिनें वंदितात. ( नमस्कार करितात ),

न केवलं त एव भगवतः पादयुगलं प्रणमंति किन्त्वन्येपीत्याह ।

केवळ महर्षीच श्री जिनाच्या चरणांना नमस्कार करितात असें नाहीं, दुसरे भव्यजीव देखील नमस्कार करितात हे सांगतात.

द्युतिमद्रथांगरविबिंबकिरणजटिलांशुमंडलः ।
नीलजलदजलराशिवपुः सहबन्धुभिर्गरुडकेतुरीश्वरः
हलभृच्च ते स्वजनभक्तिमुदितहृदयौ जनेश्वरौ
धर्मविनयरसिकौ सुतरां चरणारविंदयुगलं प्रणेमतुः

द्युतीत्यादि । द्युतिरस्यास्तीति द्युतिमत् तच्चतद्रथांगं च चक्रं तदेव रविबिम्बं । रवेर्बिम्बमिव बिम्बमाकारो यस्य तस्य किरणास्तैर्जटिलं संवलितमंशुमण्डलं देहदीप्तिसंघातो यस्य । अंसमण्डल इति च पाठः । अंसः स्कन्धः तस्य मण्डलं विस्तारस्तैर्जटिलं यस्य गरुडकेतोः स तथोक्तः । पुनरपि कथम्भूतः इत्याह नीलेत्यादि । नीलश्चासौ, जलदश्च सजलमेघः स च जलराशिश्च समुद्रः ताविव वपुः शरीर

यस्य । नीलजलजमित्यादिश्चक्वचित्पाठः । नीलजलजानि नीलोत्पलानि; तेषां दलराशिः पत्रसंघातः तत्तुल्यं वपुर्यस्य । कोसावित्थम्भूतो ? **गरुडकेतुर्गरुडध्वजो वासुदेवः** । किं विशिष्ट **ईश्वरः** पृथ्वीपतिः । किमेकाकीत्याह **सहबंधुभिरिति** । न केवलं गरुडकेतुर्हलभृच्च बलभद्रोऽपि तौ द्वौ **प्रणमतुः** स्तुतवंतौ । किंतु चरणारविंदयुगलं चरणावेव अरविंदे पद्मे तयोर्युगलं । कस्य ते तव । कथम्भूतौ ? जनेश्वरौ जनस्य लोकस्य ईश्वरौ स्वामिनौ । पुनरपि कथम्भूतौ ? **स्वजनभक्तिमुदितहृदयौ** स्वजने बंधौ भक्तिरनुरागः तया मुदितं हृष्टं हृदयं ययोः पुनरपि किं विशिष्टौ ? **धर्मविनयरसिकौ** धर्मार्थो विनयो धर्मविनयः तत्र रसिकौ अनुरक्तौ । कथं प्रणमतुः **सुतरां** अत्यर्थम् ।

**अर्थ—प्रकाशमानचक्ररूपी सूर्याच्या किरणांनीं ज्याचा सारा देह व्यापून गेला आहे. व ज्याच्या शरीराची कांति निळ्या कमलांच्या पाकळ्यांच्या समूहाप्रमाणें निळी आहे. व ज्याच्या जयपताकेवर गरुडाचें चिह्न आहे असा कृष्ण व बलभद्र या उभयतांनीं हे नेमिजिनेश ? आपण त्यांचें बंधु असल्यामुळें भ्रातृप्रेमानें आनंदित चित्त होऊन आपल्या सर्व बंधूसह मोठ्या विनयानें वारंवार आपल्या चरणकमलांस नमस्कार केला. श्री कृष्ण व बलभद्र हे पृथ्वीपति होते, धर्माचा व धार्मिक जनांचा विनय, आदर सत्कार करण्याचें त्यांना व्यसनच लागलें होतें.**

यत्र पर्वते गत्वा भगवतश्चरणारविन्दयुगलं तौ प्रणेमतुः स कीदृश इत्याह—

श्री कृष्ण व बलभद्र यांनीं ज्या पर्वतावर जाऊन श्री नेमिनाथ जिनाच्या चरणकमलांस नमस्कार केला तो पर्वत कसा होता याचें वर्णन आचार्य करतात—

**ककुदं भुवः खचरयोषिदुषित—**
**शिखरैरलंकृतः ।**

मेघपटलपरिवीततटस्तव
लक्षणानि लिखितानि वज्रिणा ॥१२६॥
वहतीति तीर्थमृषिभिश्च
सततमभिगम्यतेद्य च ।
प्रीतिविततहृदयैः परितो
भृशमूर्जयंत इति विश्रुतोचलः ॥१२७॥

**ककुदमित्यादि**। **ककुदमिव** ककुदं । कस्या ? **भुवः** पृथिव्याः । यथा ककुदं वृषभोपरिस्कंधप्रदेशस्थं सर्वतद्वयवानामुपरिवर्ति शोभाकारि च तथा ऊर्जयंताचलः सकलभूम्यवयवानामित्यर्थः । पुनरपि किंविशिष्टः इत्याह खचरेत्यादि खचरा विद्याधर्यस्तेषां **योषितो** विद्याधर्यस्ताभिरु**षितानि** सेवितानि तानि च तानि **शिखराणि** च तैरलं**कृतः** शोभितः । पुनरपि कथम्भूतः ? **मेघपटलपरिवीततटः** । मेघानां पटलानि तैः परि समंताद्वीतानि व्याप्तानि तटानि सानूनि यस्य । पुनरपि कथम्भूत इत्याह **तवे**त्यादि । तव अरिष्टनेमेः । **लक्षणानि** चिह्नानि । **लिखितानि** उत्कीर्णानि । केन ? **वज्रिणा** इंद्रेण । तानि **वहति** धरति इति हेतोः । तीर्थं पुण्यस्थानं । अतएव **ऋषिभिश्च** ऋषिभिरपि । **सततं** सर्वकालं । **अभिगम्यते** समाश्रीयते सेव्यते । कदा ? **अद्य** इदानीमपि । कथम्भूतैः ? **प्रीतिविततहृदयैः** प्रीत्या तुष्ट्या विततानि विस्तीर्णानि उल्हसितानि हृदयानि येषां तैः कथं ? परितः समंतात् । अयं एतद्विशेषण विशिष्टोऽ**चलः** पर्वतः । कथम्भूतो ? **लोकविश्रुतः** प्रख्यातः । कथं **ऊर्जयंत** इत्येवं भृशमत्यर्थम् ।

**अर्थः—जसें बैलाच्या खांद्यावर असलेलें वशिंड सर्व अवयवामध्यें उंच व शोभादायक असतें तद्वत् तो पर्वत पृथ्वीवर**

उंच असल्यामुळें तो पृथ्वीचें वाशिंडच आहे असें वाटतें वि-द्याधरांच्या स्त्रिया ज्यावर क्रीडा करीत असतात अशा शिखरांनीं तो अलंकृत झाला आहे. व मेघांनीं त्याचे कडे आच्छादित झाले आहेत. त्याच्यावर इंद्रानें हे जिनेश! आपलीं शुभचिन्हें लिहिलीं आहेत त्यामुळें हें पुण्यस्थान आहे असें समजून उल्हसित अंतःकरणाच्या ऋषींनीं हा नेहमीं सर्व बाजूनें अतिशय सेविला जातो. व जगांत ऊर्जयंत यानांवानें हा पर्वत प्रसिद्ध झाला आहे.

अत्राह मीमांसको यदुक्तं ज्ञानविपुलकिरणैरिति। तत्र भगवतो ज्ञानमिंद्रियजं ज्ञानत्वादस्मदादिज्ञानवत्, अंतः कथं सर्वज्ञता स्यादित्याशंक्याह—

मागें ' ज्ञान विपुलकिरणैः ' केवलज्ञानरूपी चोहीकडे पसरणाऱ्या किरणांनीं सर्व जगत् श्रीनेमिजिनांनीं प्रकाशित केलें असें एका श्लोकांत आचार्यांनीं सांगितलें आहे. परंतु भगवंताचें ज्ञान देखील आमच्या ज्ञानासारखें इंद्रियापासूनच उत्पन्न होतें. यास्तव ते देखील आमचासारखेच असर्वज्ञ आहेत, अशा मीमांसकाच्या शंकेस आचार्य उत्तर देतात.

बहिरंतरप्युभयथा च
करणमविघाति नार्थकृत्।
नाथ युगपदखिलं च सदा
त्वमिदं तलामलकवद्विवेदिथ ॥ १२८ ॥

बहिरंतरपीत्यादि। बहिःकरणं चक्षुरादि। अंतरपि करणं मनोलक्षणं। तत्प्रत्येकमुभयथा वा अविघाति सर्वज्ञतास्वरूपस्य विघातकं न भवति। उपकारकं तर्हिस्यादित्यत्राह नेत्यादि नार्थकृत् न स्वकार्य

कारि यत एवं अतः हे नाथ विवेदिथ ज्ञातवान् किं तत् ? इदं जगत्। किं क्रमेण ?। युगपत् एक हेलया । किं नियतम् ? अखिलं च नि-रवशेषमेव । किं नियतकालं ? सदा सर्वकालं । किमिव ? तलाम-लकवत् तले करतले आमलकः स्फाटिकमणिः स इव तद्वत् ।

अर्थः—हे प्रभो नेमि जिनेश ! आपलीं नेत्र, कान, नाक, वगैरे इन्द्रियें व अन्तकरण हीं सर्वज्ञपणाला बाधा आणीत ना-हींत व हीं सर्वज्ञपणाला साहायक हीं नाहींत. हे जिनेश ! आपण हें सगळें जग तळ हातांत असलेल्या स्फटिक मण्याप्र-माणें एकदम, पूर्णपणें व हमेशा जाणलें आहे.

विशेष स्पष्टीकरणः—श्री नेमि जिनेश्वराचें ज्ञान अतीन्द्रि-य होतें यामुळें इन्द्रियांचा व मनाचा पदार्थांचें स्वरूप जाण-ण्यामध्यें त्यांना कांहीं उपयोग होत नसे. तसेंच त्यांच्या अती-न्द्रिय ज्ञानामध्यें हीं इन्द्रियें व्यत्यय देखील आणीत नव्हतीं. यामुळें हीं इन्द्रियें असून नसल्यासारखींच होतीं. श्री नेमि जि-नांनीं पदार्थांना क्रमानें जाणलें नाहीं. क्रमानें जाणू लागल्यास त्यांना सर्वज्ञ ह्मणतां येणार नाहीं कारण पदार्थ अनंत आहेत. त्यांचा एक एक स्वभाव जाणीत बसल्यास अनंत काल निघून जाईल. एका समयांत एकच पदार्थ जाणला गेल्यानें सर्वज्ञपणा नष्ट होईल. यास्तव श्री जिनांचें ज्ञान इन्द्रियजन्य नव्हे हें सिद्ध होतें. इन्द्रियें मात्र क्रमाक्रमानें पदार्थांना जाणतात. अतीन्द्रिय ज्ञान एकदम सर्व पदार्थांना जाणतें. इन्द्रियजन्य ज्ञान सर्व पदार्थांना जाणीत नाहीं. ते पदार्थांच्या कांहीं अंशांना जाणतें. इन्द्रियजन्य ज्ञान ज्ञानावरणीय कर्माचा जसा क्षयोपशम असेल त्याप्रमाणें त्याला अनुसरून ते पदार्थांना जाणतें. अतीन्द्रिय ज्ञान आत्म्यापासून उत्पन्न होतें. तें ज्ञानावरणीय कर्मांचा अ-भाव झाल्यामुळें अत्यंत स्पष्ट असतें. यामुळें त्या ज्ञानामध्यें सर्व

वस्तु व त्यांचे त्रिकाल वर्ती पर्याय एकदम प्रतिभासित होतात. अतींद्रिय ज्ञानामध्यें कमी जास्तीपणा दिसत नाहीं इंद्रियजन्य-ज्ञानामध्येंच हा फरक दृष्टीस पडतो. इंद्रियजन्य ज्ञान सर्वदा एकसारखेंच नसतें अतींद्रियज्ञानमात्र सर्वदा एकरूप असतें तें एकदा सर्वपदार्थांना जाणतें व एकदां थोड्या पदार्थांना जाणतें असें स्थित्यंतर या ज्ञानामध्यें होत नाहीं. यावरून जिनेश्वराचें ज्ञान आमच्या ज्ञानाहून निराळें आहे हे सिद्ध झालें.

अतएव ते बुधनुतस्य
चरितगुणमद्भुतोदयम् ।
न्यायविहितमवधार्य जिने त्वयि-
सुप्रसन्नमनसः स्थिता वयम् ॥ १२९ ॥

यतएवं विनेदिथ त्वमतएव अस्मादेव कारणात् । ते तव कथम्भूतस्य ? बुधनुतस्य बुधैर्गणधरदेवादिभिर्नुतस्तुतस्तस्य । चरितमनुष्ठानं तस्य गुणे निर्विघ्नतः स्वसाध्यप्रसाधकत्वं । किं विशिष्टं ? अद्भुतोदयं अद्भुतः साश्चर्य उदयः समवसरणकेवलज्ञानादिलक्षणालक्ष्मीर्यस्मात् । पुन पि किं विशिष्टं ? न्यायविहितं न्यायेन नीत्या आगमप्रतिपादितोपपत्त्या विहितं कृतमनुष्ठित। इत्थम्भूतं तद्गुणमवधार्य संचिंत्य। त्वयि अरिष्टनेमितीर्थकरदेवे । कथम्भूते ? जिने अशेषकर्मोन्मूलके स्थिताः प्रांजलीभूय व्यवस्थिताः । तेके ? वयंस्तोतारः कथम्भूताः ? सुप्रसन्नमनसः सुष्ठु प्रसन्नं विशुद्धं भक्त्या अनुगृहीतं मनो येषाम् ।

**अर्थः—** आपण सर्व पदार्थांचें स्वरूप स्पष्टपणें जाणता म्हणून हे जिनेश आपणांस सर्व गणधरादि यतीश्वर नमस्कार करितात. आपणांस तपश्चरणकरण्यानें आश्चर्यांत पाडणाऱ्या स्वरूपाचे समवसरणाची रचना, अनंतज्ञान, दर्शन, सुख व-

तेरे अनंतचतुष्टय गुण प्राप्त झाले. ते सर्व गुण आगमामध्यें सांगितलेल्या पद्धतीप्रमाणें आपण प्राप्त करून घेतले आहेत. या आपल्या गुणांचा विचार करून; हे कर्मोन्मूलका जिनदेवा आम्ही आपल्याच ठिकाणीं भक्तीनें प्रसन्न चित्त झालों आहोंत.

तात्पर्य--श्री नेमि जिनाच्या उत्कृष्टगुणांचा विचार केल्यानें आमच्या मनांतील श्रद्धा बळकट झाली. व त्यामुळें आम्ही हरिहरादिकांची आराधना करणें सोडून दिलें. व नेमिजिनाच्या चरणाचाच आश्रय घेतला त्याच्या चरणाच्या आश्रयानें आमचें अंतःकरण अतिशय प्रसन्न झालें. असा या श्लोकाचा अभिप्राय आहे.

कथांश-नेमिनाथ तीर्थंकराच्या पित्याचें नांव समुद्रविजय असें होतें व मातेचें शिवादेवी असें होतें. कृष्ण व बलभद्र नेमिनाथ जिनाचे चुलत भाउ होते. नेमिनाथ तीर्थंकर अतिशय सामर्थ्यशाली होते. यांचे राजमति नांवाच्या राजकुमारीशीं विवाह होणार होता. परंतु विवाह झाल्यावर हें माझें राज्य हिसकावून घेतील अशी कृष्णाच्या मनामध्यें भीति उत्पन्न झाली. त्यानें पारध्याकडून नानातऱ्हेचे प्राणी आणवून त्यांना एके ठिकाणीं कोंडून ठेविलें. नेमिनाथ स्वामी आपल्या मित्रांसह फिरावयास चालले असतां त्यांच्या कानीं पशूंचें दीन शब्द पडलें. पारध्यानीं तुमच्या लग्नामध्यें हे पशु मारण्यासाठीं श्री कृष्णानीं येथें कोंडून ठेविले आहेत. असें सांगितलें. हें ऐकून त्यांना वैराग्य झालें. त्यांनीं दीक्षा घेतली. व त्यांनीं केवलज्ञान प्राप्त करून घेऊन शेवटीं मुक्ति मिळविली.

याप्रमाणें नेमिनाथ जिनाचें स्तोत्र संपलें.

अथ पार्श्वनाथस्तुतिः

तमालनीलैः सधनुस्तडिद्गुणैः
प्रकीर्णभीमाशनिवायुवृष्टिभिः ॥
बलाहकैर्वैरिवशैरुपद्रुतो
महामना यो न चचाल योगतः ॥

**तमालनीलै**रित्यादि । **न चचाल** न चलितवान् । कस्मात् ? **योगतः** परमशुक्लध्यानात् । किंविशिष्ट ? **उपद्रुतः** पीडितः । कैः ? **बलाहकैः** मेघैः । कथम्भूतैः ? **तमालनीलैः** तमालाः वृक्षविशेषाः तद्वन्नीलैः नीलवर्णैः । पुनरपि कथम्भूतैः ? **सधनुस्तडिद्गुणैः** तडित एव गुणाः धनुषां इन्द्रचापानां तडिद्गुणा धनुस्तडिद्गुणा तैः सह वर्तते इति सधनुस्तडिद्गुणाः तैः । पुनरपि किंविशिष्टैः इत्याह । **प्रकीर्णे**त्यादि । **अशनिश्च वायुश्च वृष्टिश्च** अशनिवायुवृष्टयः **भीमाश्च** ता अशनि वायुवृष्टयश्च ताः प्रकीर्णा समन्ततः क्षिप्ताः यै स्ते तथोक्ताः तैः पुनरपि किंविशिष्टैः ? **वैरिवशैः** कमठवशवर्तिभिः । कथम्भूतो यः पार्श्वनाथो भगवान् ? **महामनाः** महत्परीषहेभ्योऽक्षुभितं मनो यस्य

**अर्थः**–विद्युल्लतारूपी दोरीनें शोभणाऱ्या इन्द्र धनुष्यांना धारण करणाऱ्या, वज्रपात, मोठा वारा व भयंकर वृष्टि करणाऱ्या, दुष्ट कमठानें उत्पन्न केलेल्या, तमाल वृक्षाप्रमाणें काळे असलेल्या मेघांनीं पीडिलेले, परीषहांनीं ज्याचें चित्त डळमळलें नाहीं असे पार्श्वनाथ जिनेश्वर ध्यानापासून बिलकुल ढळले नाहींत.

**कथा**––पार्श्वनाथस्वामी ध्यानस्थ असतां एका शंबर नांवाच्या ज्योतिष्क देवानें त्यांना भयंकर उपसर्ग केला. हा देव

पार्श्वनाथांचा पूर्वभवांतील कमठ नांवाचा वडील भाऊ होता. यानें त्या भवापासून यांच्याशीं वैरधारण केलें होतें व प्रत्येक भवामध्यें यानें त्यांना अतिशय दुःख दिलें. कांहीं पूर्वपुण्याच्यायोगें हा शंबर नांवाचा ज्योतिष्क देव झाला. एके दिवशीं विमानांतें बसून जात असतां जेथें पार्श्वनाथस्वामी ध्यान धारण करून बसले होते तेथें तें विमान आल्याबरोबर तें स्वामींच्या माहात्म्यानें पुढें जाऊं शकलें नाहीं. हें पाहून माझें विमान थांबविणारा कोण आहे याचा तपास काढण्यासाठीं तो खालीं उतरला. पार्श्वनाथ स्वामीस पाहतांच त्याच्या मनांत पूर्वभवांचें वैर जागें झालें आणि त्यानें पार्श्वनाथ स्वामीस भयंकर उपद्रव केला. तो उपद्रव पातालवासी धरणेंद्रानें तेथें येऊन दूर केला. [पार्श्वनाथ स्वामीचें चरित्र पाहिल्यानें यांच्याविषयींची विशेष हकीगत समजेल. ]

भगवंत उपसर्गनिपातं ज्ञात्वा धरणेंद्रः किं कृतवानित्याह—

श्रीपार्श्वनाथ स्वामींना भयंकर उपसर्ग होत आहे असें अवधिज्ञानानें जाणून धरणेंद्रानें काय केलें याचें उत्तर आचार्य देतात.

बृहत्फणामंडलमंडपेन यं,
स्फुरत्तडित्पिंगरुचोपसर्गिणाम् ।
जुगूह नागो धरणो धराधरं,
विरागसंध्यातडिदम्बुदो यथा ॥ १३२ ॥

बृहदित्यादि । जुगूह वेष्टितवान् । कोसौ ? नागः । किंनामा ? धरणेन्द्रनामा । केनेत्याह बृहदित्यादि बृहत्यश्च ताः फणाश्च तासां मण्डलं चक्रं संघातः तस्य मण्डपः तेन । कथम्भूतेन ? स्फुरत्तडित्पिंगरुचा स्फुरन्ती चासौ तडिच्च स्फुरत्तडित् तस्या इव पिंगा पीता रुक् दीप्तिः यस्य तेन । कथम्भूतं ? यं पार्श्वनाथं । उपसर्गिणं उपस

गेवन्तम् । क इव जुगूहेत्याह धरा धरमित्यादि । धराधरं पर्वतं । यथा जुगूह । कोसौ ? विरागसंध्यातडिदम्बुदः तडिता उपलक्षितोऽम्बुदः तडिदम्बुदः । विगतो रागो यस्याः सा चासौ सन्ध्या च कृष्णसंध्या तस्यां तडिदम्बुदः विविधो वा रागो नीलपीतादिवर्णो यस्याः सा चासौ संध्या च तया तुल्या या तडित् तयोपलक्षितोम्बुदः । विराग-सन्ध्यायां वा तडितोपलक्षितोम्बुदः विंगः ॥

अर्थः—नानाविध रंगानें रंगलेल्या संध्येची छटा ज्यांत पसरली आहे असा विजेनें सहित असलेला मेघ जसा पर्वताला आच्छादितो त्याचप्रमाणें चमकणाऱ्या विजेप्रमाणें पिंगट कान्तीला धारण करणाऱ्या मोठ्या फणांच्या समूहाच्या मंड-पानें धरणेंद्रानें कमठाकडून उपसर्ग ज्यांना होत आहे असें पार्श्वनाथ तीर्थंकर वेष्टित झाले.

कथांश धरणेंद्रानें येऊन पार्श्वनाथ स्वामींचा उपसर्ग दूर केला. मेघांच्या द्वारें कमठानें भयंकर जलवृष्टि केली होती तिच्यापासून त्यांना सुरक्षित ठेवण्याकरितां धरणेंद्रानें पार्श्वनाथ स्वामींवर मोठा फणांचा मंडप उभा केला. तो भयंकर फणांचा मंडप पाहून तो दुष्ट कमठ अतिशय भ्याला व तेथून तो पळून गेला.

तदुपसर्गनिवारणानन्तरं भगवान्किं कृतवानित्याह ।
उपसर्ग दूर झाल्यानंतर श्रीपार्श्वनाथ स्वामींनी काय केलें हें सांगतात

स्वयोगनिस्त्रिंशनिशातधारया,
निशात्य यो दुर्जयमोहविद्विषम् ।
अवापदार्हन्त्यमचिन्त्यमद्भुतं,
त्रिलोकपूजातिशयास्पदं पदम् ॥ १३३ ॥

स्वयोगेत्यादि । अवापत्प्राप्तवान् । किं तत् ? आर्हन्त्यं । किं

कृता ? **निशात्य** विनिपात्य विनाश्य । कं ? **दुर्जेयमोहविद्विषं** मोह एव विद्विट् शत्रुर्मोहविद्विट् । दुर्जयश्चासौ मोहविद्विट् तं । कयेत्याह **स्वयोगेत्यादि स्वस्य योगः** परमशुक्लध्यानं स एव **निस्त्रिंशः** खड्गस्तस्य **निशाता** तीक्ष्णा । या **धारा** योगाभ्यासपर्यंतरूपा तया । कथम्भूतमाहत्म्यं ? **अचिन्त्यं** चिन्तायाः अप्यगोचरं । **अद्भुतं** साश्चर्यगुणोपेतं । पुनरपि किंविशिष्ट ? **पदं** स्थानं । कथम्भूतं पदं ? **त्रिलोकपूजातिशयास्पदं** त्रिलोकानां पूजा तस्या अतिशयः परमप्रकर्षः तस्य आस्पदं आश्रयः ॥

अर्थः उत्कृष्ट शुक्लध्यानरूपी खड्गाच्या तीक्ष्ण धारेनें जिंकण्यास कठिण अशा मोह शत्रूचा ज्यानें नाश केला व ज्यानें वर्णन करणें अशक्य आहे, जे आश्चर्यकारण गुणांला धारण करितें व जें लोकत्रयांतील सर्व प्राण्यांला वंद्य आहे असें आर्हंत्यपद—तीर्थंकरपद ज्यानें—पार्श्वनाथजिनानें मिळविलें.

इत्थम्भूतं पार्श्वनाथतीर्थंकरदेवं दृष्ट्वा वनवासिनस्तापसाः स्वप्रयासे विफलमतयो भगवन्मार्गेण भवितुमिच्छंतीति दर्शयन्नाह—

श्री पार्श्वनाथ तीर्थकरांनीं अर्हताची पदवी प्राप्त करून घेतली
हें पाहून व आपला सर्व प्रयास व्यर्थ गेला हें बघून
श्री पार्श्वनाथ स्वामींनीं दाखवून दिलेल्या मार्गाचा
आश्रय करून आपणही त्यांच्याप्रमाणेंच व्हावें
अशीं वनवासी कुतपस्व्यांना इच्छा झाली
हें आचार्य या श्लोकांत दाखवितात.

यमीश्वरं वीक्ष्य विधूतकल्मषं
तपोधनास्तेऽपि तथा बुभूषवः ।
वनौकसः स्वश्रमवन्ध्यबुद्धयः
शमोपदेशं शरणं प्रपेदिरे ॥ १३४ ॥

यमित्यादि । यं पार्श्वनाथं वीक्ष्य विलोक्य । कथम्भूतं ? **ईश्वरं**

सकललोकप्रभुं । पुनरपि कथम्भूतं ? विधूतकल्मषं क्षिप्तं कल्मषं घातिकर्मचतुष्टयरूपं पापं येनासौ तथोक्तस्तं । के ते ? तपोधनाः तापसाः । किंविशिष्टाः ? वनौकसः वने अटव्यां ओको गृहं येषां ते वनौकसो वनवासिनः । तेऽपि परदर्शनानुयायिनः, न केवलं भवद्दर्शनानुयायिनः शरणं प्रपेदिरे । किं कर्तुमिच्छवः ? तथा बुभूषवः तथा भगवत्प्रकारेण बुभूषवो भवितुमिच्छवः । कथम्भूताः संतः ? स्वश्रमवंध्यबुद्धयः स्वस्य श्रमः पंचाग्निसाधनादिप्रयासः तस्मिन्वंध्या विफला बुद्धिर्येषां ते । इत्थम्भूताः सन्तः किं कृतवंतः ? शमोपदेशं शरणं प्रपेदिरे शमस्य सकलसंसारोपरमस्य निखिलरागाद्युपरमस्य वा उपदेशो मोक्षमार्गस्तं, यदि वा शमस्य उपदेशो यस्मादसौ शमोपदेशो भगवान् तं शरणं प्रपेदिरे प्रतिपन्नाः ।

अर्थः— पापरूपी चार घातिकर्मांचा नाश ज्यानें केला आहे. सर्व लोकांचा प्रभु अशा ज्याला ( पार्श्वनाथाला ) पाहून वनवासी पंचाग्निसाधनादि तपश्चरण करणारे परंतु अशा तपश्चरणानें ज्यांचे सर्व श्रम व्यर्थ जातात असे अन्य कुतपस्वी श्री जिनासारखे आपणही अर्हतावस्थेनें संपन्न व्हावें अशी मनामध्यें इच्छा धरून रागादि दुष्ट काशापासून सोडविणाऱ्या किंवा सर्व संसारापासून विरक्त बनविणाऱ्या मोक्षमार्गाला ते शरण गेले. किंवा मोक्षमार्गाचा उपदेश ज्यानें केला त्या पार्श्वनाथ जिनाला ते शरण गेले.

तात्पर्य — श्री पार्श्वनाथ जिनेश्वराचेवेळीं मिथ्यात्वाचा चोहोंकडे बराच प्रसार झाला होता. परंतु जेव्हां मोक्षाचा रस्ता स्वामींनीं खुला केला तेव्हां पुष्कळ मिथ्यातपस्वी श्रीजिनाचा उपदेश ऐकून आपला पूर्वीचा मिथ्या मार्ग सोडून देत झाले. व मोक्षमार्गाचा स्वीकार करून श्री पार्श्वनाथस्वामीस शरण गेले.

स एवंविधो भगवान् स किं क्रियते इत्याह—

त्या भगवंताला अर्हतपद मिळालें त्या भगवंताला मजकडून काय केलें जातें हें सांगतात. [ ह्मणजे मजकडून नमस्कार केला जातो असें ग्रंथकार या श्लोकामध्यें सांगतात. ]

स सत्यविद्यातपसां प्रणायकः
समग्रधीरुग्रकुलाम्बरांशुमान् ।
मया सदा पार्श्वजिनः प्रणम्यते
विलीनमिथ्यापथदृष्टिविभ्रमः ॥ १३५ ॥

**स इत्यादि ।** **स** प्रागुक्तविशेषणविशिष्टः **पार्श्वजिनः प्रणम्यते**। केन ? **मया** समंतभद्रस्वामिना । किं कदाचित् ? **सदा** सर्वकालं कथम्भूतः स इत्याह **सत्येत्यादि ।** **विद्याश्च तपांसि च** विद्यातपांसि सत्यानि च तानि विद्यातपांसि च तेषां **प्रणायकः** प्रणेता । पुनरपि कथम्भूतः **समग्रधीः** समग्रा संपूर्णा केवलज्ञानलक्षणा धीर्यस्य । पुनरपि किंविशिष्टः ? **उग्रकुलाम्बरांशुमान् उग्रं च** तत्कुलं च तदेव अंबरं आकाशं तस्य अंशुमान् चंद्रः तदुद्योतकत्वात् । पुनरपि किंविशिष्ट इत्याह **विलीनेत्यादि ।** **मिथ्या चासौ पंथाश्च** मिथ्यादर्शनादिकुमार्गः तन्निबंधना **दृष्टयो** मतानि तैर्जनिता **विभ्रमाः** सर्वथानित्यक्षणिकाद्वैतवादिसमारोपाः विलीना विनष्टास्ते यस्माद्भव्यानां स तथोक्तः ।

**अर्थः—उग्रवंशरूपी आकाशाची शोभा वाढविण्यास चंद्रासारखा असलेला, केवलज्ञान संपन्न, सम्यग्ज्ञान व तपश्चरण यांचें स्वरूप भव्यलोकांना सांगणारा, सर्वथा वस्तु नित्यच आहेत, त्या क्षणिकच आहेत किंवा सर्व ब्रह्ममयच आहे अशा तऱ्हेचे मिथ्यादर्शनाच्या उदयानें भव्य जनांच्या हृदयांमध्यें उत्पन्न झालेले विचार ज्यानें दूर केले आहेत असा तो पार्श्वजिनेंद्र मजकडून [ समंतभद्राचार्याकडून ] हमेशा भक्तीनें वंदिला जात आहे.**

याप्रमाणें पार्श्वजिनाचें स्तोत्र संपलें.

श्रीमहावीरस्तुतिः।

( छन्दः स्कन्धकः )

कीर्त्या भुवि भासितया
वीर त्वं गुणसमुत्थया भासितया।
भासोडुसभासितया
सोम इव व्योम्नि कुन्दशोभासितया॥१६॥

**कीर्त्येत्यादि**। हे वीर त्वं भासि शोभसे। क? **भुवि** पृथिव्यां। कया? **कीर्त्या** ख्यात्या। कथम्भूतया तया कीर्त्या? **गुणसमुत्थया** गुणेभ्य आत्मशरीरगतेभ्यः समुत्था प्रादुर्भावो यस्याः सा तथोक्ता तया। अत एव **भासितया** उज्ज्वलया निर्मलया। अत्र दृष्टांतम ह **भासेत्यादि**। **सोम इव** यथा सोमश्चन्द्रो **व्योम्नि** गगने भाति तथा त्वं कीर्त्या भासीति सम्बन्धः। कया सोमो भाति? **भासा** दीप्त्या। किंविशिष्टया? **उडुसभासितया** उडूनां नक्षत्राणां सभा उडुसभं तत्र असितया स्थितया। पुनरपि किंविशिष्टया? **कुन्दशोभासितया** कुंदानां शोभा कुंदशोभा तद्वत् आ समंतात्सितया धवलया॥

अर्थ -जसा चंद्र आकाशांत नक्षत्रांच्या समूहानें वेढलेल्या व कुन्द पुष्पाच्या कांतीप्रमाणें पांढऱ्या अशा स्वतःच्या निर्मल कांतीनें शोभतो, त्याप्रमाणें आत्मा व शरीर यापासून उत्पन्न झालेल्या गुणामुळें शोभणाऱ्या अशा सुन्दर कीर्तीनें हे जिनेश वीरनाथ! आपण या जगामध्यें फारच शोभत आहांत.

तात्पर्य--महावीर तीर्थकरांची लोकामध्यें जी प्रसिद्धी झाली ती त्यांच्या आत्मिक गुणामुळें झाली. अनंतज्ञान, शक्ति, सुख वगैरे आत्मिक गुण त्यांच्या अंगीं होते. तसेंच ते अतिशय सुन्दर व फारच पराक्रमी होते म्हणून 'महावीर' हें त्यांचें नांव सार्थक होतें.

के ते भवदीया गुणा येभ्यः सा समुत्था इत्याह ।

महावीर तीर्थकरांचे असे कोणते गुण आहेत ज्यापासून त्यांची कीर्ती उत्पन्न झाली ? य चें उत्तर आचार्य देतात.

तव जिन ! शासनविभवो,
जयति कलावपि गुणानुशासनविभवः ।
दोषकशासनविभवः,
स्तुवन्ति चैनं प्रभाकृशासनविभवः॥१३७॥

**तवेत्यादि** । हे जिन ! **जयति** सर्वोत्कर्षेण वर्द्धते । कोसौ ? **शासनविभवः** । शास्यन्ते व्युत्पाद्यन्ते हेयोपादेयतत्वं शिष्या येन तच्छासनं प्रवचनं तस्य विभवो माहात्म्यं यथावस्थिताशेषार्थप्रतिपादनलक्षणः । कदा ? **कलावपि** कलिकालेऽपि इदानीमपि इत्यर्थः । कथम्भूतः ? **गुणानुशासनविभवः** गुणेषु अनुशासनं येषां भव्यानां ते गुणानुशासनाः शिष्या तेषां विगतो विनष्टो भवः संसारो यस्मात्स गुणानुशासनविभवः । न केवलं जयति किंतु **स्तुवन्ति च एनं** शासनविभवं । के ते ? **दोषकशासनविभवः** दोषा एव कशाः चर्मयष्टिकाः पीडाकरत्वात्तेषां, असनं क्षेपणं निराकरणं तस्य विभव. प्रभवः समर्थाः गणधरदेवादय । पुनरपि कथम्भूताः ? **प्रभाकृशासनविभवः** । आसते लोका यत्र तदासनं त्रिभुवनं तस्य लोकप्रसिद्धाः विभवो हरिहरादयः प्रभया ज्ञानादितेजसा कृशास्तनूकृता आसनविभवो यैः । यद्वा प्रभयाऽकृशान्यासनानि येषां ते प्रभाकृशासनाः वर्द्धमानस्वामिनोऽन्ये केवलिनः इन्द्रादयो वा ते च ते विभवश्च स्वामिनः ॥

**मराठी अर्थः—** हे वीर जिनेश ! आपल्या शासनाचें माहात्म्य कलिकाळामध्यें देखील विजय पावतें. हे जिनेश ! आपलें शासन शिष्यांना हेयोपादेय तत्वांचा उपदेश करितें. पुद्गलतत्व, कर्म हीं टाकाऊ आहेत व जीवतत्व हेंच प्राह्य आहे.

कारण जीवतत्त्वासच मोक्षाची प्राप्ति होतें, असें तें सांगतें. व जीवादि पदार्थांचें निर्दोष स्वरूप तें भव्यांना दाखवितें. आपल्या शासनापासून—आगमापासून सद्गुणांचा अभ्यास करणाऱ्या भव्य जीवांना मोक्षाची प्राप्ति होते—ते संसारापासून मुक्त होतात. हे वीर जिनेश ! यावकाप्रमाणें दुःखदायक अशा रागद्वेषादि दोषांना दूर झुगारून देण्यास समर्थ असलेले, आपल्या ज्ञानतेजानें जगाचे स्वामी मानले गेलेल्या हरिहर ब्रह्म इत्यादिकांना खालीं पहावयास लावणारे, व महावीरस्वामीच्या सिंहासनापेक्षां ज्यांची कांति कमी आहे अशा आसनावर बसणारे गणधरादिदेव आपल्या आगमाची स्तुति करतात.

ते कथं शासनविभवं स्तुवंतीत्याह—

गणधरादिऋषि आपल्या आगमाचा महिमा कसा गातात ? हें आचार्य सांगतात.

अनवद्यः स्याद्वाद—

स्तव दृष्टेष्टाविरोधतः स्याद्वादः ।

इतरो न स्याद्वादो

सद्वितयविरोधान्मुनीश्वरास्याद्वादः॥१३८॥

अनवद्येत्यादि । नं विद्यतेऽवद्यं दोषोऽस्येत्यनवद्यो निर्दोषः । कोसौ ? स्याद्वादोऽनेकांतवादः । कुतः ? दृष्टेष्टाविरोधतः दृष्टं प्रत्यक्षादि इष्टं आगमः ताभ्यामविरोधतः संवादगोष्ठीतः । कथम्भूतःसोऽनेकांतरूपः ? स्याद्वादः उत्पाद्येत प्रतिपाद्यते येनासौ वादः स्यादिति वादो वाचकः शब्दो यस्यानेकांतवादस्यासौ स्याद्वादः। स्यादस्तीति रूपः एकांतवादः कुतोऽनवद्यो न भवतीत्याह इतर इत्यादि । इतर एकांतः स्याद्वत्वेन वादो न प्रमाणभूतागमः । हे मुनीश्वर ! गणधरदेवादिस्वामिन् ! कुतः स तथाभूतो न भवति, द्वितयविरोधात् दृष्टेष्टविरोधात्

तद्विरोधोप्यस्य कुतः ? **अस्याद्वादो यतः** । स्यादस्तीत्यादिरूपो वादः स्याद्वादः, स न विद्यते यत्र ।

**अर्थः**—हे वीर जिनेश, आपण प्रतिपादिलेला अनेकांत वाद विरोधादि दोष रहित आहे. ( विरोधादि दोषांचें वर्णन केलें आहे. ) कारण अनेकांत वाद हा प्रत्यक्ष, अनुमान, स्मृति, तर्क प्रत्यभिज्ञान व आगम या प्रमाणांनीं बाधित होत नाहीं. अनेकांतवादाचा द्योतक स्यात् हा शब्द आहे स्यात् या शब्दानें वस्तूंतील अनेक धर्मांचें वर्णन करतां येतें. ह्मणून तो अनेकांताचा द्योतक आहे. एकांत वादाला स्याद्वाद ह्मणतां येत नाहीं. तो प्रत्यक्षादि प्रमाण व आगम यानेंही बाधित होतो. ह्मणजे प्रमाणानीं स्याद्वादाची सिद्धि होत असल्यामुळें एकांतवादाचें साधक प्रमाण कोणतें दिसून येत नाहीं. यास्तव हे मुनीश्वरा वीरनाथा ! एकांत हा स्याद्वाद होऊं शकत नाहीं. त्यास अस्याद्वाद ह्मणतात.

अपरमपि भगवतो गुणं दर्शयन्नाह ।

श्रीवीरजिनाच्या पुनः दुसऱ्या कांहीं गुणांचें वर्णन करितात.

**त्वमसि सुरासुरमहितो**
**ग्रन्थिकसत्वाशयप्रणामामहितः ।**
**लोकत्रयपरमहितो—**
**नावरणज्योतिरुज्वलद्धामहितः ॥१३९॥**

त्वमसीत्यादि । **त्वं असि** वर्द्धमानस्वामी भवसि । किंविशिष्टः? **सुरासुरमहितः** [illegible]रसुरैश्च **महितः** पूजितः । पुनरपि किंविशिष्टः ? **ग्रंथिकसत्वाशयप्रणामामहितः**, ग्रंथो मिथ्यात्वादिर्विद्यते येषां ते ग्रंथिका [illegible]ध्यादृष्टयः तेच ते सत्वाश्च प्राणिनः तेषामाशयोऽभक्तं चित्तं तेन प्रणामस्तेनामहितोऽपूजितः । यद्वा ग्रंथिकसत्वानामिवाशयो रागादिकलुषितं चित्तं येषां हरिहरादीनां ते ग्रंथिकसत्वाशयाः तेषु प्र॰

णामः ' कंकालमालाकुलितोरुदेहः ' इत्यादिकः तस्य अमहिरभूमिस्तस्यास्ततः त्वमसि सुरासुरमहितः । पुनरपि कथम्भूतः ? **लोकत्रयपरमहितः** परमश्चासौ हितश्च परमहितो लोकत्रयस्य परमहितो लोकत्रयपरमहितः । पुनरपि किंविशिष्टः ? **अनावरणज्योतिरुज्ज्वलद्धामहितः** अनावरणं च तत् ज्योतिश्च केवलज्ञानं तेन उज्ज्वलत्प्रकाशमानं तच्च तद्धामच मुक्तिस्थानं तत्र हिनो गतः ॥

**अर्थः** – हे वीर जिनेंद्र ! आपण सुर व असुर यांच्याकडून पूजिले जाता. मिथ्यात्व, अनंतानुबंधी क्रोध, मान, माया लोभ यांनीं भरलेल्या मिथ्यात्वी लोकांकडून आपण वंदिले जात नाहीं. अथवा मिथ्यात्वी लोक हरिहरादिकांना कंकालमालाकुलितोरुदेहः, इत्यादि स्तुति म्हणून नमस्कार करतात. तशा स्तुतीस हे वीर जिनेश, आपण अयोग्य आहांत. म्हणजे खरे योग्य आहांत. आपण त्रैलोक्याचें हित करणारे आहात. व निरावरण केवलज्ञानरूपी प्रकाशाचें स्थान जो मोक्ष तो आपण प्राप्त करून घेतला आहे.

पुनरपि किंविशिष्टस्त्वमित्याह—

पुनः आपण कसे आहात हें सांगतात.

सभ्यानामभिरुचितं
दधासि गुणभूषणं श्रिया चारुचितम् ॥
मग्नं स्वस्यां रुचिरं
जयसि च मृगलांछनं स्वकांत्या रुचितम् ॥१४०॥

**सभ्यानामित्यादि** । **दधासि** धारयसि । किं तत् ? **भूषणं** भूषणं अलंकारस्तत् । कथम्भूतं ? **अभिरुचितं** अभीष्टं । केषां ? **सभ्यानां** समवसरणस्थितभव्यानां । पुनरपि कथम्भूतं ? **श्रिया चारु चितं** श्रिया विभूत्या चारु शोभनं यथा भवत्येवं चितमुपचितं पुष्टं । न केवलं दधासि, **जयसि च मृगलांछनं** चंद्रं । कया ? **स्वकांत्या** स्वशरीरदीप्त्या । किं-

विशिष्टं ? मग्नं निमग्नं । क ? रुचि दीप्तौ । किंविशिष्टायां ? स्वस्यामात्मीयायां । तं मृगलांछनं कथम्भूतं? रुचितं रुचिरं दीप्तं सकलप्राणिनामभीष्टं वा ।

**अर्थः**—हे वीर जिनेंद्र ! समवसरणांतील भव्यांना आवडणारा व अष्टप्रातिहार्यांच्या ऐश्वर्यानें ज्याची शोभा द्विगुणित झाली आहे असा गुणरूपी अलंकार आपण धारण केला आहे. आणि आपल्याच कांतीमध्यें मग्न झालेला सुंदर चंद्र हे जिनेश आपण आपल्या शरीराच्या कांतीनें जिंकला आहे.

के पुनर्गुणा यद्भूषणं भगवान्दधाति इत्याह—
अलंकाराप्रमाणें दिसणाऱ्या कोणत्या गुणांला भगवंतानीं धारण केलें हें सांगतात.

**त्वं जिन गतमदमाय—**
**स्तव भावानां मुमुक्षुकामद मायः ।**
**श्रेयान् श्रीमदमाय—**
**स्त्वया समादेशि सप्रयामदमायः॥१४१॥**

त्वमित्यादि । हे **जिन**, कथम्भूतस्त्वं? **गतमदमायः** मदो दर्पो माया वंचना गते नष्टे मदमाये यस्य यस्माद्वा भव्यानां स गतमदमायः यत एवमतो हे जिन ! तव अस्ति । कोसौ? **मायः** प्रमाणं केवलज्ञानलक्षणं आगमस्वरूपं वा । स केषां सबधीं? **भावानां** जीवादिपदार्थानां । कथम्भूतः? **मुमुक्षुकामदः** मुमुक्षूणां मोक्षप्रकांक्षिणां कामदः मोक्षलक्षणवांछितफलप्रदः । किंविशिष्टो मायः? **श्रेयान्** अतिशयेन प्रशस्यः सकलबाधारहितत्वेन हितत्वात् । इत्थम्भूतेन त्वया किं कृतं? **समादेशि** कथितः । कोसौ? **श्रीमदमायः** श्रिया मदः श्रीमदः तस्य मायो नाशः मीं हिंसायामित्यस्य कृतात्वस्यायं प्रयोगः । अथवा श्रीर्हेयोपादेयतत्वपरिज्ञानादिलक्षणा, स्वर्गापवर्गादिप्रापकत्वलक्षणा वा अस्यास्तीति श्रीमान् स चासौ अमायश्च न विद्यते मायास्येत्यमायो अनुष्ठानविशेषः । तथा

**सप्रयामदमाय:** स्वयं समादेशे । यमो व्रतं यम एव यामः, स्वार्थिकोऽण् । प्रकृष्टो यामः प्रयामः सह प्रयामेन वर्तते इति सप्रयामः स चासौ दमश्चेंद्रियजयः तस्य अयः आगमनम् ।

**अर्थः--हे वीर जिनेश ! आपण स्वतः गर्व व कपट यांचा अभाव केला आहे. व भव्यांच्याही या दोन दोषांचा आपणास शरण आल्यानें नाश झाला आहे. आपणांस संपूर्ण जीवादि पदार्थांचें ज्ञान झालें आहे व आपण आगमाचे प्रतिपादक आहांत. हे वीर जिनेश, आपण मुक्तिसौख्य इच्छिणाऱ्या भव्यांना मोक्षफलाची प्राप्ति करून देता. हे प्रभो ! आपण अतिशय उत्कृष्ट, व संपत्तीविषयीचा गर्व नाहींसा करणाऱ्या व्रतसहित इंद्रियविजयाचा उपदेश भव्यांना केला. अथवा हेयोपादेय तत्त्वांचें ज्ञान करून देणारा, किंवा स्वर्ग व मोक्ष यांची प्राप्ति करून देण्यास समर्थ असलेला, कपटरहित व व्रतसहित असलेल्या इंद्रियविजयाचा उपदेश आपण भव्यांना केला आहे**

अपरमपि भगवतो गुणं स्तोतुमाह गिरीत्यादि—

पुनः भगवंताच्या गुणाचें वर्णन करतात—

गिरिभित्त्यवदानवतः
श्रीमत इव दंतिनः स्रवद्दानवतः ॥
तव शमवादानवतो
गतमूर्जितमपगतप्रमादानवतः ॥१४२॥

गिरीत्यादाह । हे **जिन तव गतं** गमनं **ऊर्जितमुदारं** उत्कृष्टं । किं कुर्वतः ? **अवतः** रक्षतः । कान् ? **शमवादान्** शमो दोषाणामुपशमः तस्य वादाः तत्प्रतिपादका आगमाम्नान् । पुनरपि **कथम्भूतस्य? अपगतप्रमादानवतः** प्रकृष्टा मा हिंसा प्रमा अपगता नष्टा प्रमा अपगतप्रमा अहिंसा अपगतप्रमाया दानं अपगतप्रमादानमभयदानं तदस्या-

इतीति अपगतप्रमादावबांस्तस्य । दृष्टांतमाह श्रीमत इवेत्यादि । इव-शब्दो भिन्नप्रक्रमे दंतिन इत्यस्य अनंतरं द्रष्टव्यः । दंतिन इव दंतिन इव तव गतमित्यर्थः । कथम्भूतस्य दंतिनः? श्रीमतः सर्वलक्षणोपेतस्य भद्रजातेः । पुनरपि कथम्भूतस्य ? स्रवदानवतः स्रवणं सदानं च मदः स्रवदानं तद्विद्यते यस्यासौ स्रवदानवतः । अनेन स्वापत्यं तस्य गमनं प्रतिपादितम् । पुनरपि किंविशिष्टस्य ? गिरिभित्त्यवदानवतः गिरेः पर्वतस्य भित्तयः कटन्यस्तासामवदानं खण्डनं तद्विद्यते यस्यासौ गिरिभित्त्यवदानवांस्तस्य । अनेन महासामर्थ्यं तस्य सूचितम् ।

**अर्थः**--हे प्रभो ! आपण दोषांचा उपशम करणाऱ्या अर्थात् शमाचा उपदेश करणाऱ्या शास्त्रांचें रक्षण करता. व संपूर्ण प्राण्यांना अभयदान देणारा आपला विहार पृथ्वीतलावर उत्तम रीतीनें झाला जसा सर्व उत्तम लक्षणांनीं युक्त, ज्याच्या गण्डस्थलांतून मदाचा प्रवाह वाहतो असा भद्र जातीचा हत्ती पर्वताचे सुळके आपल्या दातांनीं फोडीत फोडीत लीलेनें गमन करतो तद्वत हे वीर जिन, आपली गति हत्तीप्रमाणें अतिशय मनोहर होती.

तात्पर्य—श्री महावीर तीर्थकरांनीं देशोदेशीं विहार केला व मोठमोठ्या प्रतिवाद्यांचा पराभव केला आणि शमोपदेशक शास्त्राचें प्रतिपादन करून त्यांची प्रवृत्ति कायम ठेविली.

अथ परकीयं मतं भवदीयं च मतं कीदृशमित्याह—

आतां दुसऱ्याच्या मतामध्यें व महावीर जिनेशाच्या मतांत काय अंतर आहे हें दाखवितात.

बहुगुणसंपदसकलं

परमतमपि मधुरवचनविन्यासकलम् ।

नयभक्त्यवतंसकलं

तव देव मतं समंतभद्रं सकलम् ॥ १४३ ॥

बहुगुणेत्यादि। बहवश्च ते गुणाश्च सर्वज्ञत्ववीतरागत्वादयः तेषां संपत् संपत्तिः तया असकलं असंपूर्णं परस्य मतं । अपिशब्दाद्गतमपीति संबंधः । पुनरपि कथंभूतं ? परमतं मधुरवचनविन्यासकलम् मधुराणि श्रुतिरमणीयानि तानिच तानि वचनानिच तेषां विन्यासो रचना तेन कलं मनोज्ञं । भवदीयं मतं कीदृशमित्याह नयेत्यादि । हे देव तव मतं शासनं समंतभद्रं समंताद्भद्रं निर्बाधत्वेन सर्वतः शोभनं समंताद्वा भद्राणि कल्याणानि यस्माद्वा भव्यानां तत्तथोक्तं । किं किंचित्तत्तथा भविष्यति? इत्याह सकलं समस्तं । पुनरपि कथम्भूतमित्याह नयभक्त्यवतंसकलम् । नया नैगमादयः तेषां तद्भक्त्यः स्यादस्तीत्यादिविभंगाः सेवा वा ता एवावतंसकं कर्णभूषणं तल्लातीति नयभक्त्यवतंसकलमिति ।

अर्थः —हे वीर जिनेश ! अन्यमत सर्वज्ञत्व, वीतरागत्व वगैरे गुणांला पारखे झालें आहे. यामुळें त्या मताला अपूर्णता प्राप्त झाली आहे. परंतु कर्णमधुर भाषणांची रेलचेल त्यांत असल्यामुळें तें मनोहर वाटतें. तें कुयुक्तींनीं भरलेलें असतें यास्तव बरवर विचार करण्यानें तें मनोहर दिसतें. परंतु हे जिनेश ! आपण प्रतिपादलेलें मत सर्व बाजूनें सुंदर व कल्याणकारक आहे. आपलें मत सर्व भव्यांचें कल्याण करतें व सर्वांगपरिपूर्ण आहे, आणि नैगमादि नयापासून उत्पन्न झालेले स्यादस्ति, स्यान्नास्ति इत्यादि भंगरूपी कर्णभूषणें तें भव्यजनांना देतें.

तात्पर्य —जैन मतच कल्याण करणारें आहे.

इति श्री पंडित प्रभाचंद्रविरचितायां क्रियाकलापटीकायां गौतमस्वामिसमंतभद्रस्तुतिविवरणे द्वितीयः परिच्छेदः ।

याप्रमाणें पंडित प्रभाचंद्र विरचितक्रियाकलाप टीकेंतील गौतमस्वामी व समंतभद्राचार्य यांच्या स्तोत्राच्या विवरणाचा दुसरा परिच्छेद संपला.

संस्कृत टीकाकाराचा शेवटचा प्रशस्तिसूचक श्लोक.

यो निःशेषजिनोक्तधर्मविषयःश्रीगौतमाद्यैः कृतः ।
सूक्तार्थैरमलैः स्तवोयमसमः स्वल्पैः प्रसन्नैः पदैः ॥
तद्व्याख्यानमदो यथावगमतः किंचित्कृतं लेशतः ।
स्थेयाच्चंद्रदिवाकरावधि बुधप्रह्लादचेतस्यलम् ॥ १ ॥

अर्थः-- थोड्या परंतु कोमल अशा शब्दांनीं युक्त, निर्दोष व स्पष्ट अर्थास व्यक्त करणारी, जिनेश्वरप्रतिपादित धर्माचें पूर्ण वर्णन करणारी अशी स्तुति गौतमस्वामी व समंतभद्र आचार्य यांनीं केली आहे. त्या स्तुतीचा आशय व्यक्त व्हावा ह्मणून यथाशक्ति माझ्या बुद्धीस अनुसरून मी ही टीका लिहिली आहे. ही विद्वान लोकांच्या आनंदी अंतःकरणांत जोपर्यंत चंद्र व सूर्य आकाशांत राहतील तोपर्यंत राहो.

